प्रा. के. वि. बेलसरे (पू. बाबा)
यांचे साधकांबरोबर झालेले

# अध्यात्म संवाद

## भाग दुसरा

संकलन व संपादन
म. वि. केळकर



त्रिदल प्रकाशन

**प्रा. के. वि. बेलसरे (पू. बाबा)**
**यांचे साधकांबरोबर झालेले**
**अध्यात्म संवाद**
**भाग दुसरा**

**प्रथमावृत्ती : गुरुपौर्णिमा, २८ जुलै १९९९.**
**पुर्नमुद्रण : ऑगस्ट १९९९ एप्रिल २०००**



**संकलन व संपादन :**
म. वि. केळकर

**मांडणी व सजावट :**
श्री. राजाभाऊ मराठे

**प्रकाशक :**
श्रीमती स्नेहल टिळक
त्रिदल प्रकाशन
राणी बिल्डिंग, प्रार्थना समाजजवळ,
गिरगाव, मुंबई-४०० ००४.

**अक्षरजुळणी :**
अक्षय फोटोटाइपसेटर्स
१-चित्रकूट सोसायटी,
डॉ. आंबेडकर मार्ग,
ठाणे (पश्चिम)-४०० ६०१,

**मुद्रक :**
श्री. विश्वास गोखले
श्रीपाद प्रेस
नवी अमृतवाडी,
वि. प. रोड, मुंबई-४०० ००४.

**किंमत : १०० रुपये**

श्रीराम

अध्यात्मग्रंथ वाचून परमार्थमार्गात ज्यांना वाटचाल करावीशी वाटते त्यांना ते अवघडच जाते. यासाठी ज्ञानी माणसाकडून श्रवण केल्यास जरा सोपे जाते अशा चर्चा दर शुक्रवारी होत असत. काही काही वेळा त्या अतिशय रंगत असत. ते सर्व स्मरणात ठेवून लिहून काढण्याचे काम प्रा. केळकरांनी केले. हे कौतुकास्पदच होय. त्यामुळे तर आज ही पुस्तिका होत आहे. अशा संवादात श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांना संमत अशा तऱ्हेने त्यांनी हा विषय स्पष्ट शब्दांत समजावून दिला; त्यांच्यावर श्रीमहाराजांचे अतिशय प्रेम होते. शिवाय विशेष कृपाप्रसादही होता. म्हणून या संवादरूपी पुस्तिकेला श्रीमहाराजांचे आशीर्वाद निःसंशय असणारच.

इंदिरा बेलसरे

# प्रस्तावना

*गुरुरादिरनादिश्च गुरु: परमदैवतम्।*
*गुरो: परतरं नास्ति तस्मै श्रीगुरवे नम:॥*

***जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला। जयानें सदा वास नामांत केला।***
***जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ती। नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ती।***

"अध्यात्म विषय स्पष्ट होण्यासाठी ह्या संवादांचा उपयोग होईल असे वाटते. वाचकांना पसंत पडल्यास संवादाचे पुढचे भाग आवश्यक ते संपादन करून यथावकाश प्रसिद्ध करण्याचा मानस आहे." असे पहिल्या भागाच्या प्रस्तावनेत म्हटले होते. अनेक वाचक मित्रांनी प्रत्यक्ष भेटून किंवा फोन करून त्यांना हे संवाद आवडल्याचे सांगितले व पुढचे भाग शक्य तितक्या लवकर प्रसिद्ध करावे अशी सूचनाही केली. वाचकांच्या ह्या प्रतिसादावरून पू. बाबांच्या सांगण्यातली तळमळ त्यांच्यापर्यंत पोचली आहे हे स्पष्ट आहे. वाचकांच्या या प्रतिसादामळे दुसऱ्या भागाचे पुनर्लेखन करण्याचा माझा उत्साहही दुणावला आणि म्हणून हा दुसरा भाग वाचकांच्या हाती देतांना मला आनंद होत आहे. असाच लोभ ठेवावा म्हणजे तिसरा भाग प्रसिद्ध करणे शक्य होईल.

नवीन वाचकांना या लेखनाची पार्श्वभूमी माहीत व्हावी म्हणून पहिल्या भागाची प्रस्तावना पुन्हा छापली आहे. पू. बाबांबरोबर १९९० व १९९१ या दोन वर्षात झालेल्या संवादांचा या दुसऱ्या भागात समावेश केला आहे. संपादन करतांना काही ठिकाणी जाणीवपूर्वक पुनरुक्ती तशीच राहू दिली आहे. विषय ठरलेला आणि चर्चा ठराविक व्यक्तींमधे झालेली, त्यामुळे काही विषय आणि हकिगती पुन:पुन्हा येणे साहजिक आहे. काही ठिकाणी चर्चेतील विशिष्ट मुद्दे ठसावेत म्हणून (उदाहरणार्थ, श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव, शरणागती) तर काही ठिकाणी चर्चेचा ओघ कायम राहावा म्हणून पुनरुक्ती राहू दिली आहे. तथापि काही ठिकाणी मात्र पुनरुक्ती वगळणे शक्य असतांनाही अनवधानाने ती राहिली असण्याची शक्यता आहे. त्याबद्दल मी

वाचकांची क्षमा मागतो. तसेच लेखनात अन्य काही चुका राहिल्या असल्यास ती जबाबदारी माझी आहे. पू. बाबांनी वाचून दाखविलेल्या उताऱ्यांची अवतरणे देतांना शक्य तेथे मूळ ग्रंथांचा उल्लेख केला आहे.

पुनर्लेखन करतांना पू. बाबांचे सांगणे शक्यतो त्यांच्याच शब्दात दिले आहे. ठराविक विषय व त्यांच्याशी संबधित त्याच त्या गोष्टी असतांनाही त्यातील बारकावे आणि विविध पैलू दाखविण्याची पू. बाबांची शैली विस्मयकारक होती. त्यामुळे कंटाळा आला किंवा चर्वित चर्वण आहे असे चर्चा करतांना कधीही वाटत नसे. उलट प्रत्येक वेळी आज काहीतरी नवीन गोष्ट समजली असे वाटत असे. संवाद वाचतांना वाचकांनाही याचा प्रत्यय येईल असे वाटते.

ह्या भागाचे लेखन होत गेले तसतसे पूर्वी या चर्चेत भाग घेतलेल्या माझ्या मित्रांना व मुख्यत: ती. आईंना ते वाचून दाखवले आहे. पू. बाबा व ती. आई यांचा तर मी ऋणी आहेच पण हा भाग ऐकतांना सर्वांनी वेळोवेळी ज्या बहुमोल सूचना केल्या आणि काही मुद्यांवर पुन्हा चर्चा करून प्रकाश टाकला त्याबद्दल त्यांचाही ऋणी आहे. वाचकांनीही त्यांच्या सूचना कळवल्या तर त्यांचा पुढच्या भागांसाठी उपयोग होईल.

पुस्तक सर्वांगसुंदर व्हावे म्हणून प्रा. श्रीपादराव बेलसरे यांनी पू. बाबांची छायाचित्रे दिली. तसेच. श्री. राजाभाऊ मराठे, श्री. विश्वास गोखले आणि अक्षय फोटोटाईपसेटर्सचे श्री. दीपक व श्री. अरुण फडके यांनी पहिल्या भागाप्रमाणे या भागासाठीही सजावट, मांडणी, छपाई इत्यादी सर्व कामे आपुलकीने स्वीकारली त्याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

श्रीमती स्नेहल टिळक आणि त्यांचे सहकारी यांनी त्रिदल प्रकाशनाच्या आत्तापर्यंतच्या परंपरेला साजेल अशा सुबक स्वरूपात पहिल्या भागाप्रमाणे हा दुसरा भागही, एकूणच पुस्तकांच्या किंमती वाढत असतांनाही, माफक किंमतीत आमच्या हाती दिला आहे. त्या सर्वांचाही मी ऋणी आहे.

**- म. वि. केळकर.**

*बी-३८, कमलपुष्प सोसायटी*
*बांद्रा रेक्लमेशन (पश्चिम)*
*मुंबई ४०० ०५०*
*दिनांक १५ जुलै, ९९.*
*फोन २६४२ ९६ ६०*
Email: kelkar.mavi@gmail.com

# प्रस्तावना

*गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु: गुरुर्देवो महेश्वर:।*
*गुरुरेव परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नम:॥*

सन १९८४ पासून मी मालाडला दर शुक्रवारी संध्याकाळी ६-३० वाजता पू. बाबांकडे (प्रा. के. वि. बेलसरे) जाऊ लागलो. त्या वर्षी एक दिवस मी प्रा. श्रीपादराव बेलसरे यांना म्हणालो की पू. बाबा दर रविवारी ज्ञानेश्वरीवर निरूपण करतात ते ऐकावयाला यावे असे वाटते, पण घरच्या अडचणींमुळे रविवारी सकाळी बाहेर जाता येत नाही. ते म्हणाले, मग तुम्ही शुक्रवारी संध्याकाळी येत जा. शुक्रवारी संध्याकाळी पू. बाबांशी चर्चा करावयाला काही जण येतात; तुम्हीही येत जा. डॉ. रवीन्द्र ठोसर, डॉ. बाळासाहेब खापर्डे, श्री. दादा निकते आणि डॉ. दप्तरदार नियमित जात असत. आता मीही जाऊ लागलो. पुढे श्री. कवीश्वर आणि श्री. वसंतराव खरे येऊ लागले. शुक्रवारच्या चर्चा मंडळाची ही संख्या पू. बाबांनी शेवटपर्यंत कायम ठेवली. आमच्या खेरीज ती. आई, प्रा. श्रीपादराव आणि सौ. शोभावहिनी यांचा चर्चेत सहभाग असे. ते ह्या मंडळाचे पदसिद्ध सदस्यच होते. १९९३ मधील बॉम्बस्फोट आणि दंगलीनंतर संध्याकाळी ६-३० ऐवजी आम्ही ५-४५ वाजता जाऊ लागलो. शुक्रवारच्या चर्चांखेरीज गुरूपौर्णिमा, पू. बाबांचे वाढदिवस, गोंदवल्याचे पुण्यतिथी उत्सव आणि नाम साधन अभ्यास शिबिरे, हेबळ्ळीची शिबिरे अशा प्रसंगी पू. बाबांच्या खोलीत चर्चा होत असत त्यांचाही येथे समावेश केला आहे. ज्यावेळी मी चर्चेसाठी उपस्थित नसे त्यावेळी आमच्यापैकी कोणीतरी, विशेषत: डॉ. बाळासाहेब आणि श्री. खरे चर्चेची टिपणे लिहून नंतर ती मला देत असत.

सुरुवातीचे काही दिवस मी चर्चा फक्त ऐकत असे. पू. बाबांची चर्चेची शैली मोठी आकर्षक आणि आश्वासक होती. त्यामुळे अध्यात्म विषयाची विशेष माहिती नसतानांही मी या चर्चेत केव्हां भाग घेऊ लागलो याचा मला पत्ता लागला नाही. पुढे लक्षात आले की पू. बाबांची चर्चेची एक विशिष्ठ पद्धत आहे. विचारलेल्या प्रश्नांची वा शंकांची उत्तरे चर्चेत भाग घेणारांकडूनच मिळावी अशा कुशलतेने ते चर्चेचे सूत्रसंचालन करीत असत. चर्चेत भाग

घेणारांपेक्षा आपण कोणी वेगळे, श्रेष्ठ आहोत असे ते कधीही दाखवत नसत. 'आपली दृश्याची ओढ का बरे कमी होत नाही?' 'आपण किती सहज श्रीमहाराजांना विसरतो!' अशा प्रकारची वाक्ये त्यांच्या तोंडी असत. वास्तविक, तुमची दृश्याची ओढ का बरे कमी होत नाही असे त्यांना विचारावयाचे असे, पण त्यांनी तसे कधी विचारले नाही. त्यांचे ज्ञान आणि साधन यांनी चर्चा करणारे दबून जात नसत. त्यामुळे साहजिकच चर्चेमध्ये मोकळेपणा रहात असे. श्री. सद्गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे (श्रीमहाराजांचे) जीवन आणि शिकवण हा चर्चेचा केन्द्रबिंदू असे. प्रामुख्याने अध्यात्म विषयावर चर्चा होई म्हणून ह्या चर्चेस अध्यात्म संवाद असे नांव दिले आहे.

दोन-एक वर्षांनी माझ्या लक्षात आले की चर्चेत काही विषय पुनःपुन्हा येतात आणि पूर्वी याबद्दल काय चर्चा झाली ते आम्ही बऱ्यापैकी विसरलेले असतो. म्हणून १९८७ पासून माझ्या रोजनिशीत मी मुख्य मुद्यांची अथवा चर्चेच्या गाभ्याची नोंद करावयास सुरवात केली. चर्चेसाठी येणाऱ्या इतरांना हे जेव्हा समजले तेव्हां त्यांनी ती टिपणे वाचावयास मागितली. रोजनिशी देणे शक्य नव्हते म्हणून मग मी ती एका नोटबुकात लिहून त्यांना दिली. त्यानंतर टिपणे रोजनिशीत लिहिण्याऐवजी नोटबुकात लिहू लागलो. रोजनिशीत लिहिताना त्या दिवसाच्या पानाची मर्यादा असे ती आता राहिली नाही म्हणून मग चर्चा जास्त विस्ताराने नोंदून ठेवू लागलो. त्यामुळे सुरूवातीची काही टिपणे संवाद रूपात नाहीत.

चर्चा चालू असताना मी टिपणे घेत नसे. शुक्रवारची चर्चा पुढच्या आठवड्यात आठवेल त्याप्रमाणे लिहून ठेवत असे. त्यामुळे तपशीलात क्वचित त्रुटी राहिल्या असण्याची शक्यता आहे. डॉ. ठोसर, श्री. निकते इत्यादींनी नोटबुक वाचल्यावर एक दिवस मी ते पू. बाबांना वाचायला दिले. त्यांनी ते वाचले व विचारले की हे तुम्ही कशासाठी लिहित आहात? झालेली चर्चा आम्ही विसरतो, लिहून ठेवले की ते पुन्हा पहाता येते असे मी म्हणालो. ते म्हणाले की हे लिहिलेले सर्व ठीक आहे पण प्रत्येक वेळी पूज्य बाबा असे कशाला लिहिले आहे? मी म्हणालो की ही माझ्या रोजनिशीतली पाने आहेत. त्यात कोणासंबंधी काय लिहायचे याचे मला स्वातंत्र्य नाही का? ते फक्त हसले. यानंतर प्रत्येक नोटबुक लिहून झाले की मी ते प्रथम पू. बाबा व आई यांना वाचावयास देत असे व त्यांचे वाचून झाल्यावरच इतरांना देत असे. ही

संपूर्ण चर्चा त्यांनी वाचलेली आहे. तथापि त्यात काही चुका राहिल्या असल्यास त्याची जबाबदारी माझी आहे.

बरीच नोटबुके लिहून झाल्यावर माझ्या मनात येऊ लागले की आता हे लिहिणे पुरे झाले. पण जेव्हां जेव्हां माझ्या मनात असे येत असे तेव्हां तेव्हां पू. बाबा चर्चा चालू असताना मधेच ''नाना, हे महत्वाचे आहे. हे नीट लिहून ठेवा बरे का'' असे म्हणत. काही वेळा चर्चा बहारीची होत असे. तेव्हांही ते आजची चर्चा नीट लिहून ठेवा असे सांगत. त्यामुळे पुढे हे लेखन माझे न रहाता पू. बाबांनी सांगितलेले मला आवडणारे काम झाले.

काही वर्षांपूर्वी चर्चेत सहभागी होणारांनी लिखाणाची प्रत आपल्याजवळ असावी अशी इच्छा व्यक्त केली म्हणून सर्व नोटबुकांच्या झेरॉक्स प्रती काढावयाचा विचार केला. किती प्रती काढावयाच्या ते ठरेना कारण प्रतींसाठी पू. बाबांनी काही नांवे सुचविली. श्री. श्रीपादरावांनी त्यात भर घातली. त्यामुळे ४०-४५ प्रतींपर्यंत आकडा गेला, म्हणून सध्या काहीच करू नका असे पू. बाबांनी सांगितले.

पू. बाबांच्या शेवटच्या आजारात याबाबतीत त्यांना काहीच विचारू शकलो नाही. पू. बाबा गेल्यावर एक दिवस पुस्तके आणि इतर कागदपत्रे आवरत असताना वाटले की आता या नोटबुकांचे काय करावयाचे? का ही रद्दीत जाणार? दि. ९ जुलै १९९८ गुरूपौर्णिमेदिवशी पू. बाबांची प्रार्थना करून त्यांना हा प्रश्न विचारला. पू. बाबांची प्रेरणा आली की चर्चा करणाऱ्या तुम्हा सर्वांची नांवे वगळून ही चर्चा लोकांच्या हाती देण्यास हरकत नाही. म्हणून त्या दिवशीच संपादनाच्या आणि पुनर्लेखनाच्या कामाला सुरुवात केली. प्रथम आमच्या नांवांऐवजी साधक असे लिहावयाचे ठरविले होते. (साधन करणारा तो साधक अशा मर्यादित अर्थानेच हा शब्द योजिला आहे). पण डॉ. ठोसर यांनी सुचविले की नुसते साधक लिहिल्यास एकच व्यक्ती परस्पर विरोधी विधाने करत आहे असे वाटेल म्हणून साधकांच्या नांवांऐवजी काही संकेत चिन्हांचा उपयोग करावा म्हणजे पू. बाबांचा उद्देशही सफल होईल. म्हणून नांवांऐवजी साधक अ, साधक प इत्यादी संकेत अक्षरांचा उपयोग केला आहे.

पू. बाबांना चर्चा आवडत असे. तथापि निव्वळ बौद्धिक कसरतीचा त्यांना तिटकारा होता. चर्चेतून साधकाच्या अध्यात्मविषयक संकल्पना स्पष्ट व्हाव्या आणि साधनात त्याची प्रगती व्हावी असे त्यांना वाटत असे. हे करतांना

त्यांची त्यामागची तळमळ दिसत असे. अनेक वेळा चर्चेसाठी वेगवेगळे संदर्भ काढून ठेवून ते आमची उत्सुकतेने वाट पहात असत. माहीत असूनही, समोरच्या माणसाच्या दोषांचा त्यांनी कधी उच्चार केला नाही आणि त्याला त्या दोषांतून मुक्त करण्याची खटपट केली. ह्या दृष्टीने त्यांची भूमिका शिक्षकापेक्षा श्रेष्ठ होती. पण आपण कोणीतरी मोठे आहोत असा गुरुत्वाचा भावही त्यांच्या वागण्यात नसे. Art lies in concealing art असे म्हणतात. आपली विद्वत्ता आणि अध्यात्मिक उंची पू. बाबांनी सर्वांपासून लपवून ठेवली होती. श्रीमहाराजांनी त्यांना अमानित्वाचा अभ्यास करावयाला सांगितले होते. श्रीमहाराजांच्या सांगण्यापासून ते तसूभरही ढळले नाहीत. अभ्यासावर त्यांचा कटाक्ष असे. तुम्ही अभ्यास करा, तुम्हाला साधेल असे ते नेहमी सांगत असत.

अध्यात्म विषय स्पष्ट होण्यासाठी ह्या संवादांचा उपयोग होईल असे वाटते. वाचकांना पसंत पडल्यास संवादांचे पुढचे भाग आवश्यक ते संपादन करून यथावकाश प्रसिद्ध करण्याचा मानस आहे. ह्या कामास ती. आईंनी शुभाशीर्वाद दिले आहेत. त्यांचा आणि पू. बाबांचा ऋणी राहण्याचे भाग्य लाभले याचा मला आनंद वाटतो.

मित्रवर्य श्री. राजाभाऊ मराठे, श्री. विश्वास गोखले आणि फडके बंधू यांनी पुस्तक चांगले व्हावे म्हणून आपलेपणाने सजावट, मांडणी, छपाई इत्यादी कामे स्वीकारली. त्यांचे आभार मानणे त्यांना आवडणार नाही म्हणूनच मी त्यांचा केवळ नामोल्लेख केला आहे. श्रीमती टिळक आणि त्यांचे सहकारी यांनी त्रिदल प्रकाशनाच्या आत्तापर्यंतच्या परंपरेला साजेल अशा सुबक स्वरूपात आणि माफक किंमतीत हे पुस्तक आमच्या हाती दिले आहे. त्यांचाही मी ऋणी आहे.

मुंबई - ४०० ०५०
दि. १० नोव्हेंबर १९९८

**- म. वि. केळकर**

# प्रकाशकाचे पान

सद्गुरु श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांशी संबंध आलेल्या व्यक्तींची माहिती नसणाऱ्या काही वाचकांनी सूचना केली म्हणून पुस्तकात उल्लेख असलेल्या काही महत्त्वाच्या व्यक्तींविषयी संक्षिप्त माहिती देत आहोत.

**संदर्भ :** श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज : चरित्र आणि वाङ्मय लेखक : प्रा. के. वि. बेलसरे.

**(१) श्रीतुकामाई :** श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे गुरु. उच्च अशा आध्यात्मिक अवस्थेमध्ये वावरणाऱ्या या महात्म्याला गांवातील लोक 'वेडा तुक्या' म्हणत. त्यांची वृत्ति सदैव आनंदी असे. त्यांचा नामस्मरणावर दृढ विश्वास होता. स्वतः विठ्ठलोपासक असूनही त्यांनी श्रीमहाराजांना रामोपासना दिली. शके १८०९ मध्ये त्यांनी येहळेगांव येथें देह ठेवला. तेथें त्यांची समाधि असून दरवर्षी त्यांच्या पुण्यतिथीला तेथें मोठे अन्नदान होते.

**(२) श्रीआनंदसागर :** श्री. गोविंद अनंत कुलकर्णी. दहाव्या वर्षी यांचे वडील वारल्यानंतर प्रपंचाच्या दुःखमय अनुभवांनी यांची वृत्ति अंतर्मुख झाली. दासबोध वाचत असताना मनःचक्षूंसमोर श्रीमहाराजांची मूर्ती उभी राहिली व त्यांनी 'मला येऊन भेट' असे सांगितले. इंदूरला श्रीमहाराजांची भेट झाली. श्रीमहाराजांनी त्यांच्यावर व त्यांच्या आईवर अनुग्रह केला अणि रामसेवा करण्यास सांगितले. श्रीमहाराजांच्या आज्ञेवरून त्यांनी जालना येथे राममंदिर स्थापन केले. १९०७ साली चंद्रग्रहणादिवशी या थोर पुरुषाने देह ठेवला.

**(३) श्रीब्रह्मानंद :** श्री. अनंत रामभट्ट गाडगुळी. जन्म शके १७८० तर्क, साहित्य, व्याकरण व वेदांतशास्त्राचा गाढा अभ्यास. अभ्यास संपत आला तेव्हा हाताच्या बोटांवर कोडाचे डाग दिसू लागले आणि शास्त्रार्थ शिकणे व्यर्थ वाटू लागून एकंदर जीवनाचा अर्थ काय हा प्रश्न सतावू लागला. 'तू व्यंकटापूरला जा' असा दृष्टांत झाला म्हणून तेथें जाऊन भजन पूजन सुरू केले व देवाजवळ सद्गुरुभेटीचा ध्यास घेतला. इंदूरला श्रीमहाराजांची भेट झाली. श्रीमहाराजांनी अनुग्रह केला व 'ब्रह्मानंद' असे नांव ठेवले. श्रीमहाराजांच्या आज्ञेनुसार त्यांनी कर्नाटकात

रामनामाचा प्रसार केला. व्यंकटापूर येथे त्यांनी व्यंकोबाचे भव्य मंदिर बांधले. श्रीमहाराजांनी १९१३ मध्ये देह ठेवल्यानंतर त्यांच्या पुण्यतिथी उत्सवाची जी पद्धत ब्रह्मानंदांनी घालून दिली त्यानुसार आजही गोंदवल्यास उत्सव होतो. इ. स. १९१८ मध्ये नवबाग (कागवाड) येथें त्यांनी देह ठेवला. तेथें त्यांची समाधि व समाधी मंदिर बांधलेले आहे.

(४) **श्री. भाऊसाहेब केतकर :** जन्म इ. स. १८४७. प्रपंचात राहून श्रीमहाराजांची पूर्णकृपा संपादन करणारा शिष्योत्तम. वयाच्या पंचविसाव्या वर्षी श्रीमहाराजांची प्रथम भेट झाली. इ. स. १९०४ मध्ये इंजिनिअरिंग खात्यातून सेवानिवृत्त झाल्यावर गोंदवल्यास राहावयास गेले. श्रीमहाराजांच्या सांगण्यावरून त्यांनी आपला संसार श्रीमहाराजांवर सोपवला व नंतर विरक्त वृत्तीने प्रपंचात राहिले. श्रीमहाराजांविषयी मनामध्ये सदैव असणारा प्रेमाचा ओलावा हेच त्यांच्या परमार्थाचे साधन बनले. श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर त्यांच्या आज्ञेनुसार बारा वर्षे गोंदवल्यात राहिले. १९३९ मध्ये वयाच्या ९२ व्या वर्षी ते वारले.

(५) **पू. तात्यासाहेब केतकर :** श्री. रा. चिं. केतकर, श्री. भाऊसाहेब केतकरांचे चिरंजीव. भाऊसाहेबांप्रमाणे यांनीही आपला संसार श्रीमहाराजांच्या चरणीं अर्पण केला. त्यांचा जन्म १८८५ साली झाला. १९०४ मध्ये गोंदवल्यास ते श्रीमहाराजांना प्रथम भेटले. श्रीमहाराजांनी त्यांच्याकडून तेरा कोटी जपाचा संकल्प सोडविला. १९१७ मध्ये त्यांना मिलिटरी अकाउंटस्‌मध्ये नोकरी मिळाली. तेथून १९४८ मध्ये ते सेवानिवृत्त झाले.

इ. स. १९२५ पासून म्हणजे श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर बारा वर्षांनी श्रीमहाराज पू. तात्यासाहेबांच्या मुखाने बोलू लागले ! श्रीमहाराजांचा फोटो व मराठी मुळाक्षरे लिहिलेली एक पेटी आहे. त्या पेटीसमोर बसून पू. तात्यासाहेब एक नाणे मुळाक्षरांवर ठेवत आणि त्यावर आपला उजवा हात ठेवत. नाणे फिरू लागल्यावर त्यांच्या मुखाने श्रीमहाराज बोलू लागत. ते लोकांना उपदेश करत आणि लोकांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरेही देत. श्रीमहाराजांच्या वेळी त्यांच्याजवळ असणाऱ्या असंख्य मंडळींनी याविषयी आपली खात्री करून घेतली होती. पू. बाबा १९३१ मध्ये पू. तात्यासाहेबांना म्हणजे श्रीमहाराजांना प्रथम भेटले. पू. बाबा जेव्हा श्रीमहाराजांना विचारले किंवा श्रीमहाराजांनी सांगितले असे म्हणत तेव्हा

त्याचा अर्थ पू. तात्यासाहेब पेटीसमोर बसलेले असत तेव्हा त्यांना विचारले किंवा त्यांनी सांगितले असा असे. १९६७ साली पू. तात्यासाहेबांचे प्रोस्टेटचे ऑपरेशन झाले व त्यातच त्यांचा अंत झाला.

**(६) श्री. रामकृष्णपंत दामले :** हे इंजिनिअर होते. त्यांच्या वयाच्या सहाव्या वर्षी त्यांना श्रीमहाराजांनी आपण होऊन नाम दिले. श्रीमहाराजांवर त्यांचे अत्यंत प्रेम असल्याने श्रीमहाराजांचे चरित्र ऐकतांना त्यांचे डोळे भरून येत. १९५९ साली जलोदराने त्यांचा मृत्यू झाला. जायच्या आधी बारा तास ते बेशुद्ध होते पण प्राण जाण्यापूर्वी तासभर त्यांनी तारकमंत्राचा मोठ्याने जप केला!

**(७) भीमराव गाडगुळी :** ब्रह्मानंदाचे पुतणे. हे वकील होते. बेलधडी आणि वेंकटापूर येथील मंदिरांची व्यवस्था ब्रह्मानंदांनी यांचेवर सोपविली होती.

**(८) कृष्णशास्त्री उप्पिनबेटिगिरी :** हे कर्नाटकातील अतिशय विद्वान पंडित होते. यांची व श्रीमहाराजांची भेट बेलधडीला झाली. श्रीमहाराजांनी त्यांचा सत्कार केला व त्यांना गोंदवल्यास बोलावले. शास्त्रीबुवांचा आणि पंडित मदनमोहन मालवीय यांना फार स्नेह होता. १९२२ साली यांनी देह ठेवला.

**(९) डॉ. पाथरकर :** जन्म सन १८९२. हे वाडिया हॉस्पिटलमध्ये डॉक्टर होते. त्यांची लहानपणापासून ईश्वराच्या अस्तित्वावर आणि नामस्मरणावर निष्ठा होती. श्रीमहाराजांची भेट झाल्यावर ती आणखी दृढ झाली. त्यांची वृत्ति अत्यंत समाधानी होती. गरिबांबद्दल त्यांना कणव वाटे व कित्येकदा पदरमोड करून ते गरीब पेशंटसूना औषधे देत. शेवटी त्यांना कॅन्सर झाला. त्यातच श्रीमहाराजांचे नांव घेत त्यांनी देह ठेवला.

**(१०) श्री. वेर्लेकर :** श्री. वासुदेव नारायण वेर्लेकर. जन्म जानेवारी १९१४. हे मूळ गोव्याचे. शिक्षण तेथेच झाले. १९४७मध्ये मुंबईस आले. व्यवसाय - सुवर्णकाम. अतिशय प्रेमळ पण शिस्तप्रिय असे श्रीमहाराजांचे निःसीम भक्त म्हणून हे सर्वांना परिचित होते. पू. बाबांवर त्यांची नितांत श्रद्धा होती. त्यांना भजनाची आवड होती. चारचौघांसारखाच प्रपंच, पण त्यांनी कधीही तक्रार केली नाही. अखंड नामस्मरण आणि कोणाचेही अंतःकरण न दुखवणे हे व्रत त्यांनी जन्मभर सांभाळले. जानेवारी १९९७मध्ये त्यांनी देह ठेवला.

## |१२०| (५ जानेवारी १९९०)

मालाड येथे पू. बाबांच्या घरी.

अरविंदाश्रमात १७ वर्षे पू. माताजींच्याजवळ (Mother) राहिलेले एक फ्रेंच साधक 'सत्प्रेम' यांच्या Mind of the cells या पुस्तकातील काही भाग पू. बाबांनी वाचून दाखवला. या पुस्तकात मदर यांच्याशी वेळोवेळी झालेल्या संवादांचा गोषवारा आहे. मदरना श्रीअरविंदांनी 'ॐ नमो भगवते' असा मंत्र दिला होता आणि त्याचा त्या अखंड जप करीत असत. त्या म्हणत की सर्व जाणीव नामाने भरून ते त्याच्याही पलीकडे गेले पाहिजे. Sound has vibrations and these vibrations spread in your body and fill it शेवटी रोमरोमात नाम भरते.

पू. बाबा म्हणाले, मदर जप करीत हे वाचून मलाही आश्चर्य वाटले. पूर्ण श्रद्धेने नाम घेतले तर ते आपले काम करतेच. श्रीमहाराज म्हणत, "पाणी माती एक झालें। वेगळें नाहीं करतां आलें। निवळी घालावी पाण्यांत। पाणी स्वच्छ होतें जाण॥१९॥ तैसा विषयांत राहून जगतीं। नामाची ठेवावी संगती। विषयाचें विष शोषून घेई। ऐसी आहे नामाची प्रचीती॥२०॥ (चैतन्य गीता अध्याय १६.) आपल्याजवळ श्रद्धा आहे पण तिची वाढ होत नाही. त्यासाठी काय करावे?

**साधक ग** : आम्ही श्रद्धेच्या बाबतीत दरिद्री आहोत. गीता श्रद्धावंताला ज्ञान होते म्हणतात. उपनिषदे श्रद्धासंपत्ती घेऊन गुरूकडे जायला सांगतात. पण ही श्रद्धा कशी निर्माण करावयाची आणि वाढवायची?

**पू. बाबा** : श्रद्धा म्हणजे काय ते आपल्याला माहीत आहे. व्यवहारातही आपण श्रद्धेशिवाय राहू शकत नाही.

**साधक क** : यासाठी ज्याच्यावळ श्रद्धा आहे त्याच्याजवळ म्हणजे संतांजवळच गेले पाहिजे.

**पू. बाबा** : हे नेहमीच शक्य होईल असे नाही.

**साधक प** : जोपर्यंत मीपणाने साधन करतो तोपर्यंत श्रद्धा वाढणार नाही.

**साधक ज** : नामाने काही अनुभव आले, उदाहरणार्थ मनावर ताबा आला तर श्रद्धा निर्माण होईल.

**साधक क** : जे काही घडते ते सर्व 'तो' करतो असे वाटू लागले की श्रद्धा वाढली असे समजावे.

**साधक ड** : कामक्रोधादि विकारांवर ताबा आला की श्रद्धा वाढली असे समजावयाला हरकत नाही.

**साधक प** : विकार वासनांतून येतात. विकार आवरले तरी जोपर्यंत वासना आहेत तोपर्यंत खरे साधन होत नाही.

**साधक ड** : जोपर्यंत आपले खरकटे धुतले गेले नाही तोपर्यंत अनुभव येणार नाही. विकार हेच खरकटे.

**पू. बाबा** : अगदी घरातली माणसेदेखील प्रारब्धवशात् एकत्र आलेली आहेत; त्यात गुंतण्यात अर्थ नाही.

**साधक ख** : हे भाऊसाहेबांसारख्यांनाच शक्य आहे.

**पू. बाबा** : आपणही असा प्रयत्न करायला काय हरकत आहे?

**साधक ग** : प्रयत्न करणे एवढेच आपल्या हातात आहे. आज तरी आता माझी हद्द झाली असे वाटावे इतके नाम घेऊन श्रद्धा निर्माण होण्यासाठी सद्गुरूंची प्रार्थना करणे हाच मार्ग वाटतो.

**साधक प** : मी प्रयत्न करायला पाहिजे आणि त्याचबरोबर साधनातला मी नाहीसा झाला पाहिजे असे हे त्रांगडे आहे.

**साधक क** : माझ्या जीवनात जे जे घडते ते सर्व तो करतो. माझी नातेवाईक मंडळी त्यानेच दिली आहेत; माझ्याकडे आणि त्यांच्याकडे तोच पाहील असा निश्चय करून स्वस्थपणे साधन करावयाचा अभ्यास केला पाहिजे. अरविंदाश्रमात मदर एकदा म्हणाल्या की येथे आलेल्यांपैकी बहुतेकजण संसारात बुडालेले आहेत. नुसती चर्चा करतात. खरा परमार्थ कोणालाच नको आहे. आपणही त्यापैकीच आहोत काय याचा ज्याचा त्याने विचार करावा.

**पू. बाबा** : आपण इतके मृत्यू पाहतो पण आपलेही आता थोडे दिवस राहिले आहेत तेव्हां शक्य तितके नाम घेतले पाहिजे अशी निकड कां वाटत नाही? खरोखर, हा मोठा चमत्कार आहे.

## **।१२१।** (१२ जानेवारी १९९०)

सुरुवातीला पू. बाबांनी Uncommon Wisdom या पुस्तकातील हायझेनबर्ग ह्या शास्त्रज्ञाबद्दलची काही माहिती वाचून दाखविली. हायझेनबर्ग कृष्णमूर्तींना भेटला तेव्हां त्याने विचारले की मी शास्त्रज्ञ म्हणून कसा यशस्वी

होईन? कृष्णमूर्ती म्हणाले, प्रथम तू माणूस आहेस. मानवत्वाचा बोध करून घेणे हे तुझे पहिले कर्तव्य आहे आणि त्यासाठी तुला विचारशून्य झाले पाहिजे. त्यातूनच ज्ञान होऊन तुझा मार्ग प्रकाशित होईल. तो म्हणाला की कृष्णमूर्तींच्या ह्या उत्तराने त्याच्यापुढची एक मोठी समस्या सुटली.

नंतर प्रश्न निघाला की जर नाम सर्वव्यापी आहे आणि म्हणून आपले जीवनही त्यातच आहे तर त्याचा प्रत्यय का येत नाही? अविद्या हे याचे कारण आहे असे वेदान्त सांगतो. तथापि हे स्पष्ट करणारी श्रीरामकृष्णांनी सांगितलेली गोष्ट चांगली आहे. एका माशाच्या पिल्लाने त्याच्या आईला विचारले की समुद्र समुद्र म्हणतात तो कोठे आहे? त्याची आई म्हणाली, बाळा, तू समुद्रात जन्मलास, तेथेच राहतोस आणि समुद्रातच मरणार. त्या आईसारखे सद्गुरु असतात. ते आपल्याला नामाची ओळख करून देतात.

**साधक प** : मी नाम घेतो हे जोपर्यंत वाटते तोपर्यंत नामाच्या सर्वव्यापित्वाचा प्रत्यय येणार नाही. नाम घेणे आणि नामस्मरण होणे यात फरक आहे. श्रीमहाराज नेहमी नामात राहा असे सांगत. जसजसा मी कमी होईलं तसतसा नामच सर्व काही आहे असा अनुभव येईल.

**साधक ग** : नामस्मरण ही Chiselling process (छिन्नीने छिलण्याची प्रक्रिया) आहे. बर्फाप्रमाणे अहम् घट्ट झाला आहे तो नामाने फोडला जाईल.

**साधक ज** : याचा अर्थ आपण नामाचा साधन म्हणून उपयोग करतो.

**साधक ड** : सुरुवात तशी होईल पण नाम हेच साधन आणि नाम हेच साध्य आहे असे नामच दाखवेल.

**साधक क** : निसर्गदत्त महाराज म्हणाले की साधन करतांना मला विशेष त्रास असा झाला नाही. साधन मी करत नाही, तोच करवून घेतो हे मनाला पटले आणि काम झाले. म्हणून राम कर्ता ही भावना वाढवली तर साधनात प्रगती होणे सोपे जाईल.

**साधक ग** : ही भावना नसतेच असे नाही. पण काही गोष्टी माझ्या आवाक्याबाहेरच्या आहेत असे मीच ठरवतो आणि असे माझ्या आवाक्याबाहेरचे जे घडते ते त्याने केले असे वाटते. तथापि हा भावही फार काळ टिकत नाही.

## |१२२| (१९ जानेवारी १९९०)

**पू. बाबा** : आपल्याकडे अजून तरी विद्यार्थी चांगल्या शिक्षक प्राध्यापकांना मान देतात. श्रीमहाराजांनी मला जेव्हां अमानित्वाचा अभ्यास करायला सांगितले तेव्हां ते म्हणाले, लोकांकडून मिळणारा मान हा मधुमेहाच्या रोग्याच्या रक्तातल्या साखरेसारखा असतो. वरवर त्याचे काही वाटणार नाही; पण तो साधनी माणसाचा घात केल्याखेरीज राहणार नाही.

काही जुन्या आठवणी सांगून नंतर पू. बाबा म्हणाले, स्पिनोझा म्हणून एक मोठा तत्त्वज्ञ होऊन गेला. तो समाधीत जात असे. त्याने विश्व आणि ईश्वर यासंबंधी एक छान सिद्धान्त मांडला आहे. तो म्हणतो की त्रिकोण म्हटले की त्याचे गुणधर्म - उदाहरणार्थ तीन्ही कोनांची १८० अंश बेरीज - त्यात येतात, नव्हे ते त्यात अंगभूतच असतात. तसे विश्व म्हटले की त्यात ईश्वराचे गुण अंगभूत आहेतच. जग देखील ईश्वराप्रमाणे पूर्ण व सुंदर आहे; पण ते पूर्णत्व व सौंदर्य आणि त्याच्या मागचा ईश्वर पाहण्याची दृष्टी पाहिजे. एकतर ती भावनेने म्हणजे प्रेमाने येईल नाहीतर विवेकाने येईल. या दोहोपैकी, स्पिनोझाच्या मते, विवेकाचा मार्ग श्रेष्ठ आहे. निवृत्तिनाथांनी मला विवेक दिला व त्यायोगे मी भवसागर तरून गेलो असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. पू. बाबा म्हणाले, हा विवेक आपल्यापैकी प्रत्येकाजवळ आहे पण आपण त्याचा उपयोग करत नाही; कारण ध्येय निश्चित झालेले नाही. ते निश्चित झाले की आपल्या प्रत्येक कृतीचा संदर्भ ही कृती मला ध्येयाकडे नेते की नाही असा राहील. मग अखंड नामस्मरण का होणार नाही? श्रीमहाराज मला म्हणाले होते - खरोखर ते शब्द माझ्या हृदयात कोरलेले आहेत - की "जेवढा रिकामा वेळ मिळतो तेवढा वेळ नाम घेतलेत तर नामाच्या राशी पडतील." पण आपण ते करीत नाही. वास्तविक आता आपले संसार झालेले आहेत. मृत्यू केव्हांही झडप घालील. पण असे असूनही आपण जागे होत नाही.

नंतर पू. बाबांनी गेल्या वर्षी फेब्रुवारी, मार्चमध्ये ते आजारी होते तेव्हांची हकिगत सांगितली. ते म्हणाले, डॉ. फणसळकर येऊन गेले. त्यांना स्थिती कठीण वाटत होती. डॉ. देशपांड्यांनाही तसेच वाटत होते. किडनी आणि लिव्हरमध्ये बिघाड होता. फुप्फुसांचा दाह होता व सूजही होती. डॉक्टर न्युमोनियावर इलाज करत होते आणि ह्या सर्व घडामोडीत माझे नामस्मरण मात्र छान चालले होते; विचार स्पष्ट होते. मी म्हणतो की अशी स्थिती

असतांना प्राण गेला तर बिघडले कोठे? कित्येक योगी तर शेवटी देहाची स्थिती काय होईल कोणास माहीत म्हणून प्रकृती चांगली असतांनाच देह ठेवतात.

नंतर पू. बाबांनी गुरुदेव रानड्यांच्या काही गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले, श्रीमहाराज म्हणत, साधक कसा असावा ह्याचा आदर्श पहावयाचा असेल तर गुरुदेवांना भेटावे. इतरांच्या गोष्टी झाल्या, आपणही कसोशीने नाम घेतले पाहिजे.

## |१२३| (२६ जानेवारी १९९०)

आज पू. बाबा खूप प्रसन्न दिसत आहेत.

**पू. बाबा** : मरणाची भीती नाहीशी होणे हे परमार्थात पाऊल पुढे पडल्याचे लक्षण आहे. मनुष्य सर्वात जास्त आपल्या देहाला जपतो. त्या देहाचीच फिकीर वाटेनाशी झाली की आणखी काय पाहिजे? माझा एक मारवाडी विद्यार्थी विनोबांच्या शेवटच्या आजारात त्यांच्याजवळ होता. विनोबांनी प्रायोपवेशन चालू केल्यावर त्याने विनोबांना विचारले की हा आक्रस्ताळेपणा कां? तेव्हां विनोबा म्हणाले, साधनाला - नामस्मरणाला देह साथ देईनासा झाल्यावर तो ठेवून काय करायचे? ते निजलेले असतांना त्यांचे एक पाऊल नेहमी हलायचे. कारण विचारल्यावर ते म्हणाले की त्या तालावर 'रामकृष्णहरी' चालू असते.

एकदा एक गृहस्थ श्रीमहाराजांकडे आले होते. श्रीमहाराजांनी त्यांची चौकशी केल्यावर ते म्हणाले, काय सांगू! एक का दोन, सगळे प्राब्लेम्सच आहेत. श्रीमहाराजांनी विचारले, कोणाला? ते म्हणाले, अर्थात मला. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, वास्तविक 'मी' हाच सर्वात मोठा प्राब्लेम आहे.

नाम घेतांना हा मी आड येतो. येथे येणाऱ्या एका गृहस्थांचे नामस्मरण चांगले होत असे. काही वेळा तर लोकलमधून प्रवास करतानाही नाम सगळीकडे भरले आहे असे त्यांना जाणवत असे. ते म्हणत की नामस्मरण करतांना मागे श्रीमहाराजांची आठवण जागी असली की नाम चांगले होते. पण संसाराचे विचार मनात आले की श्रीमहाराज मागे जातात.

नंतर पू. बाबा म्हणाले की ज्ञानेश्वरीतील काही ओव्या मी आज मुद्दाम काढून ठेवल्या आहेत त्या वाचून दाखवतो.

सहाव्या अध्यायातील 'तत्रैकाग्रं मन: कृत्वा' ह्या १२ व्या श्लोकावरील या काही ओव्या पहा : ''मग तेथ आपण। एकाग्र अंत:करण। करूनि सद्गुरुस्मरण। अनुभविजे॥ १८६॥ जेथ स्मरतेनि आदरें। सबाह्य सात्विकें भरे। जव काठिण्य विरे। अहंभावाचे॥ १८७॥ विषयांचा विसर पडे। इंद्रियांची कसमस मोडे। मनाची घडी घडे। हृदयामाजीं॥ १८८॥ ऐसें ऐक्य हें सहजें। फावे तंव राहिजे। मग तेणेंचि बोधें बैसिजे। आसनावरी॥ १८९॥

त्याचप्रमाणे पाचव्या अध्यायातील 'यतेंद्रिय मनोबुद्धि:' ह्या २८ व्या श्लोकावरील ओव्या पहा : तेथ जैसी रथ्योदकें सकळें। घेऊनि गंगा समुद्रीं मिळे। मग एकेक वेगळे। निवडूं न ये॥ १५३॥ तैसी वासनांतराची विवंचना। मग आपैसी पारुखे अर्जुना। जे वेळीं गगनीं लयो मना। पवनें कीजे॥ १५५॥ जेथ हें संसारचित्र उमटे। तो मनोरूप पट फाटे। जैसें सरोवर आटे। मग प्रतिमा नाहीं॥ १५६॥ तैसें मन एक मुदल जाये। मग अहंभावादिक कें आहे। म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये। अनुभवी तो॥ १५७॥

सध्या आपला अठरावा अध्याय चालू आहे. त्यात 'भक्त्या माम् अभिजानाति' ह्या ५५ व्या श्लोकातील यश्चास्मि ह्या पदावर भाष्य करतांना तो भक्त जे जे करतो ती माझी पूजाच असते असे म्हटले आहे आणि पुढे 'किंबहुना तंतूसि पट। कां मृत्तिकेसी घॅट। तैसा तो येकवट। मजसी माझा॥ ११८४॥ असे म्हटले आहे.

तंतू आणि पट हे उदाहरण आणखी कोठे आहे ते पहातांना पाचव्या व सहाव्या अध्यायातील ओव्या मिळाल्या. सहाव्या अध्यायातील स्थिती आधीची व पाचव्या अध्यायातील स्थिती नंतरची आहे. ध्यानासाठी आसनावर बसण्यापूर्वी मनाची स्थिती कशी पाहिजे ते सांगितले आहे. मन एकाग्र करून सद्गुरूचे स्मरण केले की केवळ सात्त्विक भावच राहिला पाहिजे. मग, एखादे वस्त्र विरावे तसे अहंभावाचे काठिण्य विरते, विषयांचा विसर पडतो. इंद्रियांची तळमळ किंवा उलघाल नाहीशी होऊन हृदयात मनाची घडी होते असे म्हटले आहे. मनाची घडी होते म्हणजे काय? येथे मनाला वस्त्राची उपमा दिली आहे.

**साधक ग :** मनात एकसारख्या येणाऱ्या असंख्य वृत्ती नाहीशा होऊन एकविध वृत्ती होते आणि मग असे मुकुलित झालेले मन हृदयात प्रवेश करते.

**पू. बाबा :** अहंभावाचे काठिण्य विरते म्हणजे काय?

**साधक प :** मीपणा नाहीसा झाल्याखेरीज ध्यान होणार नाही.

**साधक क** : अहंभावापासूनच पतनाला सुरुवात झाली. अहं ब्रह्मास्मि पासून खाली येत येत देहोऽहम् असे आपण म्हणू लागतो. देहोऽस्मि ही अगदी जड किंवा स्थूल पातळी. तेथून वर सूक्ष्म पातळीवर जसजसे जाऊ तसतसा ह्या अहम्‌चा जडपणा किंवा कठीणपणा कमी होत जातो म्हणून अहंभाव विरतो असे म्हटले असावे. श्रीरामकृष्ण जेव्हां समाधीतून खाली येत तेव्हां वस्तूंकडे बोट दाखवून हा गडू ना, हा पलंग ना? असे दुसऱ्यांना विचारत असत.

**साधक ग** : गेल्या वर्षी गोंदवल्याच्या साधनशिबिरात आपण पंचकोषांच्या समाधी सांगितल्या होत्या त्यांपैकी मनोमय कोषाच्या समाधीची ही अवस्था असावी असे वाटते. अन्नमय कोषापासून सुरुवात करून साधक येथे मनोमय कोषाच्या समाधीपर्यंत पोचत असावा. मनाची घडी घडे म्हटले आहे. साधक घडी करतो म्हटलेले नाही. मनाची ही एकाग्र अवस्था सद्गुरूंचे स्मरण केल्यावर त्यांच्या कृपेने होते. मी करतो म्हणून होत नाही हा भाव असावा.

**पू. बाबा** : येथे अहंभाव नाहीसा झालेला नाही. ध्यान करतांना मन एकाग्र झाले आहे. चित्राची घडी घातल्यावर चित्र दिसू नये तसा संसार नाहीसा झाला आहे. तथापि पुन्हा व्यवहारात उतरले की घडी उलगडली जाऊन संसार-चित्र दिसू लागते. पाचव्या अध्यायातील ओव्यांत मात्र ज्या मनाच्या पटावर संसारचित्र उमटते तो पटच फाटतो. साहजिकच त्याबरोबर संसारचित्रही कायमचे नष्ट होते.

**साधक क** : खरोखर ज्ञानेश्वर महाराज, श्रीरामकृष्ण यांच्यासारखे संत समाधीतून खाली आलेच नाहीत. लोकांना समजावें म्हणून अशी काही वर्णने त्यांनी केली इतकेच.

**पू. बाबा** : एका वकिलाने म्हातारपणी वकिली बंद केल्यावर त्याचा ग्रंथसंग्रह दुसऱ्या तरुण वकिलास विकला. खरेदी केल्यावरही त्या वकिलाने पुस्तके तेथेच ठेवली होती पण म्हातारा वकील ही पुस्तके माझी नाहीत म्हणे. त्या वकिलाप्रमाणे आपला संसार भगवंताला का देऊ नये? तो तुमच्याजवळ राहील पण मग हा संसार, पैसाअडका, मुलेबाळे माझी राहणार नाहीत. ती त्याची म्हणून सांभाळ होईल.

**साधक प** : 'मी' देईन म्हणून देता येणार नाही कारण हे देणे सूक्ष्मातले आहे. वस्तू देता येते तसे ममत्व देता येत नाही.

**साधक ज** : मी गेला की माझे आपोआप जाईल. त्याला वेगळा प्रयत्न नको.

नंतर श्री. भाऊसाहेबांच्या निष्ठेच्या आठवणी निघाल्या. पू. बाबा म्हणाले, खरोखर भक्त-भगवंताचे किंवा गुरु-शिष्याचे नाते काही और असते. श्री. भाऊसाहेबांनी म्हातारपणी मला कशाला ठेवले आहे असे श्रीमहाराजांना विचारले होते. मी जगतो हा त्यांचा भाव गेला होता.

**साधक क** : एकदा विवेकानंद आणि लाटू महाशय श्रीरामकृष्णांच्याबद्दल बोलत बसले होते. विवेकानंदांनी पाहिले की गुरूंच्या केवळ स्मरणाने लाटू महाशयांच्या शरीरावर रोमांच उभे राहिले होते.

**साधक ग** : भारतीय युद्धात भक्ताची (भीष्म) प्रतिज्ञा खरी झाली पाहिजे म्हणून भगवंतांनी स्वत:ची शस्त्र हाती न धरण्याची प्रतिज्ञा मोडली!

**पू. बाबा** : लहान मुलासारखी वृत्ती बनली पाहिजे. तुकाराम महाराज म्हणतात 'मातेचिया खांदी बाळ नेणे शीण। भावना त्या भिन्न मुंडावया॥ तुका म्हणे नको पुसूं वेळोवेळा। उपदेश वेगळा उरला नाहीं॥' इतर सर्व भावनांचे मुंडण केले पाहिजे. त्याखेरीज निष्ठा वाढणार नाही.

## |१२४| (२ फेब्रुवारी १९९०)

सुरुवातीला पू. बाबांनी अरविंदाश्रमातील श्री. पंडित यांच्या "जीवनसौंदर्य" (मूळ इंग्रजी पुस्तकाचे मराठी भाषांतर) ह्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. पाँडिचरीला गेल्यावर श्रीअरविंद बाहेरच्या मंडळींना भेटत असत त्या काळात लोकमान्य टिळकांचे काही वकील मित्र त्यांना भेटावयाला गेले होते. त्यांच्यापैकी एकाने श्रीअरविंदांना विचारले की सध्या तुम्ही काय करता? ते म्हणाले काही नाही. तेव्हा दुसरे एक वकील म्हणाले की हे तर सर्वात कठीण आहे. पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजही म्हणत की 'काहीच न करणे हे काहीतरी करण्यापेक्षा कठीण आहे.' काहीही न करता एक दिवस तरी राहून पहा. अगदी नामस्मरण देखील करायचे नाही.

**साधक प** : आपल्या जीवनाचा एक साचा तयार झालेला असतो. त्यात आपण सर्व गोष्टी बसवतो. तसे केले म्हणजे जीवन सोपे होते.

**साधक ग** : नाम हे देखील आम्हाला कर्मच वाटते. आम्ही नामस्मरण करतो.

**पू. बाबा :** जोपर्यंत, नाम सूक्ष्म आहे आणि नाम आणि नामी एकच आहे असे वाटत नाही तोपर्यंत नाम हे कर्मापलीकडे आहे हे समजणार नाही.

नंतर पू. बाबांनी त्या पुस्तकातील आणखी काही भाग वाचून दाखवला. 'मदरनी' पॅरिसमध्ये जेव्हां प्रथम ॐ कार ऐकला तेव्हां त्यांना सर्वत्र सोनेरी प्रकाश भरलेला दिसला. ध्वनीच्या स्पंदनांमुळे प्रकाश दिसणे फार महत्त्वाचे आहे. नामस्मरणाच्या स्पंदनांनी शक्ती निर्माण होतात; परमात्मा खेचला जातो. पण नामस्मरण श्रद्धेने आणि दृढनिश्चयाने केले पाहिजे.

**साधक क :** हे करायला भक्तीची जोड फार उपयोगी पडते.

**पू. बाबा :** होय. राम कर्ता ही भावना दृढ झाली की साधन तो करवून घेतो हे लक्षात येते.

**साधक प :** काही वेळा लक्षात येते की आज बाह्यत: कोणतेही कारण नसतांना साधन नीट होत नाही आणि याच्या उलट एखादे दिवशी तार लागून जाते.

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणत की नामस्मरण करतो असे मला कोणी सांगावे लागत नाही; ते मला लगेच कळते. सर्वव्यापित्व आले की कोठे काय चालले आहे हे सहज समजू शकते. नामस्मरण करतांना आत जायचे आहे. नाम हे सर्वव्यापी आहे म्हणून आत जायचे म्हणजे अंतर्मुख होऊन सर्वत्र व्यापून राहिलेल्या नामात बुडून जायचे आहे. म्हणून मी तुम्हाला नेहमी सांगतो की नामाची संगत वाढली पाहिजे. गोंदवल्यास पुण्यतिथीच्या दिवशी उजाडतांना मंदिराच्या गाभाऱ्यातून येणाऱ्या 'श्रीराम श्रीराम' घोषाने सर्व आसमंत भरून जाते आणि देहभान नाहीसे होते.

## |१२५| (८ फेब्रुवारी १९९०)

आज पू. बाबांचा वाढदिवस. ८१ वर्षे पूर्ण होऊन ८२ वे वर्ष लागले. बरीच मंडळी आलेली आहेत. दर शुक्रवारी जमणारे आम्ही सर्वजण मागे बसलो. थोड्या वेळाने पू. बाबांनी आम्हाला पुढे बोलावले. वाढदिवसानिमित्त आम्ही त्यांना काही भेट दिली होती. त्यांना ते आवडले नव्हते. काहीशा नाराजीने ते म्हणाले, "कोणी सांगितला हा उपद्व्याप तुम्हाला?"

पू. बाबा पुढे म्हणाले, श्रीमहाराजांनी व्रत म्हणून सांगितले होते की आपल्याकडे येणाऱ्याला काहीतरी खायला द्यावे. अगदी काहीच नसले तर थंड पाणी देऊन नमस्कार करावा. श्रीमहाराजांच्या कृपेने गेल्या पन्नास वर्षांत असा

प्रसंग आला नाही. तेव्हा दादरला रहात होतो. दोन मुले होती. पगार त्रेपन्न रुपये होता. त्यातले तीस रुपये घरभाड्यात जात. एक आण्याची भाजी आणत असे. एकदा भाजीला गेलो असतांना भाजीऐवजी दोन आणे डझन सफेत वेलची केळी होती तीच अर्धा डझन घेऊन आलो. घरी आलो तर दोन माणसे भेटायला आलेली होती, त्यांना ती देता आली! खरं सांगतो, मी घरात राहणारा संन्यासी आहे. स्वामी रामतीर्थांचा एक फोटो आहे पहा! एका खांबावर हात ठेवून आकाशाकडे पहात ते ऐटीत उभे आहेत. अंगावर गुंडाळून पांघरलेले फक्त एक धोतर आहे. तो फोटो मला फार आवडतो. खरा निरासक्त महात्मा!

वास्तविक मी फिलॉसफीचा विद्यार्थी, लॉजिकचाही नुसता शिक्षक नव्हे तर त्यासाठी माझी ख्याती होती. (I was an acclaimed teacher) पण काय सांगू? श्रीमहाराजांना पाहून भुललो. एकदा त्यांना म्हणालो, आपण फार व्यवहारचतुर आहात. तेव्हा ते म्हणाले, चतुर आहे पण तुम्ही म्हणता तसा व्यवहारी नाही; कारण व्यवहार म्हटले की स्वार्थ आला! त्यांची आईही म्हणत असे की तो बोलण्यात मोठा चतुर आहे. श्रीमहाराजांच्या संगतीत जे दिवस गेले ते विसरणे शक्य नाही. एका सुभाषितात म्हटले आहे ''संसार विषवृक्षस्य द्वे फले अमृतोपमे। सुभाषित रसास्वादः सज्जनैः सह संगमः॥'' मला दोन्ही मिळाले.

जुन्या आठवणी सांगतांना पू. बाबा पुढे म्हणाले, दादरहून मालाडला राहायला आलो तेव्हां तिथले सगळे सामान विकून टाकले. एक लोखंडी पाळणा होता त्याला भंगारवाल्याने चार आणे दिले. लाकडी टेबल होते ते कोणीच घेईना तेव्हां ते तोडून जाळून टाकले. पुस्तके मात्र घेऊन आलो. तेव्हां तुम्ही नाही त्या (भेटी देण्याच्या) फंदात पडू नका. मला आवडते ते करा. तुम्हाला नामाचे आणि श्रीमहाराजांचे प्रेम लागू द्या. ते अजून का लागत नाही म्हणून माझा जीव तळमळतो; तेव्हां तेवढे करा. मी तुमचा अनादर करतो असे समजू नका; पण तेवढे नाम घ्या म्हणजे मला सगळे पावले!

## ।१२६। (९ फेब्रुवारी १९९०)

आम्ही गेलो तेव्हा पू. बाबा आमची वाटच पहात होते. ते अगदी प्रसन्न आणि ताजेतवाने दिसत होते. कालच्या नाराजीचा मागमूसही नव्हता. पू. बाबांनी अरविंदाश्रमातील मदरनी लिहिलेल्या अनुभवातील काही भाग वाचून

दाखवला. मदर म्हणतात, ध्यान वाढल्यावर असा प्रत्यय आला की आपण, आपण नाहीच. मी पूर्णपणे विरघळून गेला व जग मिथ्या आहे (illusion) असे जाणवले. म्हणजे जग आहे तसेच राहिले पण पाहण्याची दृष्टी बदलली. त्या म्हणतात. की मी हे उगीच काहीतरी लिहीत नाही. **I am not a baby; I have been practicing yoga for the last sixty years.** हे वाचून पू. बाबा म्हणाले की शंकराचार्यही हेच सांगतात. मदर म्हणतात, माझ्यात होणारा बदल हा सुरवंटाचे फुलपाखरू बनावे तसा हळूहळू पण निश्चित होत आहे.

नंतर ॲलन नावाच्या एका ज्यू साधकासंबंधी पू. बाबांनी काही माहिती सांगितली व दासबोध दशक नऊ, समास दहा मधील ११ ते १४ आणि २३ ते २९ ह्या ओव्या वाचून दाखवल्या. ते म्हणाले की शास्त्रज्ञांच्या बाबतीत बाह्य जगाचे ज्ञान करून घेतांना ते जगाकडे वेगळेपणाने पहातात. उलट आत्मज्ञानी व्यक्तींच्या बाबतीत द्रष्टा आणि दृश्य हे द्वैत राहात नाही. ह्या समासात समर्थांनी निर्गुणाच्या भजनाचा मार्ग सांगितला आहे.

योगी अरविंदांच्या डायरीतला काही भाग पू. बाबांनी नंतर वाचला. साधनकाळात अरविंदांचा काही काळ असा गेला की जवळ जवळ दररोज त्यांना काहीतरी अनुभव येत होते. ते अनुभव त्यांनी ह्या डायरीत दिले आहेत. ज्या दिवशी काही अनुभव आला नाही त्या दिवशी काही लिहिलेले नाही. पण असे दिवस फार थोडे आहेत. त्यांना जाता-येता, उठता-बसता सर्व माणसांत आणि प्राण्यांत कृष्णदर्शन होऊ लागले. हृदयात कृष्ण होता म्हणजे खरोखर काय स्थिती असावी? श्रीअरविंदांनी ते तुरुंगात होते तेव्हादेखील कृष्ण त्यांच्या घोंगडीवर त्यांना मिठी मारून झोपत असे असे म्हटले आहे. ज्ञानेश्वर महाराजही "पांडवांशी सदा काळी। कृष्ण राहिला जवळी। ज्ञानदेवा हृदयकमळीं। तैसाचि स्थिरावला॥" असे म्हटले आहे. श्रीमहाराजही म्हणत की गोपी आपल्या हृदयातील कृष्ण काढून त्याची पूजा करीत व पुन्हा त्याला आपल्या हृदयात ठेवत.

नंतर पावित्र्यासंबंधी बोलणे निघाले. संत पवित्र असतात तसे नाम व आपले गुरूही पवित्र असतात. पवित्रचा शब्दशः अर्थ तारणारा असा आहे.

**साधक ग :** पावित्र्याच्या अंगी अशी शक्ती असते की ती आपले उन्नयन करते. पावित्र्य हे मंगल असते.

**पू. बाबा :** हे बरोबर आहे. नाम घेतांना हा पवित्र भाव पाहिजे.

**साधक ड :** भाव व भावना यात फरक काय?

**पू. बाबा :** भाव म्हणजे अस्तित्व. भावना म्हणजे emotion. ती अज्ञानातूनही येऊ शकते. पण भाव हा सत्यस्वरूप असतो. 'आवडीनें भावें हरिनाम घेसी।' मधे आवडीनें व भावें दोन्ही पदे महत्त्वाची आहेत. गुरुदेव रानडे भावें म्हणजे प्रेमाने असा अर्थ करत. तोही बरोबर आहे.

पवित्रतेच्या संदर्भात पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. एकदा पुण्याला त्यांना रस्त्यात पू. सोनोपंत दांडेकर भेटले. ते दोघे बोलत उभे होते इतक्यात एक खेडवळ गृहस्थ त्याचे मामांकडे (पू. सोनोपंत) काही काम होते म्हणून आला. त्याला काही चिठ्ठी लिहून पाहिजे होती. खाली धरायला काही नाही का म्हणून पू. मामांनी विचारताच तो म्हणाला, 'ती काय तुमच्या हातात ज्ञानेश्वरी आहे.' तेव्हां ते म्हणाले, 'अरे, ती ज्ञानेश्वरी आहे; पुष्टिपत्र (Pad) नव्हे.' हा त्यांचा ज्ञानेश्वरीबद्दलचा पवित्र भाव. मग नाइलाज म्हणून त्यांनी ज्ञानेश्वरीवर उपरणे टाकून चिठ्ठी लिहून दिली.

**साधक क :** संत आहेत तेथे पावित्र्य असणारच.

**पू. बाबा :** होय. श्रीमहाराजांची समाधी पाहिली की पवित्र वाटते. गंगा आपण पवित्र मानतो. तथापि भाव नसेल तर तीर्थ म्हणजे पाणी आणि देव म्हणजे धोंडा बनतो.

नंतर पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली.

श्री. रामकृष्णपंत दामले लहान मूल होते तेव्हांची गोष्ट. एकदा ते परसाकडे जाऊन आले आणि शी धुण्यासाठी त्यांनी आईला हाका मारल्या. आई आत कामात होती. बाहेर श्रीमहाराज बसलेले होते. त्यांनी चटदिशी उठून त्याची शी धुतली आणि आपल्या छाटीने ढुंगण पुसले! रामकृष्ण आत गेला तेव्हां आईने विचारले की शी कोणी धुतली. तो म्हणाला, महाराजांनी. हे ऐकताच त्या बाईंचे अंत:करण भरून आले. खरोखर हे येवढे ब्रह्मज्ञानी सत्पुरुष, पण ते म्हणत त्याप्रमाणे त्यांचा देह पुरुषाचा असला तरी अंत:करण आईचे होते. महाराज म्हणजे मूर्तिमंत अमानित्व होते.

## ।१२७। (१६ फेब्रुवारी १९९०)

आमच्यापैकी एकजण बरेच दिवस बाहेर गेले होते ते आज परत आले. ते म्हणाले की तेथील कडाक्याची थंडी आणि मर्यादित हालचाल यांमुळे डोके सुन्न जड होते आणि त्यामुळे साधन मनासारखे होत नाही.

**पू. बाबा** : आपण आपल्या देहावर पूर्णपणे अवलंबून असतो त्यामुळे देहाला आणि देहाशी संबंधित गोष्टींना अवास्तव महत्त्व देतो. माझ्या एका विद्यार्थ्याने मला एक सँडोझ घड्याळ भेट दिले होते. ते एकदा हरवले आणि जप करतांना एकसारखी त्याचीच आठवण होऊ लागली! खरोखर अशा लहानसहान गोष्टीत मन किती अडकावे? फार चांगला प्रपंच वाईट तसा फार बिघडलेला पण वाईट. बिघाड होणे हा प्रपंचाचा स्वभाव आहे हे लक्षात ठेवावे. श्रीमहाराज म्हणत, संडासात डोकावले तर घाण यायचीच हे जसे स्वाभाविक तसे बिघाड होणे हे प्रपंचात स्वाभाविक आहे. प्रपंच फार अनुकूल असल्यास श्रीमहाराज म्हणत की प्रतिकूल परिस्थितीचा झटका आपल्या हितासाठीच असतो. त्या परिस्थितीत नाम आणि नामावरील निष्ठा टिकली पाहिजे.

आपण आजारी पडलो तर औषध मिळाल्याशी कारण. स्वतःच्या मुलानेच ते आणून द्यावे असा आग्रह कशाला? कामापुरता कोणीही माणूस श्रीमहाराज पाठवतील अशी वृत्ती ठेवली तर आपण प्रपंचात, मुलामाणसात अडकणार नाही. मला तरी पुनर्जन्म आहे. तो कोठे व कसा येईल, कोण माणसे पुढच्या जन्मात बरोबर असतील कोणी सांगावे? तेव्हां आज जो प्रपंच आहे त्यात अडकू नये. तुम्हाला काय वाटते?

**साधक प** : हाच प्रश्न मी माझ्यापुरता जरा वेगळ्या तऱ्हेने मांडतो. माझे अस्तित्व केवळ ह्या देहापुरते मर्यादित नाही. मी देहावेगळा, तीन अवस्थांच्या पलीकडला काहीतरी आहे असा अनुभव जर आला तर देह आणि देहासंबंधीच्या सगळ्या काळज्या सुटतील.

**पू. बाबा** : त्यापेक्षा सोपे म्हणजे हे सर्व श्रीमहाराजांचे, त्यांनी दिलेले आहे; ह्याचे काय व्हावयाचे ते तेच पहातील असे वाटावे.

**साधक क** : आपल्याला प्रपंचातील लोकांचे प्रेम सहवासाने आले आहे. त्यात गुंतू नये हे विचाराने समजले तरी जोपर्यंत नामात प्रेम येत नाही, श्रीमहाराजांबद्दल मनापासून प्रेम वाटत नाही आणि त्यापासून सुख, आनंद, तृप्ती मिळत नाही तोपर्यंत देहसंबंधी गोष्टी सुटणे शक्य नाही. मला सुखाशिवाय, आनंदाशिवाय जगणे अशक्य आहे. जर तो आनंद, ती तृप्ती नामात किंवा श्रीमहाराजांच्या प्रेमात मिळाली तरच प्रपंचाची आसक्ती सुटेल.

पू. बाबांनी श्री. भाऊसाहेबांची एक आठवण सांगितली. भाऊसाहेबांच्या पत्नी, सौ. बाई खूप आजारी होत्या. सर्वजण रात्री दोन दोन तास जागून पहारा करत होते. श्री. भाऊसाहेबांचा पहारा पहाटे चार ते सहा वाजेपर्यंत

होता. त्या वेळी ते फेऱ्या मारून जप करीत होते. सौ. बाई त्यांना म्हणाल्या, 'अहो, जरा इकडे माझ्याजवळ बसा.' तेव्हा ते म्हणाले, 'अगं, श्रीमहाराजांची आठवण कर; शेवटी तुला तेच मदत करू शकतील, मी नाही,' ''आहे तितुके देवाचे। ऐसे वर्तणे निश्चयाचे। मूळ तुटे उद्वेगाचे। येणे रीती॥''

पू. बाबा म्हणाले, परमार्थ साधण्यासाठी, आपल्या सद्गुरूंचे आपल्यावर किती उपकार आहेत हे आठवून कृतज्ञता वाटणे अत्यंत आवश्यक आहे. ह्या संदर्भात पू. बाबांनी सौ. यमुनाताईंची (पू. तात्यासाहेबांच्या पत्नी) एक आठवण सांगितली. त्या श्रीमंत घराण्यातल्या. पू. तात्यासाहेबांचे विशेष शिक्षण झालेले नव्हते. त्यामुळे लग्न झाल्यावर त्यांना वाटे की श्रीमहाराजांची बरीच मंदिरे आहेत तेव्हां श्रीमहाराज आपल्याला एखाद्या मंदिरात राहायला सांगणार असतील आणि जे रामासमोर येईल त्यातून प्रपंच चालेल. पण येथे मुंबईला त्यांची परिस्थिती त्यांच्या कल्पनेपेक्षा बरीच चांगली होती. रोज सकाळी त्या तांदुळात रामनाम लिहीत. पू. बाबांनी ते पाहिले तेव्हां त्या म्हणाल्या की हे सर्व वैभव रामाचे आहे. त्यांना सतत जाणीव होती की हे सर्व श्रीमहाराजांनी दिलेले आहे. ही आठवण सांगताना पू. बाबांना गहिवरून आले. ते म्हणाले, श्रीमहाराजांबद्दल अशी कृतज्ञता वाटली तर अहंकार आणि आसक्ती कमी होतील. आता प्रपंचातील काय हवे असे विचारले तर काय सांगता येईल? श्रीरामाजवळ मागतांना श्रीमहाराज म्हणाले होते की माझ्या माणसांना दैन्यवाणे ठेवू नको आणि त्यांना नाम घेण्याची बुद्धी दे. आपल्याला सर्वांना श्रीमहाराजांनी खरोखर फार चांगले ठेवले आहे. आपली लायकी नसतांना त्यांनी आपल्याला जवळ केले. आपल्याला इतके थोर आणि दयाळू सद्गुरु लाभले हे आपले खरे भाग्य आहे.

**साधक क** : हे तर खरेच. शिवाय त्यापेक्षा जास्त म्हणजे श्रीमहाराजांनी आम्हाला सर्वांना सत्संगतीत ठेवले त्याबद्दल आम्हाला कृतज्ञता वाटते.

**पू. बाबा** : सत्संगतीमुळेच आपण योग्य मार्गावर आहोत.

## ।१२८। (२३ फेब्रुवारी १९९०)

एक बाई पू. बाबांकडे आल्या होत्या. त्यांचा मुलगा सांगितलेले ऐकत नाही अशी त्यांची तक्रार होती. पू. बाबा म्हणाले, असे होण्याची श्रीमहाराज तीन कारणे सांगत १) नवराबायको यांचे आपसात प्रेमसंबंध नसणे. २) वाईट संगत असणे ३) घरात प्रेमाचे वातावरण नसल्यामुळे कठोर बोलाचाली होणे.

पू. बाबा म्हणाले की यांपैकी कोणते कारण आहे ते आपणच पहावे; तथापि मुलाला एकदा माझ्याकडे पाठवा.

त्या बाई गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले, आईचे प्रेम असे असावे की आई नसल्यास घरी मुलाला चैन पडू नये. घरात जबरदस्तीच्या धाकापेक्षा प्रेमाचा धाक असावा. आमच्या घरी सनातनी आणि कठोर वातावरण होते. त्यामुळे मला सनातनीपणा आणि कर्मकांडाची नफरत आहे.

माझ्या दुसऱ्याच भेटीत मी श्रीमहाराजांना (पू. तात्यासाहेबांना) म्हणालो की आपण मला फार प्रेम लावू नका. माझा स्वभाव विचित्र आणि तऱ्हेवाईक आहे. तेव्हां श्रीमहाराज इतकेच म्हणाले की ते माझे मी पाहीन. लोक माझ्याबद्दल श्रीमहाराजांकडे तक्रार करत. त्यावर श्रीमहाराज म्हणत, असू दे; मुलगा चांगला आहे. मला त्यावेळी लाज वाटे. खरोखर त्यांनी माझ्यावर इतके प्रेम केले की मला लाजवले. व्हिक्टर ह्यूगो म्हणतो, **That I have been loved immensly is in itself a great satisfaction.**

श्रीमहाराज डॉ. पाथरकरांना म्हणाले, डॉक्टर, माझ्यातले प्रेम काढले तर मी नाहीच. पू. बाबा पुढे सांगू लागले, श्रीमहाराजांनी कधी कोणाचे अंत:करण दुखवले नाही याचा मला अनुभव आहे. एकदा माझे जवळजवळ दीड तास प्रवचन झाले. लोक कंटाळले होते. प्रवचन संपल्यावर मला श्रीमहाराज म्हणाले, ''एका माणसाला बटाट्याची भाजी फार आवडत असे. पण त्याने जर बचकाभर भाजी दुसऱ्याला वाढली तर कसे होईल? आपले तसे होऊ नये.'' अशा तऱ्हेने दुसऱ्याला न दुखवतां श्रीमहाराज खुबीने बोलत असत.

श्रीमहाराज म्हणत की आपल्या कुटुंबातल्या लोकांवर निस्वार्थी प्रेम करणे हे फारच कठीण आहे कारण निस्वार्थी प्रेमात अपेक्षा नसते. कर्तव्य करणे त्या मानाने सोपे आहे. पण प्रेमात जो भावनेचा भाग असतो तो कर्तव्यात नाही. पू. बाबा म्हणाले, एकदा श्री. हुच्चूराव गोंदवल्याच्या मंदिराच्या कामासाठी बाहेरगावी गेले होते. काम झाल्याबरोबर त्यांच्या बरोबरचे गृहस्थ म्हणाले, की चला, गोंदवल्याला लवकर परत गेले पाहिजे. श्री. हुच्चूराव म्हणाले की तुमचे बरोबर आहे कारण घरी तुमची कोणीतरी वाट पहात असेल. पण मी एकटा आहे. तिथे माझी वाट पहाणारे कोणी नाही. तेव्हां घाई कशाला? पण ते जेव्हां गोंदवल्याच्या समाधी मंदिराच्या फाटकापाशी पोचले तेव्हां पू. तात्यासाहेब त्यांची वाट पहात उभे होते. प्रसंग साधाच, पण तो सांगताना श्री. हुच्चूरावांना भरून येत असे. प्रेमाची तहान प्रत्येक जीवाला असते.

नंतर पू. बाबांनी सत्प्रेम यांनी मदर यांच्यावर लिहिलेल्या पुस्तकातले नामाबद्दलचे काही उतारे वाचून दाखवले. पू. बाबा म्हणाले की आपण खऱ्या अर्थाने अजून नामाला चिकटलेले नाही. प्रापंचिक गोष्टीत आता मागण्यासारखे काही नाही. तब्येतंही उत्तम आहे. मग आपण नामाला पूर्णपणे चिकटत का नाही? पू. बाबांनीच या प्रश्नाचे उत्तर दिले. ते म्हणाले की वैराग्याशिवाय नाम स्थिर होत नाही. अगदी फार धगधगीत वैराग्य नको पण आहे ते पुरे असे वाटावे. १) खाणे पिणे २) कामवासना ३) पैसा आणि ४) लौकिक या चार प्रबळ वासनांच्या बाबतीत आता पुरे असे वाटावे.

**साधक प** : हे पटते. पण बहुधा Unconscious मधे जे सवयीच्या रूपाने आत शिरले आहे ते जाणे कठीण वाटते.

**पू. बाबा** : त्यावर नाम हाच उपाय आहे. म्हणून आपण नाम घेत राहू. वैराग्याचे कष्ट न होता जर आपल्याला हे साधायचे असेल तर रामाच्या इच्छेने जे व्हायचे असेल ते होईल. त्याला योग्य वाटेल ते तो माझ्या हितासाठी करील असे वाटावे. दुसऱ्या उपायात बाकी सर्व सोडून फक्त भगवंतावरच प्रेम करावयाचे असते. पण ते साधायला फार कठीण आहे. 'तद्विस्मरणे परमव्याकुलता' असे व्हावे लागते.

## ।१२९। (२ मार्च १९९०)

स्त्री मासिकाच्या फेब्रुवारीच्या अंकात डॉ. अंजली सोमण यांचा एक लेख आला आहे. त्या लेखात त्यांनी म्हटले आहे की परमार्थाकडे वळलेल्या लोकांचा कर्माचा उत्साह नाहीसा होतो व त्यांचे एकूण कर्म ढिले पडते. त्यामुळे लोक परमार्थी झाले तर त्या प्रमाणात समाजाचे नुकसान होते.

पू. बाबांनी विचारले की खरोखर असे घडते का? ह्या प्रश्नाच्या अनुरोधाने आज कर्माची व्याख्या, कर्माचे स्वरूप, कर्म कसे करावे, कर्माचे अध्यात्मातील स्थान इत्यादी कर्माच्या विविध अंगांचा ऊहापोह झाला.

वास्तविक अशा प्रकारचे आक्षेप पूर्वीही घेतले गेले आहेत. प्रपंच करणारा असो वा परमार्थ करणारा असो, कर्म कोणालाच सुटलेले नाही. विहित कर्म करावेच लागेल. आपले जगणे कर्माशिवाय शक्यच नाही. तथापि विहित कर्म देखील बंधनकारक कसे होणार नाही ते पहावे लागेल. म्हणूनच भगवंतांनी गीतेत 'योग: कर्मसु कौशलम्' म्हटले आहे.

पू. बाबा म्हणाले की कर्म हे जड आहे. आपण ते कोणत्या हेतूने करतो आणि ते करतांना आपली भूमिका काय आहे याला महत्त्व आहे. मुलाची वागतांना चूक झाली आणि ती सुधारावी म्हणून आईने त्याला धपाटा मारला. याच्या उलट मुलाच्या गळ्यातली सोन्याची साखळी चोरण्याच्या हेतूने एखाद्या भामट्याने मुलाला खाऊ दिला तर ह्यापैकी कोणते कर्म चांगले?

**साधक ग :** भगवंतांनी अर्जुनाला तू लढण्याचे कर्म करणार नाही म्हणतोस पण तुझा स्वभाव जबरदस्तीने ते करणे तुला भाग पाडील असे म्हटले आहे.

**पू. बाबा :** मनुष्य लहान असो किंवा मोठा असो, परमात्म्याच्या विश्वरचनेत आणि व्यवस्थेत त्याला काही स्थान आहे. परमात्म्याचा काही हेतू आहे. भलेही ते स्थान लहान असेल पण त्याला त्याचे कर्म करावेच लागेल.

१९१० साली सर भालचंद्र भाटवडेकरांबरोबर मुंबईत श्रीमहाराज कापडाची गिरणी पहायला गेले होते. तेथे चाललेली यंत्रे पाहून ते म्हणाले की ह्या यंत्रातला एखादा स्क्रू पडला तर काय होईल? भाटवडेकर म्हणाले, यंत्र बंद पडेलच असे नाही पण त्या प्रमाणात ते कमकुवत होईल. श्रीमहाराज म्हणाले "सामान्य माणसाचे विश्वातील स्थान ह्या स्क्रूसारखे असते. त्याने कर्म केले नाही तर विश्वाचा कारभार बंद पडणार नाही पण काही प्रमाणात तो कमकुवत-अपुरा होईल." तेव्हां प्रत्येकाला त्याचे कर्म करावेच लागते पण ते करतांना फलासक्त होऊ नये असे गीता सांगते. शास्त्रविहित कर्तव्य करतांना जो आसक्ती, फलेच्छा, ममता आणि अहंकार यांचा त्याग करतो तो कर्म करत असूनही ते करत नाही आणि मुक्त पुरुष काही कर्म करीत नाही असे वाटले तरी तो जगाच्या हितासाठी सूक्ष्मामधें कर्म करीत असतो.

ज्ञानेश्वरीत म्हटले आहे "वन्हीची ज्वाला जैसी। वायां जाय आकाशीं। क्रिया जिरो दे तैसी। शून्यामाजी॥". कर्म करतांना फळावर लक्ष ठेवू नका; त्यात आसक्त होऊ नका. काही वेळा तर कर्माचे नाटक करावे लागेल आणि ते फसता कामा नये.

**साधक क :** आपण कर्माचा विचार करतो तेव्हां दृश्यातील किंवा जड कर्माचा विचार करतो पण त्याच्या मागे केवढे तरी मोठे म्हणजे व्यापक असे सूक्ष्मातील कर्म आहे हे आपणांस समजत नाही. ही सूक्ष्मता जेव्हां समजेल तेव्हांच कर्माचे खरे स्वरूप ध्यानात येईल.

**पू. बाबा :** शक्तीखेरीज कर्म होत नाही. त्या शक्तीवर आपले नियंत्रण आहे का? उदाहरणार्थ, पचनशक्ती. म्हणून आपले सर्व कर्म त्याची इच्छा म्हणून

करावयास शिकावे म्हणजे फलासक्ती नाहीशी होईल. खरोखरच ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायातील "माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें। तया पाणिया ऐसें केलें। होआवें गा॥" ही ओवी मला कर्माच्या बाबतीत आदर्श वाटते.

**साधक ज :** स्त्री मासिकातील लेखातला आक्षेप काही प्रमाणात खराच आहे. हव्यास कमी झाला की त्या प्रमाणात उचापती कमी होतातच. पण जीवनाचा उद्देश केवळ पैसा किंवा लौकिक मिळवणे नसून समाधान मिळवणे हा आहे अशी जाणीव झाल्यावर असे होणारच. त्यात वावगे काय आहे?

यानंतर कर्म करतांना आपल्या मनाची स्थिती काय असावी असा प्रश्न निघाला.

**साधक प :** योगवासिष्ठात मनाच्या अवस्थेवरच बंधमोक्षादि अवलंबून आहेत म्हणून ते मनच ताब्यात आणले पाहिजे असे म्हटले आहे.

**पू. बाबा :** संत एकनाथांनीही भागवतात मनानेच मनाला आवरावे असे म्हटले आहे. ते म्हणतात "जेवीं हिरेनि हिरा चिरिजे। तेवीं मनेंचि मन धरिजे। हेंहि तैंचि गा लाहिजे। जैं गुरुकृपा पाविजे संपूर्ण स्वयें॥ या मनाची एक उत्तम गती। जरी स्वयें लागलें परमार्थी। तरी दासी करी चारी मुक्ती। दे बांधोनि हातीं परब्रह्म॥" समर्थांनीही प्रपंच करावा नेटका म्हटले आहे. नेटका प्रपंच याचा अर्थ आसक्तीरहित आणि भगवंताच्या स्मरणात केलेला प्रपंच.

पू. बाबा पुढे म्हणाले, कर्म ईश्वरार्पण करणे किंवा फलाची आशा सोडून उत्तम प्रकारे कर्म करणे अवघड आहे. त्यापेक्षा हे कर्म 'त्याचे' आहे. तो कर्ता आहे आणि मी त्याच्या हातातले बाहुले आहे. तो करवून घेईल तसे कर्म मी करतो. त्याचे आहे म्हणून उत्कटतेने करतो असा भाव आला तर कर्म चांगले होईल आणि माणूस त्यामधें गुंतणार नाही. कर्म तर करावेच लागेल पण त्यामधें मीपणाने गुंतू नये. नामस्मरणात त्याच्या (भगवंताच्या) अस्तित्वाची अखंड जागृती ठेवायची आहे. आज मी दुसरी कर्मे करतो तसे नामस्मरण हे देखील कर्म म्हणूनच करावे लागेल. पण काही काळाने राम कर्ता ही खात्री झाली की कर्म करणे संपून कर्म घडेल आणि त्याबरोबरच नामस्मरण करणे संपून ते होऊ लागेल.

## |१३०| (९ मार्च १९९०)

गेल्या शुक्रवारच्या कर्मासंबंधीच्या विषयावरच चर्चा चालू झाली. पू. बाबांनी श्रीअरविंदांच्या गीतेवरील निबंधातून काही भाग वाचून दाखविला. ते

म्हणाले, गीतेतील कर्मयोगाचा प्रवृत्तिपर अर्थ दाखवून त्याचा पुरस्कार करणारे दोन मोठे पुरुष म्हणजे लो. टिळक आणि योगी अरविंद. तथापि दोघांत एक फरक आहे. लो. टिळक उपनिषदादि ग्रंथांतील अवतरणे घेऊन त्यांनी केलेला अर्थच कसा बरोबर आहे हे दाखवितात तर अरविंद साधन करून तो अर्थ सांगतात. क्रांतिकारी आणि इहलौकिक जीवनातून परमार्थाकडे वळल्याबद्दल लोकांनी त्यांना दोष दिला. तथापि त्यांचे हे करणे कसे बरोबर होते हे त्यांनी लोकांना दाखवून दिले. लो. टिळक सैद्धान्तिक चर्चा (Theoretical discussion) करतात; शिवाय त्यांचे जीवन हा कर्मयोगाचा आदर्श होता. कर्म तर करावेच लागेल. भगवंत म्हणतात 'जन्मकर्मच मे दिव्यम्।' आपणही आपले कर्म दिव्य कसे बनवावयाचे? कर्माचा उगम वासनेत आहे. वासना क्षीण होईल तेव्हां कर्म क्षीण होईल; आणि वासना केवळ भगवंताच्या चिंतनानेच क्षीण होईल. फलासक्ति, ममता आणि अहंकार यांचा त्याग करून कर्म केले पाहिजे. नाम ही इतर विषयांसारखी बाहेरून घ्यावयाची गोष्ट नाही. ते आतच आहे. आपण नाम घेतो ते कर्मच होते. या संबंधात पू. बाबांनी एक जुनी गोष्ट सांगितली. श्रीमहाराजांनी एका साधकास विचारले की नाम हे तुमचे कर्म आहे की धर्म आहे? तेव्हां ते म्हणाले धर्म (कर्तव्य या अर्थाने) आहे. श्रीमहाराज म्हणाले, नाम हे कर्मही नाही आणि धर्मही नाही, ते परमात्मस्वरूप आहे. पू. बाबांनी विचारले, खरोखर आपल्याला तसे वाटते का?

साधक प यांना पू. बाबांनी विचारले की तुम्ही काही वेळा नाम चांगले होते म्हणता; चांगले म्हणजे नेमके काय होते?

**साधक प** : चांगले म्हणजे नेमके काय ते सांगता येणार नाही. पण असे नामस्मरण व्हावे असे वाटते आणि ते आपल्या हातात नाही हेही समजते. काही प्रमाणात स्वत:चा विसर पडतो असे म्हणता येईल.

**पू. बाबा** : म्हणजेच नाम घेताना काळाचे भान सुटले पाहिजे.

**साधक ज** : मनातील इतर विचार शांत होऊन केवळ नामातच चित्त लागते तेव्हां चांगले वाटते. अशा वेळी डोळे मात्र मिटलेले असावे लागतात. बाहेरच्या आवाजांचा विशेष त्रास होत नाही. पण डोळे उघडे असले तर चित्त एकाग्र होत नाही.

**साधक ड** : नाम घेतांना झोप नसते पण झोपेसारखीच ताणरहित स्वस्थ अवस्था असते. मन शांत असते.

**साधक प** : हे बरोबर आहे. आज मी नामस्मरण करतो ते इतर कर्मासारखेच होते. मी नाम घेतो यातील 'मी' गेल्याखेरीज खरे नामस्मरण होणार नाही.

**पू. बाबा** : आज नाम घेऊन मला दुसरे काहीतरी साधावयाचे आहे असे वाटते. म्हणजे आज नामाला instrumental value (साधन-मूल्य) आहे ती गेली पाहिजे. नाम हेच सर्वस्व वाटले पाहिजे. त्या दृष्टीने पाहता एक तर भाऊसाहेबांसारखे व्हावे - नाम का घेता? श्रीमहाराजांना आवडले म्हणून - नाहीतर ब्रह्मानंदांसारखे बाकीच्या विद्येत काही अर्थ नाही हे पटून केवळ नामाला वाहून घेता आले पाहिजे. नाम हा शब्द आहे आणि ह्या वैखरीतील शब्दाच्या शक्तीचा देखील परेशी (परावाचेशी) संबंध आहे.

**साधक ग** : कर्माचा उगम वासनेत आहे आणि वासनारहित कर्म करावयाचे या म्हणण्यात अंतर्विरोध नाही कां?

**पू. बाबा** : नाही; असे कर्मच दिव्य कर्म होऊ शकते. तुकाराम महाराजांनी सांगितले आहे ''नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि। व्यभिचारबुद्धि न पवतां॥''

**पू. बाबा (साधक ब यांना)** : तुमची नेहमी तक्रार असते की ऑफिसात किंवा दिवसा नाम चांगले होत नाही. याचे कारण अद्यापि नामस्मरण कालाधीन आहे. ते साधन वाटते. ते तसे वाटू नये यासाठी तुम्ही म्हणता की निदान अंधारात 'त्यांचा' शब्द कानी यावा. पण त्यासाठी प्रार्थना करणे येवढेच आपल्या हाती आहे. शरणागति हे केवळ शब्द होतात. सार्त्रने म्हटले आहे, Man is condemned to know, condemned to suffer and condemned to responsibility. आपण यातून बाहेर पडतच नाही. मांजराचे सोंग दिलेल्या कुत्र्यासारखे आपले होते. प्रसंग आला की आपण मागे हटतो. प्रत्यक्ष श्रीमहाराज दिसूनही भुरळ पडते.

ह्या संदर्भात पू. बाबांनी श्रीमहाराजांच्या चरित्रातील श्री. आण्णासाहेब मनोहरांचे जावई वारल्यानंतरची आगगाडीत श्रीमहाराजांनी दिलेल्या दर्शनाची आणि नाशिकच्या जोशी यांना श्रीमहाराजांनी दिलेल्या दर्शनाची अशा दोन गोष्टी सांगितल्या. श्रीमहाराजांच्या चरित्रात हे प्रसंग दिलेले आहेत.

साधक क यांनी पॉंडिचरीच्या 'मदर' यांची काही वचने वाचून दाखवली. त्या म्हणतात की साधन जमून देहाचा विसर पडला की तुम्ही सच्चिदानंदाच्या जाणिवेत प्रवेश करता. मग तीन मिनिटांच्या अशा स्थितीत झोपेतल्या आठ

तासांइतकी विश्रांती मिळते. साधक क म्हणाले, याच्या उलट आम्हाला जास्त वेळ नामस्मरण केले की थकवा येतो.

**पू. बाबा** : याचे कारण आपले नाम अद्याप मेंदूत चालते. ते हृदयात उतरलेले नाही. खरे नामस्मरण देहबुद्धीच्या पलीकडे आहे.

## ।१३१। (१६ मार्च १९९०)

पू. बाबांनी **The Mind of the cells** या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. पहिल्या उताऱ्यात मदर म्हणतात की मी सदैव नामातच राहते. काल मी चालत असतांना नामाने मला सर्व बाजूंनी व्यापले. माझ्या सभोवती परमात्मा होता. कोणत्याही समस्या राहिल्या नव्हत्या. केवळ त्याचे अस्तित्व होते. दुसऱ्या उताऱ्यात त्या म्हणतात की मनावर ताबा न मिळवतां केवळ शरीरावर ताबा मिळवू म्हणणारांना माझे आव्हान आहे की त्यांनी तसे करून दाखवावे.

**पू. बाबा** : मी एकदा श्रीमहाराजांना योगमार्गाचे आचरण करू का म्हणून विचारले. श्रीमहाराजांनी विचारले की तुम्हाला विनाकारण कष्ट करायची हौस आहे का? नुसते नाम घ्यावे. श्रीमहाराजांच्या उत्तराने माझे समाधान झाले नाही म्हणून मी त्यांना योगमार्गाचा अवलंब करणारांची उदाहरणे (गु. रानडे) सांगितली. श्रीमहाराज म्हणाले, रानड्यांनी नामाला योगाची जोड दिली. मी सर्व मार्ग चोखाळले. नामस्मरणासारखा मार्ग नाही. योगमार्गात इंद्रियांवर ताबा मिळवून मन ताब्यात आणतात. भक्तिमार्गात मन ताब्यात आणून त्याद्वारे इंद्रियजय केला जातो. मन हे देखील इंद्रियच आहे. त्यामुळे जडाचे नियम त्यालाही लागू आहेत. ते ताब्यात आले की वेगळा इंद्रियजय नको.

**साधक प** : योगमार्गात अहंकार वाढण्याची भीती असते. भक्तिमार्गात मी पुसला जातो.

**पू. बाबा** : भक्तिमार्गात सिद्धींचे वेगवेगळे टप्पे केव्हां येऊन गेले याचा साधकाला पत्ताच लागत नाही. त्यामुळे साधक घसरण्याची भीती कमी असते.

## ।१३२। (२३ मार्च १९९०)

पू. बाबांनी स्कॉट व मेरी ल्युटेन्स यांच्याबरोबर जे. कृष्णमूर्तींचे झालेले काही संवाद वाचून दाखवले. त्यांचा सारांश असा : जे. कृष्णमूर्तींना त्यांचा

अंत केव्हां होणार आहे हे समजले होते. एकदा मेरीने त्यांना त्याबद्दल विचारले असतां अजून दोन वर्षे नाही असे ते म्हणाले होते. धार्मिक संस्थांबद्दल त्यांना वाटे की लोक त्या संस्थांचा मूळ हेतु विसरून केवळ कर्मकांडात गुंतून जातात. बहुतेक संस्थांमधे लोक राख कवटाळतात, ज्वलंत ज्योत अशी क्वचितच आढळते. स्वत:संबंधी ते म्हणाले की गेली सत्तर वर्षे मी लोकांना सांगत आहे. माझे शरीर हे केवळ एक माध्यम किंवा शक्तिशाली **Twelve cylinder engine** आहे. ह्या शरीरातून प्रचंड शक्तीचे संक्रमण झाले. ही शक्ती इतकी अमाप होती की केवळ साधनाने शुद्ध व पवित्र झालेले हे शरीरच त्या शक्तीचे संक्रमण होतांना टिकून राहिले. प्राणायाम, योग इत्यादींद्वारा शरीर चारशे, पाचशे वर्षे देखील टिकवून धरता येते म्हणतात, पण ते खरे नाही. आता हे शरीर जीर्ण झाले आहे; ते पडणारच. आजपर्यंत मी जे सांगितले त्याचे वेगवेगळे अर्थ काढू नका, भाष्ये लिहू नका.

पू. बाबा म्हणाले, मी श्रीमहाराजांना विचारले होते की त्यांचा अंत कधी होणार आहे हे त्यांना माहीत आहे काय? ते म्हणाले होते होय; पण व्यवहारदृष्ट्या ते सांगणे योग्य होणार नाही. सर्व सत्पुरुषांच्या सांगण्यात एक समान सूत्र आढळते. ते दृश्यापलीकडे गेलेले असतात.

पू. बाबा म्हणाले, हे सगळे ठीक आहे. पण ह्या सगळ्याचा आपल्या प्रगतीच्या दृष्टीने काही उपयोग आहे काय? आपली प्रगती का होत नाही याचा विचार केला पाहिजे.

**साधक प** : जोपर्यंत मी साधन करतो हा भाव आहे तोपर्यंत प्रगती होणार नाही. कृपा आधी होते की 'मी' आधी जातो आणि मग कृपा होते याबाबतीत असे म्हणता येईल की 'मी' गेला की 'तो' आहेच, पण पुन्हा असे वाटते की 'त्याची' कृपा झाल्याखेरीज 'मी' जाणार नाही. हा विरोधाभास राहणारच, कारण 'तो' कोठून बाहेरून आणावयाचा नाही. ह्यासाठीच सत्संग पाहिजे.

**पू. बाबा** : सत्पुरुषांना त्यांच्या कार्याची जाणीव असते. ''आम्ही वैकुंठवासी। आलों याचि कारणासी। बोलिले जे ऋषी। साच भावें वर्ताया॥'' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. आपले जगातील कार्य लहान असेल, अगदी नगण्य असेल, पण जी शक्ती सत्पुरुषांच्या माध्यमातून व्यक्त होते तीच आपल्यामधेंही आहे. तथापि आपल्याला मात्र तसे वाटत नाही. ते वाटू लागले की मन नामात रमेल. नामस्मरण हे परमात्म्याचे स्मरण आहे असे वाटले पाहिजे. नाम पवित्र आहे.

**साधक ब :** राम कर्ता हा भाव स्थिर झाला की नामस्मरणात कष्ट नाहीत.

**साधक क :** परमात्म्याचे दर्शन त्याच्या कृपेखेरीज शक्य नाही. श्रीरामकृष्ण म्हणाले, रात्री पहारा करणारा सोजीर असतो. त्याच्या हातात असा दिवा असतो की तो तो दिवा जिकडे वळवील तिकडे उजेड पडतो. पण दिवा फिरवणारा तो सोजीर मात्र स्वत: दिसत नाही. पण तुम्ही शरण जाऊन त्याला तो दिवा स्वत:कडे फिरवावयास बिनवलेत तर तो तसे करतो आणि मगच तुम्हाला तो दिसतो.

**पू. बाबा :** माझ्यापुरते म्हणाल तर "माळियें जेउते नेलें। तेउतें निवांतचि गेलें। तया पाणियाऐसें केलें। होआवें गा॥" ही बाराव्या अध्यायातली ओवी माझ्या हृदयात घर करून राहिली आहे. नाम घेता घेता सद्गुरूंवर त्या पाण्याइतके सोपवता आले पाहिजे. 'मी' पूर्णपणे विरघळला पाहिजे.

## ।१३३। (३० मार्च १९९०)

**पू. बाबा :** पूर्वी दर रविवारी नियमित येणारे एक साधक आता म्हातारपणामुळे येऊ शकत नाहीत. काल ते त्यांच्या नातवाला घेऊन आले होते. चांगले साधक आहेत. नामस्मरण करताना शरीर हलके झाल्याचा त्यांना अनुभव येतो. अलीकडे काही वेळा शरीरातून बाहेर पडलो आहोत असे वाटते पण अशा वेळी पुन्हा शरीरात येता येईल की नाही असे वाटून भीती वाटते. मी त्यांना म्हणालो की समजा ह्या वयात येता आले नाही तर काय बिघडणार आहे? ते म्हणाले, असे कसे; अजून नातवाचे लग्न व्हावयाचे आहे. ह्या डिसेंबरात योग आहे. पहा, साधनात प्रगती होऊनही संसारात जीव कसा गुंततो ते!

ममत्व गेल्याखेरीज साधन होणार नाही, पाऊल पुढे पडणार नाही असे सांगून पू. बाबा म्हणाले, पहा, शेजारीच ट्यूब वेल् काढायचे काम चालू आहे. किती खोल जावे लागेल, पाणी लागेल की नाही इत्यादी काळजी ट्यूब वेल् खणून घेणारांना आहे. शेजारीच काम चालू असल्यामुळे मला आवाजाचा त्रास होतो आहे, पण चिंता नाही कारण ममत्व नाही.

सत्संगाबद्दल गोष्टी निघाल्या. पू. बाबा म्हणाले की संतांजवळ राहूनही कित्येकदा त्यांचा मोठेपणा, त्यांची सर्वज्ञता आपल्या ध्यानी येत नाही. ह्या बाबतीत माझेच दोन अनुभव सांगतो.

१) आमची आई सीरियस आहे अशी तार आली म्हणून विमानाने सिकंदराबादला जायचे ठरवले. सकाळी लवकर विमान होते. श्रीमहाराज म्हणाले की आंघोळ केली नाही तरी चालेल. मला वाटले की पहाटे फार लवकर आंघोळ करावी लागेल म्हणून श्रीमहाराज तसे म्हणाले असावेत. म्हणून मी म्हणालो की मला लवकर आंघोळ करायची सवय आहे. नंतर पुन्हा एकदा श्रीमहाराजांनी आंघोळ केली नाही तरी चालेल म्हणून सांगितले पण मी तिकडे लक्ष दिले नाही. घरी पोचलो त्यापूर्वीच आई गेलेली होती. मग कोठे श्रीमहाराज असे का म्हणाले याचा मला उलगडा झाला.

२) आमच्या वडिलांना पॅरेलिसिसचा ॲटॅक आला होता. तार आल्यावर मी हैद्राबादला जायला निघालो. श्रीमहाराजांना विचारले की वडिलांना काय सांगू? श्रीमहाराज म्हणाले, बरे वाटेल म्हणून त्यांना सांगावे पण आपण जगरहाटी ओळखून समाधान मानावे. श्रीमहाराज असे का म्हणाले ते मला समजले नाही. पण मी तेथे पोचण्यापूर्वीच वडील गेलेले होते.

**साधक ज** : सत्पुरुष असे गूढ का बोलतात? स्पष्ट का सांगत नाहीत?

**पू. बाबा** : ते स्पष्ट बोलले तर आपल्याला सहन होणार नाही. ज्यांची तितकी तयारी असेल त्यांना संत स्पष्टपणे सांगत असतीलही.

लक्षात ठेवा, परमार्थ हे एक ॲडव्हेंचर (adventure) आहे आणि आज ते करण्याचे आपले धाडस नाही. साधक क नेहमी म्हणतात की साधनात जीव रमण्यास त्याची कृपा पाहिजे आणि साधनमार्गातच कोठेतरी aperture (रंध्र) आहे. ते कोठे आहे ते माहीत नाही पण त्यातून पाहू तेव्हांच तो कोण हे समजेल. यासाठी सत्संग पाहिजे. मी करून होत नाही हे समजून खरी शरणागति आली की हे aperture उघडेल.

साधनासाठी एकांत पाहिजे पण तो घरातच शोधला पाहिजे कारण आता बाहेर कोठेतरी जाऊन तेथील एकांत सहन होणार नाही. भीतीने आपल्याला पकडले आहे. देह म्हणजेच मी ही भावना जात नाही तोपर्यंत निर्भयता येणार नाही. देहदु:ख असेल पण दु:खी होऊ नये. औषधपाणी करून त्याला गप्प बसण्यास. सांगावे.

**साधक प** : शरण जाऊन नाम घेणे हे आपले काम. ते आपण मनापासून केले तर त्याला यावेच लागेल.

**पू. बाबा** : नाम कसे घ्यावे तर ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितल्याप्रमाणे. ते म्हणतात 'स्तन्यालागोनी पाही। बाळातें अनवसरू नाही॥' केव्हांही पहा नाम

चालू आहे. तान्हे मूल आईवर अवलंबून असते तसे भगवंतावर सोपवून द्यावे. त्या बाळासारखी नामाची भूक लागली की काम झाले!

## |१३४| (६ एप्रिल १९९०)

**साधक** : सध्या श्वासोच्छ्वासाचा त्रास होतो. झोप लागत नाही. त्यामुळे जप चांगला होत नाही.

**पू. बाबा** : आपले सर्व साधन देहाच्या स्वस्थतेवर अवलंबून राहते. देहाला थोडे कमीजास्त झाले की साधनात लक्ष लागत नाही. देहाला योग्य ते औषधपाणी केले की मग साधन व्हावयाला काय हरकत आहे? पण आपले मन तेवढे ताब्यात राहात नाही. खरे म्हणजे देह सीमित आहे तर मन व्यापक आहे. असे असूनही आपले मन देहात गुंतलेले आहे. वास्तविक देह मनाच्या ताब्यात राहिला पाहिजे. त्यासाठी अभ्यास केला पाहिजे.

एका जर्मन तत्त्वज्ञान्याने म्हटले आहे की हे विश्व नियमबद्ध आहे. आपण ते नियम समजून घेतले पाहिजेत. ते समजले की घडणाऱ्या घटनांचे खरे आकलन होऊन मग त्यांपासून सुखदु:ख निर्माण होणार नाही. घटना सार्वजनिक असोत किंवा व्यक्तिगत जीवनातील असोत, त्या नियमबद्धच असतात.

कार्ल पॉपर हा तत्त्वज्ञ म्हणतो की तार्किक सत्य आणि व्यावहारिक सत्य यात तफावत असू शकते. ज्या विधानाचे तार्किक खंडन करता येणार नाही त्याला तार्किक अथवा वैज्ञानिक सत्य म्हणता येणार नाही. उदाहरणार्थ, ईश्वर सर्व काही माणसाच्या भल्यासाठी करतो असे आपण मानले आणि एखाद्याला दु:ख सोसावे लागत असले तर ते देखील त्याच्या भल्यासाठी आहे असे म्हणणे हे तार्किक सत्य ठरणार नाही. असे म्हणणे म्हणजे सर्व काही प्रारब्धानुसार घडते असे म्हणण्यासारखे आहे. खरे म्हणजे जीवनातील सर्व घटना प्रारब्धानुसार घडतात. देहाची गती प्रारब्धाने ठरते. तथापि आपला प्रारब्धावर पूर्ण विश्वास का नाही?

**साधक प** : प्रारब्धाच्या सिद्धान्तावर विश्वास ठेवणे अवघडच जाते. आज ज्याचे कारण समजलेले नाही त्याला आपण प्रारब्ध म्हणतो.

**साधक ग** : माझा प्रारब्धावर विश्वास नाही कारण त्यासाठी मला पुनर्जन्म मान्य करावा लागतो. पुनर्जन्म आहे असे मी ऐकले, वाचले असले तरी त्याच्यावर खरा विश्वास नाही. माझे आजचे जगणे हे सत्य आहे. पूर्वीचे

आणि पुढे येणारे जन्म हे केवळ अनुमान आहे. तसेच पुनर्जन्म मान्य केला तरी ह्या जन्मी मी दु:ख भोगतो कारण मी मागच्या जन्मी पाप केले. पण मग मागच्या जन्मी जे भोगले त्याचे कारण त्याच्याही मागच्या जन्मात शोधावे लागते आणि मग अनवस्था प्रसंग येतो.

**पू. बाबा** : तसे नाही. आपण प्रारब्धाचा सिद्धान्त सांगतांना प्रयत्नांनाही महत्त्व देतोच. 'यत्न तो देव जाणावा' असे समर्थांनी म्हटले आहे. म्हणून एक तर घडते ते ईश्वरी नियमानुसार घडते आहे. ते तसेच घडणार म्हणून स्वस्थ राहावे नाहीतर आपले कर्तृत्व विसरून राम कर्ता हा भाव दृढ करावा. त्याखेरीज साधनाचा देहाशी असलेला संबंध कमी होणार नाही.

**साधक प** : पाहिजे तर पहिला ज्ञानमार्ग आणि दुसरा भक्तिमार्ग म्हणू. तथापि हा किंवा तो असा कोणता तरी एकच मार्ग शक्य आहे असे न मानता दोन्हींचेही आचरण करण्याचा प्रयत्न करावा. ज्ञान आणि भक्ती यांची सांगड घालणे शक्य आहे. राम कर्ता आहे. त्याने नियम केले आहेत, त्याप्रमाणे सर्व घडते असे मानायला काय हरकत आहे?

**पू. बाबा** : हा सर्व प्रयत्न करावयाचा, साधन करावयाचे ते मन शांत व्हावे म्हणून.

**साधक प** : मन शांत करणे महत्त्वाचे आहे हेच सामान्यत: लक्षात येत नाही आणि म्हणून मनाला सारखे नवे नवे व्याप लोक लावत असतात. जपाला बसले की नको ते विचार मनात येतात. ते थांबवले पाहिजेत हेही समजते पण ते थांबत नाहीत.

**साधक ज** : व्यवहाराचे महत्त्व कमी होऊन नामाचे महत्त्व वाटू लागल्याशिवाय हे घडणार नाही. त्यासाठी वैराग्य आवश्यक आहे.

## **|१३५|** (१३ एप्रिल १९९०)

आम्ही गेलो तेव्हां पू. बाबा वेगळ्याच जगात असावे. एकदम म्हणाले, 'साधन होत नाही म्हणजे काय? संसारावर निखारा ठेवला पाहिजे. त्याखेरीज साधन होणार नाही.' मात्र लगेच ते आमच्या पातळीवर येऊन बोलू लागले.

**पू. बाबा** : कित्येकदा वाटते की जास्त न शिकलेली माणसेच निष्ठावान असतात. फार शिकलेल्यांची श्रद्धा वरवरची असते. येथे येणाऱ्या एका गृहस्थांना दमा खोकला होता. अतिशय कासावीस होत. एकदा गुरुपौर्णिमेच्या

आदल्या रात्री कासावीस झाले. काय करू ते श्रीमहाराजांना विचारा म्हणाले. श्रीमहाराजांना (पेटीवर) विचारले तेव्हां श्रीमहाराजांनी त्यांना बर्फाचे पाणी प्यायला सांगितले आणि तसे केल्यावर त्यांना शांत झोप लागली. पू. तात्यासाहेब म्हणत, श्रीमहाराजांच्या सांगण्यात इतकी उत्कटता असते की ते सांगतात त्याबद्दल ऐकणाराच्या मनात संशय राहातच नाही.

दुसऱ्या एका गृहस्थांना कंपवात झालेला होता. त्यांचा पंजा एकसारखा हालत असे. ते पाहून पू. तात्यासाहेब म्हणाले की ते कशात काही अर्थ नाही असे म्हणतात! खरोखर लोकांची ही अवस्था पाहून हे आपल्यालाही होऊ शकते हे लक्षात येऊन साधनात वाढ झाली पाहिजे.

**साधक क** : जन्म, मृत्यु, जरा, व्याधी यांच्याकडे दोषदृष्टीनेच पाहिले पाहिजे. ह्यामधें आपला घात आहे हे ओळखून साधन जलद केले पाहिजे. दुसऱ्याचा आजार किंवा मृत्यू पाहून फक्त गौतमबुद्ध शिकला.

**साधक प** : हे आवश्यक आहे; पण साधन करताना मात्र 'मी' गेला पाहिजे. आणि 'मी' निश्चय करून होणारी ती गोष्ट नाही.

**साधक क** : समजा एखाद्याने म्हातारपणापर्यंत पुरेल येवढा पैसा मिळवून ठेवला आणि आता नोकरी सोडावी असे वाटत असले पण निश्चय होत नसला तर गुरूंनी त्याला नोकरी सोड म्हणून सांगावे.

**पू. बाबा** : तसे नाही. हा निर्णय ज्याचा त्यानेच घेतला पाहिजे.

**साधक ग** : सवड मिळाली की साधन करेन असा कित्येकदा भ्रम असतो.

**पू. बाबा** : सत्याला दुसरी बाजू नसते. एकतर ते असते नाहीतर नसते. सत्य एकदम प्रकाशते. अज्ञान फार तर हळू हळू दूर होईल.

**साधक ज** : अज्ञान नाहीसे का होत नाही?

**पू. बाबा** : यावर विचार करण्यापेक्षा सतत रामनाम घ्यावे म्हणजे अज्ञान आपोआप नाहीसे होईल.

**साधक प** : कदाचित एकसारखे नामस्मरण होणार नाही. पण सर्व कामे चालू असतांना भगवंताची आठवण, त्याचे भान ठेवणे शक्य आहे.

**पू. बाबा** : होय. यालाच अनुसंधान म्हणतात. श्रीमहाराज म्हणत, नाम घेतांना आपण नाम कशासाठी घेतो त्याची अखंड जाणीव असावी. ही जाणीव अखंड ठेवणे, मी भगवंताचा आहे हे जाणणे याचे नांव अनुसंधान ठेवणे.

## ।१३६। (२० एप्रिल १९९०)

**पू. बाबा :** सत्प्रेम यांनी लिहिलेल्या The Mind of the cells मधें मदरनी म्हटले आहे की त्या श्रीअरविंदांनी दिलेल्या मंत्राचे स्मरण करू लागल्यांनतर लवकरच त्यांना असा अनुभव आला की देहातील प्रत्येक पेशी (tiny cell) प्रतिक्षण मंत्रजप करीत आहे. पेशींचा हा मंत्रघोष (chorus) एकसारखा चालू आहे. प्रत्येक पेशीचा जप तर समजतोच पण चर्चमधें लहान मुलांचा समूह (choir) गात असल्याप्रमाणे ह्या पेशींचे मंत्रोच्चारण चालू आहे. देह आनंदाने भरला आहे, इत्यादी. मदरची वर्णन करण्याची शैली फार चांगली आहे. आपल्या संतांनीही अशा प्रकारचे अनुभव सांगितलेले आहेत. मला वाटते की आता चर्चा संपून असे अनुभव आले पाहिजेत. चर्चेने काय हाती लागणार? पुन्हा सांगतो, मनाने संसारावर तुळशीपत्र ठेवल्याखेरीज परमार्थ होणार नाही.

पू. बाबा म्हणाले, ह्या आठवड्यात एक गृहस्थ मला भेटायला आले होते. त्यांनी विचारले की उपासना करताना ईश्वराचे अस्तित्व जाणवून त्याचे प्रेम कसे येईल? मी त्यांना मला माहीत नाही म्हणालो पण ते ऐकेनात म्हणून मग कृष्णप्रेम यांनी श्री. गोपाल मुझुमदार यांना लिहिलेले पत्र वाचून दाखवले. त्यांनी ते पत्र उतरवून घेतले आणि म्हणाले की माझे काम झाले.

कृष्णप्रेम म्हणतात की भगवंताबद्दल प्रेम वाटू लागण्यासाठी सत्संगतीची आणि गुरूची आवश्यकता आहे. गुरूवर निष्ठा पाहिजे. गुरूही असा पाहिजे की त्याने आपले सर्वस्व भगवंताला दिलेले आहे. नाहीतर फसगत होण्याची शक्यता असते. तुम्ही सर्व भार त्याच्यावर टाकलात की प्रेम आपोआप येते. त्यासाठीच सर्वकाळ भगवंताचे चिंतन पाहिजे. जीवनात दुसरे काहीही महत्त्वाचे वाटता कामा नये. सर्वकाळ भगवंताचे चिंतन करण्याच्या आड काय येते याचा सतत विचार केला की कारण सापडते व ते निग्रहपूर्वक दूर करावे लागते. असे करतांना तुमचे मन कदाचित तुम्हाला फसवेल पण 'तो' फसणार नाही. शेवटी त्यांनी एक विरोधाभास सांगितला आहे. भगवंताला पाहिल्याखेरीज त्याचे प्रेम येणार नाही; त्याचे प्रेम आल्याखेरीज भगवंत दिसणार नाही. ते म्हणतात की ह्या विरोधाभासाची उकल प्रत्येकाने स्वतः करावयाची आहे. (Until you see you cannot love : until you love you cannot see. Crack your teeth on that. There is an answer. Find it.)

पत्र वाचून दाखवल्यानंतर पू. बाबांनी विचारले की इतके दिवस खटपट करूनही आपल्याला का साधत नाही? मन एकाग्र का होत नाही?

**साधक प** : चंचलपणा हाच मनाचा धर्म आहे आणि दृश्य खरे वाटत असल्यामुळे मनाची तिकडे धाव आहे.

**साधक ग** : दृश्याचा आधार वाटतो. तो जेव्हां सुटेल तेव्हां कदाचित मन भगवंताकडे वळून स्थिर होईल.

**साधक प** : तुकाराम महाराजांच्या बाबतीत हेच झाले.

**पू. बाबा** : तथापि सांसारिक आपत्ती येणाऱ्या प्रत्येकाच्या बाबतीत असे घडत नाही. तुकोबांची संसार खोटा अशी खात्री झाली.

**साधक ज** : मन हे जड असल्यामुळे त्याचा सर्व विचार देहाला धरूनच असतो. त्याचे ऐकावयाचे नाही असाच निश्चय करावा लागेल.

**साधक प** : मन म्हणताना आपण गोंधळ करतो. मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार यांचा वेगवेगळा विचार केला पाहिजे.

**पू. बाबा** : मन ही executive authority (कार्यकारी सत्ता) आहे. बुद्धीने निश्चय केला की तो अंमलात आणावयाचे काम मनाने करायचे आहे.

**साधक प** : यासाठी लागणारे आमचे मन कमकुवत आहे. एका दृष्टीने असे म्हणता येईल की ते बळकट आहे. ते बुद्धीचे ऐकत नाही.

**साधक क** : माझ्या जीवनातील प्रत्येक गोष्ट भगवंत करतो हा भाव टिकविता आला तर मन शांत होईल. त्याची चंचलता आपोआप थांबेल.

**साधक प** : मन नेहमीच अशांत असते; शांत असले तर ते मनच नाही. राम कर्ता हे इतके दृढ व्हावयास पाहिजे की माझा हात वरखाली करणे देखील त्याच्या सत्तेने घडते आहे असे आतून वाटले पाहिजे.

**साधक भ** : डॉ. पाथरकरांना अर्धांग झाले तेव्हां श्रीमहाराजांनी त्यांना विचारले कीं तुम्ही आपल्या हाताने जेवत होतात मग आता हा हात तोंडात घास का देत नाही?

**पू. बाबा** : डॉ. पाथरकर तंबाखू (भुसकट) देखील श्रीमहाराजांना दाखवून खात तेव्हां थोडे विचित्र वाटे. पण आता लक्षात येते की जीवनातली प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून आणि दाखवून केली पाहिजे. आणि ते जर हृदयातच आहेत तर त्यांना न कळत तुम्ही काय करणार?

पू. बाबा पुढे म्हणाले, मनाला ताब्यात कसे आणावे याचा अभ्यास गीतेत सांगितला आहे आणि हा अभ्यास करून मी सांगतो की आपले रोजचे उठणे, बसणे, खाणे, पिणे, झोपणे इत्यादी क्रिया ह्या इंद्रियांच्या आहेत. ह्या करतांना

भगवंताचे स्मरण का राहू नये ? (गीता अध्याय ५ श्लोक ८ व ९ ) तसेच मन चंचल आहे म्हणून गीता सांगते. म्हणूनच मन आवरायला शिकले पाहिजे (गीता अध्याय ६ श्लोक २६). बरेचदा मन कल्पना करीत असते. त्याला भगवंताची कल्पना करावयाची सवय लावली पाहिजे.

**साधक ग :** एकनाथ महाराजांनी 'हिरेनि हिरा चिरिजे। तेवीं मनेंचि मन धरिजे। इत्यादी सांगितले आहे.

**साधक :** मन आपल्याला पदोपदी फसवते. ते फ्रीज केले पाहिजे.

**पू. बाबा :** ते कसे करायचे ते उदाहरण देऊन सांगा.

**साधक :** समजा, तुम्हाला उद्या काही काम करावयाचे आहे. त्यावर विचार करा. पाहिजे तर काय काय व कसे करायचे ते लिहून ठेवा आणि मग मनाला आता उद्यापर्यंत गप्प बस म्हणून सांगा.

**साधक ड :** या गोष्टीचा, विशेषत: लिहून ठेवले तर त्याचा फार चांगला परिणाम होतो असा माझा अनुभव आहे. मग मन उगीचच त्याच त्या गिरक्या मारीत रहात नाही.

**साधक क :** श्रीएकनाथांनी 'या मनाची एक उत्तम गती' म्हटले आहे.

**पू. बाबा :** होय. 'जरी स्वयें लागलें परमार्थी। दासी करी चारी मुक्ती।' पण स्वत: होऊन ते परमार्थाकडे लागत नाही ना!

**साधक ग :** समर्थ रामदासांइतकी मनाची आळवणी कोणीच केली नसेल.

**पू. बाबा :** होय. अगदी दाढीला हात लावून त्याला समजवावयाचा प्रयत्न केला आहे. आपण प्रयत्नपूर्वक मनाला आवरायला शिकलेच पाहिजे.

**साधक म :** तुकाराम महाराजांनी म्हटलेच आहे की 'होऊं नको कांहीं या मना आधीन। नाइकें वचन याचें कांहीं॥ १॥ 'हटियाची गोष्टी मोडून टाकावी। सोई ही धरावी विठोबांची॥ २॥'

**पू. बाबा :** होय; हे खरे आहे. हा लढाच आहे आणि तो ज्याचा त्याने निराश न होता लढला पाहिजे. आता आपण हरलो अशी आतून जेव्हां खात्री होईल तेव्हां शरणागति येईल. ती आली की उचलून घ्यावयाला तो उत्सुकच आहे. पण माझे कर्तृत्व वाटते तोपर्यंत तो दूरच राहील.

## ।१३७। (२७ एप्रिल १९९०)

आम्ही गेलो तेव्हां एक सत्पुरुष पू. बाबांकडे आले होते. त्र्यंबकेश्वरला असतात. लवकरच तिकडे परत जाणार आहेत. त्यांना गहिनीनाथांचा

साक्षात्कार झाला आहे. पू. बाबा त्यांना म्हणाले, माझे ज्ञानेश्वरांवर फार प्रेम आहे. गुरुपरंपरेप्रमाणे गहिनीनाथ ज्ञानेश्वरांचे आजोबा लागतात. (ज्ञानेश्वर-निवृत्तिनाथ-गहिनीनाथ-गोरक्षनाथ-मत्स्येंद्रनाथ-आदिनाथ) तेव्हां त्यांना माझा नमस्कार सांगा.

ते सत्पुरुष गेल्यानंतर साधनासंबंधी बोलतांना पू. बाबा म्हणाले की आत्ता जे गृहस्थ आले होते त्यांची जीवनपद्धती (life pattern) वेगळी, आपली वेगळी. त्यांनी केले तेच किंवा तसेच करावयास पाहिजे असे नाही. प्रत्येकाची प्रवृत्ती, प्रकृतिधर्म आणि परिस्थिती इत्यादींनुसार साधनात वाढ कशी होईल याचा विचार केला पाहिजे.

**साधक क :** माझ्याशी बोलतांना ते म्हणाले की वर्षातले पंधरा दिवस तरी एकांतात, निसर्गाच्या सान्निध्यात जाऊन राहिले पाहिजे.

**पू. बाबा :** तसे करायला हरकत नाही पण आपल्याला सोसेल तेवढे करावे. सुरुवातीला तरी साधनात एक शिस्त लावून घेतली पाहिजे. एकदा ठरविले की माघार नाही. पण सोसेल, शक्य होईल तेवढेच ठरवावे. आपली काही रमण महर्षीसारखी स्थिती नाही. ते आठ आठ दिवस ध्यानात मग्न असत. देहाचे भान नसे. आपल्याला निदान नामात रंगायला काय हरकत आहे? एक दिवस दुसरे काही करायचे नाही; दिवसभर पोटभर नाम घ्यावयाचे. आता आज पुरे असे वाटले पाहिजे. करून तरी पहा!

पू. बाबा म्हणाले, भगवंत हा केवळ 'आहे.' ज्याला सत् किंवा Being म्हणतात (B capital) ते केवळ अस्तित्व आहे. तथापि ते जड नाही. ते ज्ञानस्वरूप म्हणजेच चित् आहे. या चेतनामय असण्यात जे एकसारखे स्फुरण होते ते स्फुरण म्हणजेच आनंद. हा आनंद शब्दमय ॐकार आहे. ते जगाचे आदिबीज आहे, स्वसंवेद्य आहे. तेच नाम होय. हा संबंध लक्षात घेऊन नाम घेतले पाहिजे. नाम म्हणजेच सत् चित् आनंद. नाम म्हणजेच सत्यं ज्ञानं अनंतं ब्रह्म. आपण आपल्याला आरशात पहातो तेव्हां हा मी नव्हे, माझे प्रतिबिंब आहे अशी जाणीव असते तसे स्वतःच्या देहासंबंधी हा देह म्हणजे मी नव्हे, हे आत्म्याचे प्रतिबिंब आहे असे वाटले पाहिजे. हेच स्वतःकडे साक्षीभावाने पाहणे. याचा अभ्यास करावा.

श्रीमहाराज आणि भाऊसाहेब यांच्यासंबंधीच्या चरित्रात दिलेल्या काही गोष्टी पू. बाबांनी सांगितल्या. तसेच पू. तात्यासाहेबांच्या लीनतेचेही वर्णन केले. नंतर पू. बाबा म्हणाले, आपण साधन करतो पण ते मंद पडत जाते. तसे

होता कामा नये. आता आणखी काही नको अशी मनाची स्थिती जर श्रीमहाराजांनी निर्माण केली तर?

**साधक प** : समाधान मिळाल्यावर दुसरे काय पाहिजे?

नंतर पिपीलिका मार्ग किंवा क्रमयोग आणि विहंगम मार्गाबद्दल बोलणे झाले. पू. बाबा म्हणाले, नाथभागवतातील पिंगलेचे आख्यान मुळातून वाचण्यासारखे आहे. वेश्यावृत्तीने जगणारी स्त्री. कोणी आला नाही तेव्हां निराश झाली आणि विचार करू लागली की परपुरुषाची वाट पहाण्यात मी माझ्यातच राहणाऱ्या पर म्हणजे श्रेष्ठ पुरुषाला - परमात्म्याला विसरून गेले. आता यापुढे मी त्याच्याच चिंतनात राहीन. या आख्यानासंबंधी मी श्रीमहाराजांना विचारले होते तेव्हां ते म्हणाले की ती कोणीतरी पूर्वजन्मीची पुण्यात्माच असणार. काही तीव्र वासनांच्या प्रारब्धाने तिला वेश्येचा जन्म आला होता इतकेच. तो भोग संपल्यावर ती भगवंताकडे वळली. (पहा. अध्यात्म संवाद भाग१ संवाद क्र.४७)

## ।१३८। (४ मे १९९०)

**पू. बाबा** : श्रीमहाराजांच्या बोलण्यात फार खुबी असे. शिवाय जिथे श्रीमहाराज तिथे आनंद; त्यामुळे दु:खी कष्टी लोकांना त्यांच्या सहवासात भेट होताच बरे वाटे. एका गृहस्थांचा मुलगा वारला. ते गृहस्थ आल्यानंतर श्रीमहाराज जीवनातील सुखदु:खांबद्दल बोलू लागले. मधेच त्यांच्याकडे वळून म्हणाले, या हं! तुम्ही आलात का? हे विचारण्यापूर्वीच ते गृहस्थ त्यांच्या दु:खाच्या बाहेर आले होते. दु:ख हलके करण्याची विलक्षण शक्ती श्रीमहाराजांजवळ होती. तीच गोष्ट शंकेची. माणूस आपली शंका विसरून जायचा. एकदा एका गृहस्थांनी श्रीमहाराजांना विचारले की आम्ही काही शंका विचारायचे ठरवून तुमच्याकडे येतो आणि आपण बोलू लागलात की विचारायचे विसरून जातो. मग त्या शंका कोठे जातात? श्रीमहाराज म्हणाले, त्या शंका नाम गिळून टाकते.

योगी श्रीअरविंदांचे मुंबईत व्याख्यान होते. त्यांची काहीच तयारी झालेली नव्हती आणि पुरेसा वेळही नव्हता म्हणून आता काय करू असे त्यांनी त्यांचे गुरु श्री. विष्णुपंत लेले यांना विचारले. ते म्हणाले, व्याख्यानाला उभे राहिल्यावर 'मोकळे' व्हावे आणि मग जे विचार मनात येतील ते सांगावे. त्यांचे व्याख्यान चांगले झाले. ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, साधन करताना 'मी साधन करतो' हे गेले पाहिजे. बोलतांना आपले बोलणे ऐकावे

तसेच नाम घेतांना ते आपल्या कानांनी ऐकावे, नाम चालू आहे पण ते मी घेत नाही हे कळणे म्हणजे अनाहत नाद ऐकू येण्याची पहिली पायरी आहे.

पू. बाबा पुढे सांगू लागले, आपल्या भावना ताब्यात असाव्या. हे विवेकाने जमते. भावनेला आवर बसतो. भावना करावयाची झाली तर आज जे जे माझ्या जीवनात घडते ते श्रीमहाराजांच्या इच्छेने घडते अशी भावना करावी. प्रारब्धाच्या सिद्धान्तापेक्षा हे आचरण्यास सोपे जाईल. खरे म्हणजे हा राजमार्ग (Royal road) आहे. हीच भक्ती आहे. मीपणापेक्षाही काही वेळा नातेवाइकांचे ममत्व आड येते म्हणून आपण आपल्या व्यक्तित्त्वाच्या पलीकडे गेले पाहिजे.

देहाचे प्रेम कमी झाले तर भोगाची वासना आपोआप कमी होईल. वास्तविक आपल्याला देहाचे खरे प्रेम नाहीच. ते असते तर आपण त्याला योग्य ते आणि योग्य त्या प्रमाणात खावयाला दिले असते. त्याची योग्य ती काळजी घेऊन त्याचा गैरवापर टाळला असता. देहापेक्षाही आपले आपल्या वासनांवर प्रेम आहे आणि देहाच्या माध्यमातून त्यांची तृप्ती करून घेण्याची आपली धडपड असते. म्हणून ज्याला वासना कमी, गरजा कमी तो खरा श्रीमंत.

श्रीमहाराज म्हणत की रोगात दमा बरा कारण सुख किंवा दु:ख दमाने भोगावे असे तो शिकवतो! घटनेचे सुख अथवा दु:ख लमेच केले नाही, विवेकाने मन आवरले तर त्याची तीव्रता कमी होते.

## |१३९| (११ मे १९९०)

'अध्यात्म दर्शन' मध्ये पू. बाबांनी एका ठिकाणी म्हटले आहे की विज्ञानाच्या झपाट्याने होणाऱ्या प्रगतीमुळे जगाचे (म्हणजे ज्ञेयाचे) ज्ञान पुष्कळ व्यापक, सुसंगत आणि अंतर्गत विरोधापासून मोकळे होत चालले आहे... विज्ञानाने संपादन केलेला ज्ञानामधील विरोध हा बाहेरचा आहे. दिवसेंदिवस तो कमी होत जाईल... पण ज्ञानाच्या अंतरंगामधें असलेल्या विरोधाचा विचार करावयाला नको काय?

**साधक ग** : बाहेरील विरोध व अंतरंगातील विरोध म्हणजे काय?

**पू. बाबा** : विज्ञान वस्तूच्या बाह्यांगाचा विचार करते आणि तसे करतांना विशेषाकडून सामान्याकडे जाते. दोन वस्तूंमधील किंवा दोन गटांमधील साम्य व विरोधाचा विचार विज्ञान करते. तथापि असे करतांना ज्ञाता आणि ज्ञेय

यांमधील भेद कायमच राहतो. तेव्हां विज्ञानाने होणारे ज्ञान हे भेदावर आधारलेले आहे. याच्या उलट अध्यात्म अंतरंगाचा विचार करते. ते भेदावर आधारलेले नसल्याने ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही शेवटी एकच होतात. या बाबतीत वेदान्त सांगतो की पुरुष शांत आहे. प्रकृती जेव्हां त्याच्यापासून अलग झालीसे वाटते तेव्हां जग निर्माण होते. एकोऽहं बहुस्याम् किंवा एकाकी न रमते इत्यादी वचनांचा अर्थ इतकाच की ब्रह्मामधें किंवा पुरुषामधें संकल्प निर्माण झाला की प्रकृतीचे कार्य सुरू होते. वास्तविक प्रकृती ही पुरुषापासून भिन्न नाहीच.

**साधक ग** : सांख्यांच्या मताप्रमाणे तर प्रकृती जड आहे आणि वेदान्ती म्हणतात की ती शहाणी आहे, तेव्हां यातील फरक काय?

**पू. बाबा** : प्रकृती जड मानली तर कर्तृत्व पुरुषाकडे द्यावे लागेल. पण पुरुष तर काहीच करीत नाही. तो फक्त 'आहे.' प्रकृतीमुळे विश्व घडते. From Being to Becoming. अंतरंगात विरोध नाहीच. पण विज्ञान तो मानते. वास्तविक हा मायेचा प्रभाव आहे.

पू. बाबा पुढे म्हणाले, ह्या सर्व स्पष्टीकरणांपेक्षा भक्तिमार्गातील राम कर्ता हे समजावयास आणि आचरणात आणण्यास जास्त सोपे आहे. वेदान्तानुसार प्रारब्धाचा सिद्धान्त मान्य करावा लागतो आणि तो मान्य केला की माणसाचे कर्मस्वातंत्र्य किती इत्यादी प्रश्न निर्माण होतात. त्यापेक्षा कर्तृत्व रामाकडे दिले की जे जे घडते ते त्याच्या इच्छेने, अशी निष्ठा निर्माण होते आणि सुखदु:खाचे द्वंद्व बाधत नाही. जीवनातील घटना जशा घडावयाच्या तशाच घडतात पण त्यांपासून होणाऱ्या सुखदु:खांपासून भक्त मोकळा होतो. तथापि हे घडण्यासाठी भक्ताला देखील मन काबूत आणावे लागते. कठोपनिषदात म्हटले आहे : ''आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु। बुद्धिं तु सारथिं विद्धि मन: प्रग्रहमेव च॥ इन्द्रियाणि हयान्याहु: विषयाँस्तेषु गोचरान्। आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिण:॥'' मनाच्या ताब्यात इंद्रिये, बुद्धीच्या ताब्यात मन आणि आत्म्याच्या ताब्यात बुद्धी व शरीर राहिली पाहिजेत. मनाचा लगाम सैल सोडला की इंद्रियांचे घोडे हा रथ नेऊन खड्ड्यात घालतील.

### |१४०| (१८ मे १९९०)

आमच्यापैकी एका साधकांचा नातू हॉस्पिटलमधे होता. नुकतेच त्याला घरी आणले असून आता त्याची प्रकृती सुधारते आहे. पू. बाबांनी त्यांना

विचारले की घरच्या या वातावरणात अनुसंधान टिकते का? ते म्हणाले जप पुष्कळ होतो पण मनाची उलघाल कमी होत नाही. आमची शक्ती कमी पडते.

**पू. बाबा** : आपण सर्वकाळ कर्मात गुंतलेले असतो. काहीतरी केल्याखेरीज आपल्याला चैन पडत नाही. कर्म करतांना आपली फळावर नजर असते. फळाची इच्छा गेली तर कर्म करतांना होणारी मनाची ओढाताण थांबेल. पण त्याहीपेक्षा मी जे कर्म करतो ते 'त्याचे' म्हणून करतो आहे असे वाटू लागले तर कर्म होईल पण त्यापासून होणारे सुखदु:ख होणार नाही. आज आपला जसा औषधांवर विश्वास आहे तसा सद्गुरूंवर नाही.

पू. बाबा पुढे म्हणाले, लेस्ली हॉवर्डसारख्या सायकोमेट्रिस्टने (Psychometrist) म्हटले आहे की काळजी व भीती यांमुळे मनाची शक्ती जाते. ते दुबळे बनते. आपली तर काळजी आणि भीती कमी होत नाही. एकदा श्रीमहाराजांनी विचारले की मरणाची भीती का वाटावी? नाम व रूप देहाला आहे. पण नामरूप बदलले तरी स्वरूप तेच राहते ना? मुद्दा स्पष्ट करण्यासाठी पू. बाबा म्हणाले, घटांची नांवे व आकार वेगळे असले तरी त्यांची मूळ वस्तू माती हेच त्यांचे स्वरूप असते. घट आले आणि गेले तरी माती तशीच राहते. काळजी व भीती नाहीशी करण्यासाठी मन साधनात गुंतवून ठेवले पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले की प्रयत्नशून्य झाल्याखेरीज परमार्थ नाही; आणि प्रयत्नशून्य होण्याचा प्रयत्न करावा लागतो. हा एक विरोधाभासच आहे. साधनाने साधत नाही अशी खात्री होईपर्यंत साधन करावेच लागते.

श्रीमहाराज बोलण्यात मोठे चतुर होते. ते बोलत त्याचा खोल अर्थ एकदम लक्षात येत नसे इतके ते साधे वाटे. पण तो साधेपणा फसवा असे. त्यांच्या बोलण्याचे deceptively simple असे एकांनी यथार्थ वर्णन केलेले आहे. संभाषणात श्रीमहाराज वरवर साधे वाटणारे प्रश्न विचारत आणि त्यांचे उत्तर देणारा नकळत खोड्यात सापडत असे. उदाहरणार्थ, एकदा त्यांनी विचारले की घरात वस्तू भरणे सोपे की घरातल्या काढून टाकणे सोपे? ऐकणाराने उत्तर दिले की अर्थात काढून टाकणे सोपे; कारण किती वस्तू भरावयाच्या याला अंतच नाही. यावर श्रीमहाराज म्हणाले, असे जर आहे तर माझ्यावर भरंवसा ठेवून सर्व काढून टाका.

श्रीमहाराजांचे आपण कसे ऐकत असू आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणे वागण्यातच हित आहे असा अनेकदा कसा प्रत्यय आला यासंबंधी पू.

बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. ते म्हणाले, त्यावेळी आम्ही गिरगांवात रहात होतो. ह्या (ती. सौ. आई) सात महिन्यांच्या गरोदर होत्या. उद्या तुम्ही दोघे हैदराबादला जा असे श्रीमहाराजांनी सांगितले. रिझर्वेशनचा प्रश्नच नव्हता. आम्ही सर्व तयारी केली, मालकाला घराची किल्ली दिली व दोघेजण मद्रास मेलने जाण्यासाठी बोरीबंदरला गेलो. गाडी सुटायला जेमतेम पाच मिनिटे राहिली होती. प्लॅटफार्मवर जाण्यासाठी पंचवीस तीस माणसे उभी होती पण तिकीट चेकरने त्यांना थांबवले होते. आमचा हमाल पुढे झाला आणि त्याच्या मागोमाग आम्ही दोघे आत गेलो. इतक्यात गाडीची शिट्टी झाली म्हणून समोर होता त्याच डब्यात आम्हाला हमालाने चढवले. तो डबा इंटर क्लासचा होता. आमच्याजवळ तर थर्ड क्लासची तिकिटे हेती. डब्यातच टी. सी. होता. त्याने आम्हाला बसावयाला जागा करून दिली आणि पुढे कुर्डुवाडीला त्याची ड्यूटी संपत होती तेथे थर्डक्लासमधे जायला सांगितले. ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, आपल्या सर्व अडचणी देहबुद्धीतून येतात. आजचा माणूस मेंदूला फार महत्त्व देतो.

**साधक प :** वास्तविक सायकोमेट्रिस्ट ज्या मनाचा अभ्यास करतात त्याची मेंदूत निश्चित स्थाने आहेत. परमार्थाआड येणारे मन हे त्यापेक्षा काहीतरी वेगळे असावे. कारण-देहात वासना खोल असतात. वासना अतृप्त राहिल्यामुळे आपला पुन:पुन्हा जन्म होतो. अतृप्त वासना हे जन्माचे कारण असून त्या ज्या देहात असतात तो कारणदेह.

**पू. बाबा :** हे खरे आहे. एकदा श्रीमहाराजांनी एका डॉक्टर साधकांना विचारले की माणसाचे जीवन कोठून नियंत्रित होते? ते म्हणाले, मेंदूतून. तेव्हां श्रीमहाराजांनी विचारले की आईच्या गर्भात मूल असते तेव्हां त्याचे जगणे कोठून नियंत्रित होते? अर्थात बेंबीतून. तेव्हां बेंबीपाशी वासना असतात आणि त्या आपल्या जीवनावर सत्ता गाजवतात.

**साधग ग :** म्हणूनच श्रीमहाराजांनी एका प्रवचनात, बेंबीच्या देठापासून नाम घ्यावे असे म्हटले असावे.

**पू. बाबा :** होय, त्याखेरीज ते वासनांच्या मुळापर्यंत पोचणार नाही. श्रीमहाराज म्हणत, परमार्थ सुलभसाध्य आहे, कष्टसाध्य नाही. पण ही सहजता यावयाला आपण मन आवरावयाला शिकले पाहिजे. हा अभ्यासच आहे.

**साधक प :** आपले ध्येय निश्चित ठरत नाही त्यामुळे हा विवेक येत नाही.

**साधक म :** हे म्हणणे बरोबर नाही. विवेकाखेरीज ध्येयनिश्चिती कशी होईल?

**साधक ग :** जीवनाचे ध्येय निश्चित ठरत नाही याचे कारण जीवनाचे निश्चित ध्येय ठरविणे आम्हाला माहीतच नाही. आम्ही प्रवाहपतित आहो.

**साधक प :** वासनेप्रमाणे जन्म येतो. उदाहरणार्थ, ज्यांची मरतांना गाण्याची तीव्र वासना राहते ते गाण्याला अनुकूल परिस्थितीत जन्म घेत असावे. आमची भोगाची वासना प्रबळ आहे, ती नाहीशी केली पाहिजे.

**पू. बाबा :** मोठमोठे शास्त्रज्ञ प्रयोगशाळांत स्वत:ला विसरून जातात. त्यांना त्यांची उपकरणे (apparatus) तरी लागतात. नामस्मरणाला तशी दुसरी कशाचीही गरज नसतांनाही ते का जमत नाही?

**साधक ग :** म्हणूनच जमत नाही. आम्हाला कर्माची सवय आहे. काही साधन असले की त्याबरोबर कार्य करता येते. त्यात मन रमते. येथे हाताशी काहीच नाही. नाम उपाधिरहित आहे आणि आम्हाला तर उपाधींशिवाय जगणे माहीत नाही. त्यामुळे नामस्मरण जास्त अवघड आहे.

**पू. बाबा :** ध्येयनिश्चिती आणि विवेक यांपैकी आधी काय हे ठरवतांना चक्रापत्ति (circular reasoning) येते. आजचे माझे जे जीवन आहे ते समाधानाचे नाही असे वाटून विचार सुरू झाला की विवेक जागृत होईल. एकदम निश्चित ध्येय ठरणार नाही पण त्या दिशेने वाटचाल सुरू होईल. त्यासाठी नामस्मरण हेच साधन आहे. पतंजलींनी म्हटले आहे की साधकाची ऋतंभरा प्रज्ञा जागृत होते. गु. रानड्यांनी ऋतंभरा प्रज्ञा म्हणजे Intuition चे Truthful mind असे छान भाषांतर केले आहे. ऋतंभरा तत्र प्रज्ञा॥ १.४८॥ पण त्यासाठी निर्विचार व्हावे लागते. नव्हे, त्यात प्राविण्य मिळवावे लागते. (निर्विचार वैशारद्येऽध्यात्म प्रसाद:॥ १.४७॥) नामस्मरणाचा अखंड प्रवाह सुरू झाला म्हणजे बाकीच्या भावना, कल्पना, विचार, स्मृती इत्यादी त्यात बुडून जातात.

**साधक ग :** आमच्या नामस्मरणाचा कधीच प्रवाह नसतो. उगीच क्षीण धार असते इतकेच. त्यामुळे त्याचा प्रगतीच्या दृष्टीने काहीच उपयोग होत नाही.

**पू. बाबा :** पण मग हे साधायचे कसे? उगीच सत्संग पाहिजे वगैरे उत्तरे नकोत. तो मिळणे दुर्लभ आहे; पण सद्ग्रंथांचे वाचन करावे आणि एकसारखे त्या विचारात राहावे. जेवढा मोकळा वेळ मिळेल त्या वेळात नामस्मरण करावे. असे करायला काय हरकत आहे?

**साधक प** : तेच जास्त कठीण आहे. आपले रोजचे जीवन सवयींनी बांधलेले आहे. त्या सवयी प्रयत्नपूर्वक बदलाव्या लागतील.

**साधक ड** : पण तसे करण्याखेरीज दुसरा मार्ग नाही.

**पू. बाबा** : साधनाच्या बाबतीत देखील शब्दांनी किती व कसे सांगणार? ज्ञानेश्वर महाराज देखील अमृतानुभवाच्या शेवटी म्हणतात की संवित् म्हणजे जाणिवेचे ह्यापेक्षा जास्त वर्णन करता येत नाही. माझ्या जीवनातील सर्वकाही बरे वाईट सद्गुरु करतात असा भाव उत्पन्न झाला तर साधन होईल.

**साधक ज** : सर्व काही सद्गुरु करतात म्हणतांना मला जसे व्हावेसे वाटते तसे त्यांनी करावे अशी मनात इच्छा असते. त्यापेक्षा प्रारब्धानुसार जे घडायचे असेल ते घडेल अशी खात्री झाली तर मनाची उलघाल होणार नाही.

**पू. बाबा** : प्रारब्धावर निष्ठा असणे कठीण आहे. त्यासाठी अखंड सावधानता पाहिजे. श्रीमहाराज म्हणत की खरा साधक अंग धरणार नाही कारण एकसारखे नामस्मरण झाले पाहिजे असा त्याच्यावर ताण राहील. पूर्वीच्या काळी दहा माणसांच्या घरात नवीनच लग्न झालेली नवरा-बायको दिवसा एकमेकाशी बोलण्याची संधी शोधत तशी नाम घेण्याची सतत संधी शोधली पाहिजे. नामस्मरणाची तशी ओढ लागली पाहिजे. काहीही करा पण नामस्मरण वाढवा. नुसती चर्चा पुरे झाली. साधनात पाऊल पुढे पडले पाहिजे. काहीतरी अनुभव आले पाहिजेत.

## ।१४१। (१ जून १९९०)

**पू. बाबा** : आज एका बाईंनी विचारले की नामस्मरण करावयास बसले की त्याच वेळी इतर विचार मनात गर्दी करतात ते कां आणि ते येऊ नयेत म्हणून काय करावे?

मी त्यांना विचारले की इतर विचारात रमण्याची तुम्हाला लहानपणापासून सवय आहे की नाही? त्या मानाने नामस्मरण अलीकडचे आहे आणि तेही दिवसातला अगदी थोडा वेळ. बरे, त्याची आवड आहे असेही नाही. त्यामुळे अद्याप इतर विचार बळकट आहेत. ज्या प्रमाणात प्रयत्नपूर्वक नामस्मरण वाढवाल त्या प्रमाणात ते क्षीण होत जातील.

पू. बाबांनी प्रश्न केला की ज्ञान आणि भक्ती हे आत्मज्ञानाचे दोन मार्ग आहेत. यापैकी भक्ती श्रेष्ठ असे सत्पुरुष का मानतात?

**साधक प** : खरे म्हणजे हे दोन मार्ग नाहीतच. आत्मज्ञान करून घेतांना विचार प्रधान आहेत की भावना यावर ज्ञानमार्ग की भक्तिमार्ग ते ठरवतात. पण ज्ञानातून भक्ती आणि भक्तीतून ज्ञान यावेच लागते.

**साधक ग** : भक्ती श्रेष्ठ मानण्याचे असे एक कारण असू शकेल की ज्ञान असेल तरी किंवा नसेल तरी पण भक्ती मात्र ज्ञानी आणि अज्ञानी दोघांच्याही बाबतीत शक्य आहे.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. तथापि ज्ञान आणि भक्ती यांची लक्षणे कोणती ?

**साधक ज** : ज्ञानमार्गी विचाराने आत्मज्ञान करून घेतो तर भक्त सुरुवातीला आपल्या कल्पनेने सगुण परमेश्वर निर्माण करून त्याच्या पूजाअर्चेत रमून जातो.

**साधक प** : रमणे दोन्हीकडे आहे. कोणत्या माणसाला कोणता मार्ग योग्य हे सत्पुरुषांना समजत असेल. ज्ञानाचा रंग निळा तर भक्तीचा पांढरा असे म्हणतात. सत्पुरुषांना ते कदाचित दिसत असतील आणि आलेला माणूस पाहिला की त्याच्यामधें कोणत्या रंगाचे प्राबल्य आहे हे ते ओळखू शकत असतील.

**साधक ज** : ज्ञानमार्गी चर्चेत रस घेईल तर भक्तिमार्गी भजनात रंगेल.

**पू. बाबा** : देवाची भक्ती आणि गुरूंची भक्ती यात गुरूंच्या भक्तीला महत्त्व का देतात ? ज्ञानेश्वर महाराज, श्रीएकनाथ आदि संत गुरुवर्णन करू लागले की त्यांना भान रहात नाही.

चर्चेमधें पूर्वीच्याच मुद्द्यांचा पुन्हा उल्लेख झाला. उदाहरणार्थ, गुरूंमधें मानवी आणि दैवी गुणांचा संगम झालेला असतो.

प्रत्येकाला आनंद हवा असे वाटते. परमात्मा आनंदरूपच आहे. त्याच्याकडे आपण कसे पाहतो व जातो, आनंद मिळविण्याचा प्रयत्न कसा करतो ते महत्त्वाचे आहे.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणत की एका खोलीत आनंदरूप परमात्मा बसला आहे. काही लोक (विषयी सांसारिक) त्याच्याकडे मोरीच्या तोंडातून पहातात; काही लोक (कलावंत) त्याच्याकडे खिडकीतून पहातात; तर संत सरळ दार उघडून आत जातात व त्याला मिठी मारतात. प्रेमात आपलेपणा आहे, निस्वार्थीपण आहे. 'प्रेम नये सांगता बोलतां दावितां' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. हे प्रेम आणि शरणागती आल्याखेरीज परमार्थात

पाऊल पुढे पडणार नाही. एक दिवस जप करतांना असे वाटले की जे जे घडते ते बरोबरच आहे कारण ते त्यांच्या इच्छेने घडते आहे. हा विचार मनात येतांच एकदम हलके वाटले. पण हा भाव फार काळ टिकला नाही. वरचेवर असे घडावे म्हणून तरी अभ्यास करीत रहावे. आज आपल्या हातात तेवढेच आहे ते आपण कळकळीने करावे.

## |१४२| (८ जून १९९०)

पू. बाबांनी श्रीमहाराजांच्या बोधवचनांपैकी काही वचने वाचून दाखवली व त्यांचा अर्थ विचारला.

वचन क्र. ३४८ : सर्व जगाशीं माझेपण गेलें पाहिजे. त्याकरतां स्मरण पाहिजे. "मी तुझा, मी तुझा" असे सारखे अनुसंधान पाहिजे. नामस्मरणाचा तोच संपूर्ण अर्थ आहे.

**पू. बाबा :** माझेपण गेले पाहिजे म्हणजे नेमके काय ?

**साधक ग :** याचा अर्थ जोपर्यंत ममत्व जात नाही तोपर्यंत परमार्थ होणार नाही.

**पू. बाबा :** आपले जीवन संबंधांवर आधारलेले आहे. 'माझे' आहे किंवा 'माझे' नाही. 'माझ्या' जगाच्या केंद्रस्थानी 'मी' आहे. तो 'मी' गेल्याशिवाय 'माझे' जाणार नाही आणि परमार्थाला सुरुवात होणार नाही. यासाठी प्रथम 'मी'च भगवंताला देऊन टाकावयाचा म्हणजे जे 'माझे' ते 'त्याचे', भगवंताचे होईल.

वचन क्र. ३५७ : आता एकदां पायांवर डोकें ठेवलें की धडपड थांबलीच पाहिजे. काळजी सद्गुरूनें घेतली पाहिजे. आपलें धडपडणें थांबलें म्हणजे ते काळजी घेतील.

**पू. बाबा :** पायावर डोके ठेवलें म्हणजे काय ?

**साधक प :** शरणागति. जोपर्यंत शरणागति येत नाही तोपर्यंत धडपड राहणारच. कारण तोपर्यंत 'मी' करेन, 'मी' प्रयत्नाने साधेन असे वाटते. शरणागती म्हणजे प्रयत्नाने साधत नाही अशी कबुली देणे आणि मग 'मी करेन' म्हणून होत नाही म्हणून शरण आलो आहे असे म्हणणे. तरी देखील 'मी' शरण आहे हे राहतेच. पण मग हा दुबळा 'मी' सद्गुरु कृपा करून नाहीसा करतात.

**पू. बाबा** : होय. येथे धडपड म्हटले आहे ते मुख्यत: मनाच्या धडपडीसंबंधी आहे. आपली सर्व धडपड किंवा कर्म फलावर दृष्टी ठेवून चालते. फळ मिळेल की नाही याची काळजी वाटते; ताण वाटतो. त्यामुळे कर्मामधे कष्ट होतात. तू करशील ते मान्य असा भाव आला की काहीही होवो, ते माझ्या हिताचेच आहे असे भक्त म्हणतो आणि मग काळजी संपते. वास्तविक घटना जशा घडायच्या तशाच घडतात. कर्तव्य म्हणून कर्म करीत राहाणे अवघड आहे. खऱ्या शरणागतीशिवाय ते शक्य नाही.

वचन क्र. ३४६ : प्रश्न - सर्व भगवंत करतो याचा अप्रत्यक्षपणें अनुभव, दाखला येतो. कांहींतरी प्रत्यक्ष पुरावा कसा मिळेल?

उत्तर : जोवर देहबुद्धि आहे तोवर प्रत्यक्ष अनुभव आला तरीसुद्धा भ्रम होईलच. त्याला आंतून वृत्ति तयार झाली पाहिजे. भगवंतानें प्रत्यक्ष येऊन तसें सांगितलें तरी भ्रम झाल्याशिवाय राहणार नाही. कांहींतरी प्रकारचा भ्रम होईलच. आंतून वृत्ति तयार झाली तर अगदी सामान्य गोष्टीतही भगवंत दिसेल, प्रत्येक गोष्टीत चमत्कार दिसेल.

**पू. बाबा** : ही देहबुद्धि किंवा माया जायची कशी?

**साधक क** : सत्य आणि स्वप्न यांमधील भेद जागृतीत आल्यावर कळतो. तोपर्यंत स्वप्न सत्यच वाटते. अष्टावक्र गीतेत म्हटले आहे की जर माणसाला झोपल्यावर एखाद्या घटनाक्रमाचे कालच्यावरून पुढे चालू असे दररोज स्वप्न पडू लागले तर जागा झाल्यावर त्याला भ्रम होईल की मी जागा असतांना जे घडते ते खरे की झोपलो असतांना घडते ते खरे! जागेपणा आणि झोप यांबद्दल त्याचा गोंधळ होऊन जाईल. आपली देहबुद्धी अशीच आहे. ती जाण्यासाठी शरणागती हाच मार्ग आहे. शरणागतीशिवाय कृपा होणार नाही. केवळ त्यांच्या कृपेनेच देहबुद्धी आणि तिच्यातून निर्माण होणारे भ्रम नाहीसे होतील.

**पू. बाबा** : हे घडावे यासाठीच आपण सतत अनुसंधानात राहिले पाहिजे.

## **।१४३।** (१५ जून १९९०)

पू. बाबांनी त्यांच्याकडे आलेल्या एका गृहस्थांना Death असे शीर्षक असलेले एक पुस्तक दाखवले. लेखक डॉ. मनू कोठारी व लोपा मेहता. डॉक्टर कोठारींचे डॉक्टर असलेले मोठे बंधू अमेरिकेत एकाएकी वारले. त्यानंतर डॉ. मनू कोठारींनी मृत्यू म्हणजे काय यावर बराच विचार व संशोधन केले आणि

हे पुस्तक लिहिले. खरोखर मृत्यूचे गूढ उकलणे कठीण आहे. त्यांच्या सांगण्याप्रमाणे गर्भात तिसऱ्या चौथ्या महिन्यात बाळाच्या हृदयाचे ठोके चालू होतात ते मृत्यूच्या क्षणापर्यंत. हे ठोके थांबले की मृत्यू. मृत्यू कोणत्याही आजाराने येत नाही. आजार हे मृत्यूचे बाह्य आणि वरकरणी दिसणारे लक्षण असते. नियत आयुष्य संपते आणि मनुष्य मरतो. म्हणून Life is a span between two heartbeats असे ते म्हणतात. मृत्यू येतो म्हणजे नेमके काय होते? डॉ. कोठारी म्हणतात, ज्या क्षणाला गर्भधारणा होते त्या क्षणापासूनच क्षयाची प्रक्रिया - decaying process - सुरू होते. जन्माप्रमाणे मृत्यू केव्हां, कोठे, कसा यावयाचा ते आपल्या हातात नसते. पू. बाबा म्हणाले, प्रत्येक देहधारी जीवास उत्पद्यते, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते आणि नश्यति (उपजणे, असणे, वाढणे, परिणाम पावणे, क्षीण होणे आणि नाश पावणे) हे षड्विकार चुकलेले नाहीत.

**साधक प** : वास्तविक मेंदूचे कार्य थांबले की मृत्यू झाला असे अमेरिकेत मानतात; मग हृदय भलेही चालू असो. सुमारे पाच मिनिटे मेंदूला रक्तपुरवठा झाला नाही की मेंदू मरतो.

**साधक ख** : हृदय हा केवळ पंप आहे आणि तो बंद पडल्यानंतर काही वेळा पुन्हा चालू होतो किंवा करता येतो.

**साधक प** : हल्ली ओपन हार्ट सर्जरी करतांना हृदय बंद ठेवून त्याचे कार्य यंत्रावर सोपवतात.

**पू. बाबा** : भीती, काळजी इत्यादींमुळे हृदयाचे ठोके जलद चालू होतात तसे प्राणावर ताबा मिळवून किंवा नामजपाने मन एकाग्र करून ते सावकाश करता येणार नाहीत का? मन:पूर्वक नामस्मरण करून हृदयाच्या क्रियेवर ताबा मिळवणे शक्य आहे. श्रीमहाराज म्हणत कीं माणूस कोणत्याही आजाराने मरत नाही. त्याचे आयुष्य संपले की मरतो.

ही सर्व चर्चा करण्याचे कारण आज आलेल्या गृहस्थांची पत्नी गेल्या आठवड्यातच वारली हे आम्हाला नंतर समजले.

नंतर पू. बाबांनी Chapman या अमेरिकन लेखकाचे How to find Guru ह्या नांवाचे एक पुस्तक दाखवले. या पुस्तकात त्याने A to Z वेगवेगळ्या श्रेष्ठ साक्षात्कारी व्यक्तींबद्दल माहिती दिली आहे. तो म्हणतो, Money and spiritualism do not go together. पैसे घेऊन

गुरूपदेश करणारे पुष्कळ लोक अमेरिकेत आले आहेत; त्यांच्या मागे लागू नका. या पुस्तकात त्यांनी संत तुकारामांबद्दल लिहिले आहे. तसेच कान्हनगडच्या स्वामी रामदासांचे आत्मसमर्पण **In Quest of God, In the Vision of God** आणि **World is God** या पुस्तकात प्रकर्षाने दिसते असे त्यांनी म्हटले आहे. भगवंतासाठी त्यांनी सर्वस्व दिले. भारताच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत सर्व प्रकारच्या संकटात, प्रतिकूल हवामानात राम माझा रक्षणकर्ता आहे ह्या दृढ भावाने त्यांनी संचार केला. अखंड नामस्मरण केले. सर्वोच्च मूल्य (**Supreme Value**) म्हणजे काय आणि केवळ नामस्मरणाने आत्मसाक्षात्कार कसा होतो हे त्यांच्या चरित्रात आढळते. पू. बाबा म्हणाले, या लेखकाचे लिखाण मोठे मर्मग्राही आहे; शैलीही प्रसन्न आहे.

निर्भयता म्हणजे काय हे स्वामी रामदासांच्या चरित्रात दिसते. या संदर्भात पू. बाबांनी पू. पांडुरंगबुवांची एक हकिगत सांगितली. श्रीमहाराजांनी त्यांना एकांतात जप करावयाला सांगितले होते. ते जपाला बसले होते तेथे एकदा एक वाघ आला. घाबरून त्यांनी श्रीमहाराज अशी मोठ्याने हाक मारली. श्रीमहाराज तेथे प्रकटले आणि वाघ नाहीसा झाला! श्रीमहाराजांनी त्यांना विचारले की 'मी नामात आहे' असे सांगितलेले असतांना नाम घ्यायचे सोडून मला कशाला हाक मारलीस? मोठमोठ्या निष्ठावंतांची निष्ठा देखील कसोटीच्या क्षणी कशी डळमळीत होते ते या गोष्टीवरून लक्षात येते.

नंतर अभय आणि निर्भयता यांतील फरकाबद्दल चर्चा झाली, निर्भयता येते तेव्हां माझा कोणीतरी रक्षणकर्ता आहे ही भावना दृढ झालेली असते तर अभय ही निर्भयतेच्या बरीच वरची अवस्था आहे.

पू. बाबांनी विचारले की हे सगळे समजत असूनही अडते कोठे?

**साधक ग** : विचाराने एखादी गोष्ट बरोबर वाटणे आणि आतून ती बरोबर आहे हे जाणवणे यात फरक आहे. आता परमार्थाखेरीज दुसरे काहीही ध्येय नाही असे आतून वाटले पाहिजे, ते वाटत नाही. आम्हा प्रापंचिकांना अनेक गोष्टी पाहिजे असतात, त्यात थोडा परमार्थही पाहिजे असे वाटते. ज्याला **total dedication** - आत्मसमर्पण - म्हणतात ते होत नाही.

**साधक प** : आम्ही नामस्मरण करतो पण ते करतानाही आम्हाला त्याच्यापासून काहीतरी फळ पाहिजे असते.

**साधक** : माझ्या एका नातेवाइकांनी काही वर्षांपूर्वी छंद (**Hobby**) म्हणून का होईना नामस्मरणास सुरुवात कर असे मला सांगितले. ते म्हणाले,

म्हातारपणी इंद्रिये विकल होतात. अशा वेळी स्वत:ला गुंतवून ठेवायला नामस्मरणासारखे दुसरे उपाधिरहित साधन नाही.

**साधक ज** : आम्ही नाम हे तर साधन म्हणून समजतोच पण गुरूलाही साधन बनवतो.

**पू. बाबा** : आपल्या आड काय येते याचा विचार करा आणि ते दूर करण्याचा प्रयत्न करा. वास्तविक तुम्हां सर्वांना सगळी अनुकूलता आहे. आयुष्याचा भरंवसा नाही. तेव्हां आता त्याच्या मागेच लागले पाहिजे.

**साधक प** : अनुसंधान राहिले पाहिजे हे पटते पण ते आचरणात आणण्यास शक्ती कमी पडते.

**पू. बाबा** : ही शक्ती कोणती ?

**साधक प** : ही मनाची शक्ती आहे. मनाला एकसारखी शिकवण देऊन ती वाढवणे शक्य आहे.

**पू. बाबा** : नामस्मरण कसे अखंड पाहिजे ते सांगतांना समर्थांनी म्हटले आहे की 'शिंक जांभई खोकला। तितुका वेळ वायां गेला॥' आपल्याला विचाराचा मार्ग जमत नसला तर पू. तात्यासाहेबांप्रमाणे लीन व्हावे किंवा भाऊसाहेबांप्रमाणे 'नाम का घेतो ? त्यांना आवडते म्हणून' अशी वृत्ती व्हावी.

एकदा श्रीमहाराज म्हणाले की लोक ज्ञानाच्या गप्पा मारतात पण झोप लागते म्हणजे काय बाहेर जाते आणि जाग येते म्हणजे काय येते हे कोणाला माहीत आहे का ? वास्तविक आपण झोपेतून जागे होतो हा केवढा चमत्कार आहे. श्रीमहाराजांनी एकदा श्री. काशीकरांना आणि मला विचारले की नामस्मरणाने वासना क्षीण होतात अशा अर्थाचा तुकारामांचा कोणता अभंग आहे ? मी दोनदा सर्व गाथा पाहिली पण तशा अर्थाचा अभंग मला मिळाला नाही म्हणून श्रीमहाराजांना तसे सांगितले. तेव्हां श्रीमहाराज उद्‌गारले, असं ! नसेल कदाचित ! पण आपला अनुभव तसा आहे ना !

कित्येकदा आपली भीती काल्पनिक असते. या संदर्भात पू. बाबांनी एक गोष्ट सांगितली. एक माणूस डोंगरातून प्रवास करीत होता. चालत असतांना रात्र झाली आणि पाय घसरून तो पडला आणि गडगडत खाली जाऊ लागला. अंधारात त्याच्या हाताला एका झाडाची मुळी लागली. ती घट्ट पकडून रात्रभर तो अधांतरी राहिला. आपल्या हातातून मुळी सुटली तर आपण किती खाली पडू कोणास ठाऊक असे त्याला वाटत होते. उजाडले तेव्हां त्याला आढळून

आले की त्याच्या पायापासून दोन फुटावरच उभे रहाता येईल अशी जमीन होती!

आज्ञापालन करावयाचे म्हणजे आपली अक्कल बाजूलाच ठेवली पाहिजे. एका झेन साधूने त्याच्या शिष्याला एक झोपडी बांधायला सांगितले. झोपडी बांधून झाल्यावर त्याने मी सांगितली होती तशी ही झोपडी नाही, दुसरी बांध म्हणून सांगितले. शिष्य म्हणाला, तुम्ही सांगितली तशीच ही आहे, पण साधूने ते मान्य केले नाही. थोड्या नाखुशीनेच शिष्याने दुसरी झोपडी बांधली. ती पण साधूला मान्य झाली नाही. असे तीन चारदा झाल्यावर शिष्य कंटाळला आणि दुसरीकडे निघून गेला. तेथे त्याला एक सत्पुरुष भेटला. शिष्याची हकिगत ऐकल्यावर तो म्हणाला, अरे तू उगीच इकडे आलास, परत जा. जोपर्यंत गुरूचे जे मत तेच शिष्याचे मत असे होत नाही; माझे गुरु बरोबरच आहेत हा भाव येत नाही तोपर्यंत गुरुपदेश फळणार नाही. त्या साधूलाच शरण जा म्हणजे तुझे काम होईल.

पू. तात्यासाहेबांच्या बाबतीत पू. बाबांनी एक आठवण सांगितली. श्री. भाऊसाहेब १९०४ साली सेवानिवृत्त होऊन गोंदवल्यास राहावयास गेले त्यावेळी पू. तात्यासाहेब बडोद्यास होते. त्यांना श्रीमहाराज कसे आहेत, कसे दिसतात वगैरे काहीच माहीत नव्हते. तथापि पू. टेंबेस्वामी (वासुदेवानंद सरस्वती) जसे शरीराने किरकोळ होते तसे श्रीमहाराज नसावे असे वाटत होते. गोंदवल्यास गेल्यावर त्यांनी श्रीमहाराजांची आकृती, रूप, वागणे, बोलणे इत्यादी पाहिल्यावर Love at first sight - प्रथमदर्शनी प्रेम - म्हणतात तशी त्यांची अवस्था झाली. श्रीमहाराजांनीही त्यांच्यावर खूप प्रेम केले. ह्या प्रेमाचे एक लक्षण म्हणजे श्रीमहाराज सर्वांना, अगदी तात्यासाहेबांच्या पत्नींनाही अहो जाहो म्हणत पण पू. तात्यासाहेबांना मात्र नेहमी तात्या असे एकेरी संबोधीत असत. पू. तात्यासाहेबांना या गोष्टीचा रास्त अभिमान वाटत असे. ते म्हणत, श्रीमहाराज मला ए तात्या म्हणतात त्यामुळे मला मी मोठा झालो असे कधी वाटलेच नाही.

## |१४४| (२२ जून १९९०)

**पू. बाबा :** दोन दिवसांपूर्वी एक गृहस्थ आले होते. काशीला एका पंडिताकडे राहून त्यांनी प्रस्थानत्रयीचा अभ्यास केला आहे. प्रस्थानत्रयी मुखोद्गत आहे. एम्. ए. झाले आहेत. आता पीएच्. डी. चा अभ्यास करत

आहेत. त्यांच्याबरोबर शंकराचार्यांच्या मायावादाबद्दल बोलणे झाले. या बाबतीत श्रीमहाराज काय म्हणत ते मी त्यांना सांगितले. ते तुम्हाला थोडक्यात सांगतो.

श्रीमहाराज म्हणत की आपले जग हे आपण आपल्या मनाने निर्माण केलेले असते. त्यामुळे त्याचे अस्तित्व आपल्या मनावर अवलंबून असते. म्हणून मन बदलले म्हणजे झाले. मग जग तसेच राहील पण त्याच्याकडे पहाताना आपल्यामधे बदल झालेला असेल. आपण जसे project (प्रक्षेपण) करू तसे जग असते, म्हणून जग असे काही नाहीच. लोक विनाकारणच साकार निराकाराचा वाद घालतात. निराकारवादी म्हणतात त्याप्रमाणे परमात्मा जर सर्व ठिकाणी भरलेला आहे तर तो मूर्तीत का नाही? सगुणावर विश्वास ठेवणारा मूर्तीत परमात्मा पहाता पहाता तो आपल्या हृदयात पहातो आणि मग सर्व विश्वात त्याला तोच भरलेला दिसतो. मूर्तीतील चैतन्य जाणवण्याइतके आपण संवेदनशील झाले पाहिजे.

**साधक ग** : जर जग आपल्या मनानें निर्माण केलेले आहे तर अनेकांना जग एकसारखे का दिसते?

**पू. बाबा** : याचे कारण असे की प्रत्येकाचे मन हा विश्वमनाचाच भाग आहे त्यामुळे देहागणिक प्रत्येकाचे मन स्वतंत्र वाटले तरी वास्तविक त्याचे structure (संरचना) एकच आहे. फारतर देहागणिक त्याची functions (कार्य) वेगवेगळी दिसतील.

**साधक प** : व्यक्तीगणिक श्वासोच्छ्वास वेगवेगळे असले तरी ते जसे एकाच हवेतून होतात तसा सर्व विचार विश्वमनातूनच येतो.

**पू. बाबा** : ही गोष्ट आणि सगुणातील चैतन्य यांबद्दल कृष्णप्रेमनी चांगले सांगितले आहे. श्री. दिलीपकुमार रॉय यांना त्यांनी लिहिलेल्या एका पत्रातील काही भाग पू. बाबांनी वाचून दाखवला. कृष्णप्रेम म्हणतात :

Look to the fact that Krishna is present in a brass image as He is in all things. If special methods are adopted (i.e. PRANAPRATISHTHA and PUJA) He is, not more present, but more easily seen as present. He is in all things everywhere. Do you not want to see Him in all things OUTER as well as INNER ? And what is OUTER and what is INNER ? The so called OUTER world is only

seen because the INNER world is in the heart just as the picture on the screen is only seen because the slide is in the magic lantern. Your consciousness extends to far horizons... even the stars... There is no inside and no outside but only different states of consciousness and in all of them is Krishna. Why discriminate unfavourably ? Some men seek only within and despise the outer as unreal. But this is the pseudo - MAYAVADA or rather the wrong MAYAVADA. That which is within is that which is without. and VICE VERSA... He who worships Krishna only in the heart will see Him in the heart, he who worships Him everywhere will see Him everywhere.

(Yogi Shri Krishna Prem by Dilip Kumar Roy Bharatiya Vidya Bhavan 1975 PP 217-218.)

(हे लक्षात घ्या की कृष्ण जसा सर्व वस्तूंमध्ये आहे तसा तो पितळेच्या मूर्तीतही आहे. प्राणप्रतिष्ठा व पूजा यांमुळे तो अधिक प्रकट होतो असे नसून तो प्रकट आहे हे जास्त सुलभतेने समजते. तो वस्तुमात्रात भरलेला आहे. दृश्य जगातील वस्तूंप्रमाणे आपल्या अंतरंगातही तो दिसावा असे तुम्हांस वाटत नाही का? ज्याप्रमाणे मॅजिक लँटर्नमधील स्लाइडमुळे पडद्यावर चित्र दिसते त्याप्रमाणे अंतर्जगतामुळे बाह्य जग प्रतीतीस येते. आपली जाणीव दूर क्षितिजापर्यंत, नव्हे, दूरच्या ताऱ्यांपर्यंत पोहोचते. वास्तविक अंतर्जगत आणि बाह्य जगत असे प्रकार नसून त्या आपल्याच जाणिवेच्या भिन्न पातळ्या आहेत. त्या सर्वात कृष्ण आहे. मग त्यात वृथा भेद कशाला करायचा? काहीजण त्याचा आत शोध घेतात आणि त्याचे बाहेरचे अस्तित्व मिथ्या मानतात. पण हा लटका मायावाद होय. जो आत आहे तोच बाहेरही आहे आणि बाहेर आहे तोच आत आहे. जो कोणी कृष्णाची आपल्या हृदयात पूजा करतो त्याला तो हृदयात दिसेल आणि जो त्याला सर्वत्र पाहतो त्याला तो सर्वत्र भरलेला दिसेल.)

हे वाचून झाल्यावर पू. बाबांनी विचारले की हे मन बदलायचे कसे? पुढे तेच म्हणाले, एक मार्ग Auto suggestion म्हणजे स्वयंसूचनेचा. Carl Jungच्या एका विद्यार्थ्याला अतिसार झाला होता. रात्रीत अनेकदा उठून

शौचाला जावे लागे. Jung त्याला म्हणाला, तू मनाला सांग की मला काहीही झालेले नाही आणि काही झाले तरी रात्री मी उठणार नाही. तसे केल्यावर रात्रीत त्याला एकदांही शौचाला जावे लागले नाही आणि शांत झोप लागली. मनाला जर असे एकसारखे शिकवत राहिले तर ते बदलेल का?

**साधक ग :** यातले 'एकसारखे' शिकवणे महत्त्वाचे आहे. मनाचा सर्वात मोठा दोष म्हणजे अहंकार. म्हणून राम कर्ता ही शिकवण मनाला एकसारखी दिली पाहिजे.

**पू. बाबा :** संसारात साक्षीभावाने राहता आले पाहिजे.

**साधक ड :** समजा, दिवसातले दोन तास तरी मनाला बजावले की तू ह्या घरात पाहुणा आहेस, तर नाही का जमणार?

**पू. बाबा :** एखादी बायको नवऱ्याला म्हणाली की मी दिवसा तेवढी तुमची बायको, रात्री नाही तर चालेल का? लग्न म्हणजे लग्न, चोवीस तास बायको.

**साधक ग :** तथापि अभ्यास करायचा म्हणजे हळूहळूच होणार ना? आम्हाला एकदम झोकून देता येत नाही म्हणून तर अशा अभ्यासाची गरज. राम कर्ता हे पुष्कळदा विसरलो तरी घसरलेले मन पुन्हा मार्गावर आणावे लागेलच.

**पू. बाबा :** होय, ते बरोबर आहे. तथापि समजा असे ठरविले की श्रीमहाराज माझ्या कुटुंबाचे प्रमुख आहेत; ते करतील ते मान्य. तर काय होईल?

**साधक प :** हे जमले तर उत्तमच. पण मन वारंवार घसरते. इतके उंचावर राहणे अवघड जाते.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांवर सोपवले तर ते काळजी घेतात असा अनुभव असूनही आपण सर्वस्वी त्यांच्यावर सोपवत नाही.

**साधक ज :** अतिशय दु:ख किंवा सुख होते तेव्हां हे दु:ख वा सुख कोठून आले, का आले इत्यादी विचार केला तर विशेषत: दु:खामुळे होणारा मनक्षोभ कमी होतो असा माझा अनुभव आहे.

**पू. बाबा :** जो द्वंद्वांपलीकडे गेला त्याला हारजितीचे काही वाटत नाही. आपला प्रयत्न द्वंद्वातीत होण्यासाठी आहे.

## ।१४५। (२९जून १९९०)

उद्यापासून गुरुपौर्णिमेचा सप्ताह सुरू होणार आहे. पू. बाबा आज प्रसन्न दिसताहेत. त्यांनी एकदम मृत्यूचा विषय काढला. ते म्हणाले Time

मासिकाच्या १८ जूनच्या अंकात Dr. Death's Suicide Machine (An ailing teacher's last decision inflames the euthanasia debate) असा Nancy Gibbs चा लेख आला आहे. Dr. Jack Kevorkian ह्या रिटायर्ड पेथॉलॉजिस्ट डॉक्टरने एक अतिशय स्वस्त ( 45 डॉलरचे) यंत्र तयार केले आहे. या यंत्राचा उपयोग करून पेशंट स्वत: वेदनारहित मृत्यूची व्यवस्था करू शकतो. अगदी शेवटच्या क्षणाला त्याचा विचार बदलला तरी मृत्यू थांबवता येतो. या यंत्रामुळे वेदनारहित मृत्यूची निवड शक्य झाली आहे. यंत्र स्वस्त व साधे आहे. नुकताच एका ५४ वर्षांच्या बाईने ह्या डॉक्टरांच्या उपस्थितीत आपल्या जीवनाचा शेवट केला. ही हकिगत वाचून दाखवून पू. बाबा म्हणाले, की शांतपणे, स्वेच्छेने मरण्याचा प्रत्येकाला हक्क आहे असे लोकमत आता तयार होऊ लागले आहे. परमार्थातही, नामस्मरण करीत शांतपणे मृत्यू यावा असे म्हणतात. शांतपणे मृत्यू येण्यासाठी साधकाने नामस्मरणाऐवजी अशा एखाद्या यंत्राचा उपयोग करावा की नाही?

श्रीमहाराज म्हणायचे की मोठमोठे योगी पुढे काय होईल याची खात्री नसल्याने ध्यान लावून स्वेच्छेने प्राण सोडतात. मृत्यूची जागा, वेळ, जवळ कोण असणार, त्रास किती होणार हे सर्व प्रारब्धाने ठरलेले आहे. म्हणून मृत्यूची काळजी करू नये.

पू. बाबांनी 'कां झांकलिये घटींचा दिवा। नेणिजे काय जाहला केव्हां। या रीती जो पांडवा। देह ठेवी॥' ८.९८॥ ही ज्ञानेश्वरीतली ओवी सांगितली आणि म्हणाले की हे आपले ध्येय असले पाहिजे. मृत्यूचा विचार विकृत नसावा. ह्या ओवीप्रमाणेच समर्थांची 'सरता संचिताचे शेष। नाही क्षणाचा अवकाश। भरतां न भरतां निमिष्य। जाणें लागे॥ ३.९.३॥ ही दासबोधातली ओवीही लक्षात ठेवावी.

श्रीमहाराज म्हणत की अंतकाळी सर्व नाड्या सुटतात. त्यावेळी जीवाला फार क्लेश होतात. तो लाचार होतो. पण सद्गुरु ती वेळ साधतात. जीव जातांना जे क्लेश होतात त्यावेळी नामाची आठवण होणे कठीण आहे. जीव जातांना कोमा, बेशुद्धी, झोप अशासारखी काही स्थिती असते काय? श्रीमहाराज म्हणायचे की हे अवस्थांतर आहे. मरण्यापूर्वी एक क्षण तरी जीवाला जागृती येईलच आणि तो क्षण सद्गुरूंची मदत होण्याचा असतो. शिवाय अंतकाळी माझे स्मरण कर असे भगवंतानीच सांगून ठेवले आहे. तेव्हां

आठवण ठेवता येईल अशी अवस्था येतच असली पाहिजे. भगवंताच्या स्मरणात जावयाचे असेल तर ती तयारी आत्तापासूनच केली पाहिजे. मृत्यूची भीती गेली तर कदाचित त्यावेळी शांतपणे नामस्मरण करत जाता येईल. आपल्याला पुष्कळ प्रकारची भीती वाटते. भीती किंवा असुरक्षितता (Fear or Insecurity) मुळातून काढता येईल काय? भीती ही आपल्या 'हवे-नको' पणावर अवलंबून असते. ते 'हवे-नको' पण (वासना) नाहीसे व्हावयाला 'साधन' किंवा 'रामाची इच्छा' किंवा 'प्रारब्ध' यांपैकी कशावर तरी खरा खरा विश्वास पाहिजे.

**।१४६।** (६ जुलै १९९०)

पू. बाबा आज खूप प्रसन्न दिसत होते. त्यांनी ज्ञानेश्वरीच्या ६व्या अध्यायातील १५३ ते १६० या ओव्या वाचून दाखवल्या आणि विचारले की या ओव्यांत वर्णन केलेली अवस्था काय असावी? प्रवृत्तितरूच्या म्हणजे संसारवृक्षाच्या तळाशी कोट्यवधि निवृत्ती म्हणजे मोक्षफळे लगडलेली आहेत. सरळ रस्त्याने चाललात तर अपवर्ग म्हणजे मोक्ष लाभतो आणि आडवाटेला लागलात तरी स्वर्ग चुकत नाही! आणखी हा विरोधाभास पहा. पूर्वेच्या वाटेने चालतो आणि पश्चिमेला निघतो! बरे, इथले चालणेही निश्चल आहे! आणि अशा मार्गावर जो चालू लागतो तो चालता चालता आपणच गांव होऊन जातो! ह्या सगळ्याचा अर्थ काय? पू. बाबा पुढे म्हणाले, खरोखर काहीही कर्म न करता राहणे आपल्याला माहीत आहे का? अशी स्थिती असते काय?

**साधक ग** : ज्या स्थितीत कोणतेही कर्म नाही अशी स्थिती म्हणजे 'मी आहे.' माझे असणे कर्माखेरीज आहे. त्यातून 'मी असावे' असा भाव आला की कर्म आले.

**पू. बाबा** : या म्हणण्यात तथ्य दिसते. केवळ 'मी आहे' हा 'असणे' भाव कर्मरहित आहे.

**साधक प** : त्यापेक्षाही केवळ जाणीव (Consciouness) कर्मरहित आहे.

**साधक क** : केवळ जाणीव असू शकते का? तिला काहीतरी भरवण (आलंबन) नाही का लागत? मी तरुण आहे, स्थूल आहे, कृश आहे इत्यादी जाणीव असू शकते.

**पू. बाबा :** 'मी आहे' ही 'केवळ जाणीव' आहे. वेदान्तात यालाच दृङ्मात्र म्हटले आहे.

**साधक ज :** ही जाणीव आणि विचार यात फरक काय?

**पू. बाबा :** विचार म्हटले की त्याकरता बुद्धी आली आणि बुद्धी म्हटले की तुम्ही प्रकृतीच्या क्षेत्रात येता. प्रकृतीचे क्षेत्र कर्माशिवाय असूच शकत नाही. विचार हे देखील कर्मच आहे.

**साधक क :** 'मी आहे' या जाणिवेतला 'मी' कोण? कारण तो देह असला तर कर्म आलेच. कारण कर्माशिवाय देह राहूच शकत नाही.

**पू. बाबा :** हा 'मी' साक्षी आहे. तो केवळ पहातो; आणि म्हणून येथे ज्ञानेश्वर महाराजांनी प्रवृत्तितरूच्या मुळाशी निवृत्ति सांगितली आहे. अर्थात वैराग्याशिवाय साक्षीभाव येणे शक्य नाही. अर्जुनाच्या ठिकाणी असे वैराग्य निर्माण झाले म्हणूनच भगवंतांनी त्याला हा योग सांगितला. साधकाची प्रगती जाणून घ्यावयाची म्हणून याला मार्ग म्हटले आहे, आणि मार्ग म्हटले की चालणे आलेच. वास्तविक, देश-काल-निमित्तादिकांचे अस्तित्व साक्षीभाव आल्यावर नाहीसे होईल आणि हेच निश्चलपणाचे चालणे. शेवटी हा मार्गच गांव होतो म्हणजे साध्य व साधन असा फरक न राहता साधन आणि साध्य एक होतात. नाम हेच साधन आणि नाम हेच साध्य.

पू. बाबांनी नंतर विचारले की हा साक्षीभाव कसा आणता येईल?

**साधक प :** जीव म्हटले की अहंकार व कर्म आलेच. जगण्यासाठी कर्मे करावीच लागणार. तथापि ह्या कर्मातील 'मी' हा 'खोटा मी' आहे. हाच अहंकार. हा विचारपूर्वक नाहीसा करता आला पाहिजे. वास्तविक खरा आणि सरळ विचार करता आला तर अहंकार नाहीसा करावयास कष्ट पडणार नाहीत.

**पू. बाबा :** पण हा विचार करावयास लागणारी शक्ती आपल्याजवळ नाही. अशा परिस्थितीत 'तो' सगळे करतो असे स्वत:ला बजावावे. राम कर्ता हा भाव वाढविण्याचा प्रयत्न करावा. आपण तोंडाने म्हणतो पण प्रसंग आला की 'खोटा मी' डोके वर काढतो.

**साधक प :** हा 'मी' जाऊन शरणागति आली पाहिजे. ती येत नाही याचे कारण आमचे सर्वोच्च मूल्य निश्चित झालेले नाही. आजचा दिवस गेला आणि काहीच जमले नाही याची खंत वाटली पाहिजे. साधनाकाळात रामकृष्ण, आणखी एक दिवस फुकट गेला; अद्याप आईचे दर्शन झाले नाही म्हणून मातीत तोंड घासून रडत.

**साधक ग** : आम्ही एका विशिष्ट चाकोरीत वाढलो आहोत. दृश्य खरे नाही म्हणून कितीही सांगितले तरी पटत नाही. आम्हाला सुख पाहिजे, त्याबरोबर दु:ख येणारच. **That is in the game !** असे वाटते.

**साधक प** : जोपर्यंत दु:ख सर्वसामान्य आहे तोपर्यंत हे ठीक आहे. खरा फटका बसला की असे वाटणार नाही.

**साधक ग** : याचा अर्थ समर्थांनी म्हटल्याप्रमाणे त्रिविधतापें पोळला तोच परमार्थाला अधिकारी होईल.

**पू. बाबा** : प्रत्येक वेळी जरी असे घडले नाही तरी जीव घाबरल्याखेरीज खरी तळमळ आणि शरणागति येत नाही. सूरदासांनी त्यांच्या गजेन्द्रमोक्षाच्या पदात त्या हत्तीच्या तोंडी 'अब तो जीवन हारे' असे शब्द घातले आहेत.

**साधक क** : प्रत्येकाला सुख पाहिजे, आनंद पाहिजे. कोणताही जीव आनंदाशिवाय जगूच शकत नाही. जोपर्यंत माणसाला दृश्यापलीकडील आनंदाचा थोडा तरी अनुभव नाही तोपर्यंत तो अशाश्वत आनंदाच्या मागेच लागणार.

**पू. बाबा** : जोपर्यंत तीव्रतेने, कळकळीने नामस्मरण करीत नाही तोपर्यंत त्या आनंदाचा अनुभव तरी कसा येणार? म्हणून अखंड नामस्मरणाखेरीज दुसरा मार्ग नाही.

## |१४७| (१३ जुलै १९९०)

**पू. बाबा** : भगवद्गीतेत प्रसन्नतेचे वर्णन आणि महत्त्व अनेक ठिकाणी सांगितले आहे. आधी ब्रह्मज्ञ होतो आणि मग प्रसन्न होतो! प्रसन्न म्हणजे काय? सामान्यत: प्रसन्न म्हणजे आनंदी असा अर्थ आपण करतो. प्रसन्न हा शब्द प्र+सद् पासून झालेला आहे. शांत, स्थिर झालेला असा प्रसन्नचा अर्थ आहे. जो शांत झालेला आहे, ज्याला शोक नाही, आकांक्षा नाही, ज्याचा सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी समभाव झालेला आहे त्यालाच माझी पराभक्ती (ज्ञानोत्तर भक्ती) लाभते. भक्ती ही इतकी अवघड आहे. आपण भक्तिमार्ग सोपा समजतो, पण गीतेने भक्ती-ज्ञान-पराभक्ती असा क्रम दिलेला आहे. भक्तीचा अर्थ सेवा. भज सेवायाम्। तेव्हां आपण ईश्वराची किंवा आपल्या गुरूंची सेवा करावयाची म्हणजे काय करायचे?

**साधक ग** : त्यांना आवडते ते करायचे. उदाहरणार्थ, श्रीमहाराजांना नामस्मरण आवडते ते करीत राहायचे.

**पू. बाबा** : आपले नामस्मरण म्हणजे नुसते कर्म होते. त्यात प्रेम येत नाही. खरे तर प्रेम म्हणजे काय तेच आपल्याला माहीत नाही. श्रीमहाराज म्हणत, प्रेम शब्द गुळगुळीत झाला आहे. प्रेम ही एक कला आहे. खरोखर आपल्याला कशाचे का होईना प्रेम आहे का? आपण प्रेम करू शकतो का? Are we capable of loving something ?

**साधक ग** : तत्त्वत: विचार केला तर आमच्याजवळ प्रेम असलेच पाहिजे. भगवंत प्रेममय आहे आणि आम्ही जर त्याचे अंश आहो तर आमच्याही ठिकाणी ती शक्ती असली पाहिजे.

**पू. बाबा** : प्रेम म्हणजे काय? प्रेम आहे हे कसे ओळखायचे?

**साधक ग** : प्रेमविषयाबद्दल आपलेपणा वाटतो आणि त्याच्यासाठी काहीही कष्ट सोसण्याची तयारी असते.

**साधक भ** : प्रेमात स्वत्व विरघळून जाते.

**पू. बाबा** : प्रेमात द्रवभाव आहे. ते रसमय आहे. असे आपले प्रेम कशावर आहे?

**साधक ड** : आपले आपल्या देहावर प्रेम आहे.

**साधक ग** : आपण आसक्ती आणि प्रेम यात गल्लत करतो आहो. देहाची आसक्ती आहे..

**पू. बाबा** : साधक प नेहमी म्हणतात ते बरोबर आहे. आपले आपल्या देहावर खरे प्रेम नाही. तसे असते तर तो आपण कसाही वापरला नसता.

**साधक ज** : आपले आपल्या वासनांवर प्रेम आहे, नव्हे, आपण वासनापुंज आहो.

**पू. बाबा** : पण वासना असूनही प्रेम नाही का करता येणार?

**साधक भ** : असे ठरवून प्रेम नाही करता येणार! प्रेम ही भावना आतूनच नकळत येते.

**पू. बाबा** : मूल झाले की त्याच्यावर प्रेम कर असे आईला सांगावे लागत नाही.

**साधक क** : तथापि सत्संगाने, सद्ग्रंथ वाचनाने चिंतनाने प्रेम वाढविता येईल.

**पू. बाबा** : प्रेमात समर्पणाची भावना असते आणि ती भाऊसाहेबांजवळ होती. बार्हट नांवाच्या जर्मन तत्त्वज्ञान्याने Religion is complete

dependence on the Divine अशी व्याख्या केली आहे. आपण पूर्णपणे श्रीमहाराजांवर का सोडून देत नाही?

**साधक ग** : आमचे सद्गुरु म्हणजे काय तेच आम्हाला समजलेले नाही. मग प्रेम कसे करणार?

**पू. बाबा** : सद्गुरु म्हणजे काय हे समजणे हे नाम समजण्याइतकेच कठीण आहे; कारण जेथे नाम तेथे मी असे त्यांनी सांगितले आहे. प्रेमामधें करुणा असते का?

**साधक भ** : निश्चित असते. कारण तसे नसते तर श्रीमहाराजांनी आमची लायकी नसतानाही आमच्यावर काय म्हणून प्रेम केले असते? प्रेमामधे स्वार्थ नसतो. आई आपल्या तान्हुल्यावर प्रेम करते ते काही हे पुढे माझ्या उपयोगी पडेल अशा स्वार्थाने नव्हे. ते मोठे झाल्यावरची गोष्ट वेगळी.

**पू. बाबा** : तुकाराम महाराज म्हणतात 'जाणतें लेंकरू। माता लागे दूर धरू॥' आपण जर सर्वस्वी अवलंबून राहिलो तर श्रीमहाराज उचलून घेतात यात शंका नाही., 'मातेचिया खांदी बाळ नेणें शीण।' त्यासाठी शरणागति हवी. श्रीमहाराज म्हणत, प्रेमासाठी आवड व नड पाहिजे. आम्हाला ईश्वराची किंवा श्रीमहाराजांची नड वाटत नाही. ते माझे जीवन चालवतात असे वाटत नाही आणि त्यामुळे तळमळीने नामस्मरण होत नाही.

चर्चेच्या ओघात साधक क यांनी दोन गोष्टी सांगितल्या.

श्रीरामकृष्ण म्हणत, वानरीच्या पिल्लाचा भाव आणि मांजरीच्या पिल्लाचा भाव यात फरक आहे. वानरीचे पिलू आईच्या जवळपास खेळत असते पण आई उठून चालली की चटकन जाऊन तिच्या पोटाशी बिलगते. याच्या उलट मांजरीचे पिलू आई ठेवेल तेथे म्यांव म्यांव करत पडून राहते. वाटले तर आईने उचलून दुसरीकडे न्यावे. मांजरीच्या पिल्लाचा भाव आला पाहिजे. तू ठेवशील तसे!

एक बेडूक एकसारखा ओरडत होता. त्याच्या ओरडण्याचा त्रास होऊ लागला म्हणून प्रभू रामचंद्रांनी आपले धनुष्य त्याच्यावर टेकवले, तेव्हां तो ओरडावयाचा थांबला. प्रभू रामचंद्रांना आश्चर्य वाटले. घाबरून जास्ती ओरडण्याऐवजी हा गप्प कसा बसला? त्यांनी बेडकाला विचारल्यावर तो म्हणाला, मला कोणी मारू लागले तर मी 'रामा धाव' म्हणून ओरडतो. आता आपणच धनुष्याखाली धरले आहे तेव्हा मी काय करणार? प्रभू रामचंद्र हसले आणि आपल्या कृपादृष्टीने त्यांनी त्याचा उद्धार केला. गोष्ट सांगून साधक क

म्हणाले, आपल्या किरकिरीचा त्रास होतो म्हणून तरी श्रीमहाराजांनी आपल्याकडे पहावे इतकी किरकिर तरी करता आली पाहिजे.

## |१४८| (२० जुलै १९९०)

आम्ही गेलो तेव्हा एक गृहस्थ पू. बाबांना भेटावयाला आले होते. ते काही कामासाठी दहा दिवस कलकत्त्याला जाणार आहेत. त्यांना पू. बाबा म्हणाले : नाम हे स्थलकालाच्या पलीकडे आहे. त्याचप्रमाणे 'मी' ही जाणीव स्थलकालाच्या पलीकडे आहे आणि परमात्माही स्थलकालाच्या पलीकडे आहे. 'मी' ची दोन अंगे आहेत. एक गतिहीन म्हणजे शिवस्वरूप आहे. ते साक्षी आहे. दुसरे गतिमान असून शक्तीवर आधारलेले आहे, कारण शक्तीखेरीज गती असूच शकत नाही. हे दुसरे अंग जीवन-व्यवहारात गुंतलेले असते. नाम आपल्याला म्हणजे 'मी' च्या ह्या दुसऱ्या अंगाला शिवाकडे जाण्याचा मार्ग दाखवते आणि त्याची गाठ घालून देते. म्हणून देहाच्या कोणत्याही परिस्थितीत नाम टिकले म्हणजे आपण काहीतरी कमावले असे म्हणता येईल. प्रवासात, गाडीत देखील घरच्यासारखे नामस्मरण व्हावे म्हणजे ते स्थलकालापलीकडे आहे असे म्हणता येईल.

ते गृहस्थ गेल्यानंतर पू. बाबांनी मागच्या शुक्रवारचाच प्रेमाचा विषय पुढे सुरू केला. ते म्हणाले, याबाबतीत तीन प्रश्न आहेत :

१) माणूस प्रेम कां करतो ?

२) प्रेम करतो म्हणजे नेमके काय करतो ? आणि

३) प्रेम वाटण्यासाठी, वाढवण्यासाठी काय करावे ?

पू. बाबा म्हणाले, ह्या प्रश्नांवर मी बराच विचार केला.

१) प्रेम का करतो याला तसे उत्तर देता येणार नाही. प्रेम केल्याशिवाय राहवत नाही म्हणून प्रेम करतो इतकेच म्हणता येईल.

२) प्राण्यांपेक्षा माणसात विशेष असेल तर तो हा की माणूस देहापलीकडे पाहू शकतो. प्राण्यांपासून त्यांची पिले नेली की ते त्यांना विसरतात. पण माणसाला प्रेमविषय समोर नसला तरी त्याचे स्मरण राहते आणि त्या स्मरणाने प्रेम वाढते. लोकांना विस्मृती होऊ नये म्हणून स्मारकांद्वारे माणूस जगात राहू इच्छितो. प्रेमात आपल्यापलीकडे जाऊन काही करण्याची प्रेरणा असते. प्रेमाचा व्यवहार हा देण्यात आहे. ज्याच्यावर प्रेम आहे त्याला काहीतरी द्यावे असे वाटते. म्हणजे प्रेमात त्यागाची भावना असते. तृप्ती व समाधानासाठी

माणूस प्रेम करतो. तो आपला मी काही प्रमाणात दुसऱ्यामधे पाहतो. म्हणून प्रेमात थोडे तादात्म्य असते. प्रेमात माणसाचे अंत:करण मृदु बनते. प्रेम हे, दोष हा दोष आहे हे जाणूनही दोषदृष्टीने पहात नाही. तथापि प्रपंचात नातेवाइकांवर निस्वार्थी प्रेम करणे, निरपेक्ष प्रेम करणे कठीण आहे.

३) प्रेम वाढवायचे असेल तर ज्याच्यावर प्रेम असते त्याला आवडेल तसे वागावे. म्हणून आपण श्रीमहाराजांना आवडेल असे वागलो तर त्यांच्यावरचे प्रेम वाढेल. प्रतिसाद मिळाला की प्रेम वाढते.

**साधक क :** प्रेम करता यावे म्हणून ज्यांच्याजवळ प्रेम आहे अशांचा सहवास फार उपयोगी पडेल. प्रेमात स्मरण सहज राहते. प्रेमविषय पुन:पुन्हा पहावासा वाटतो. श्री. भाऊसाहेब अर्धा अर्धा तासाने श्रीमहाराज कोठे आहेत, काय करत आहेत ते पाहून येत असत. खेळात रंगलेले असतानाही लहान मूल मधून मधून आई कोठे आहे ते पाहून येते, तसे.

**पू. बाबा :** परमार्थाची एक कठीण परीक्षा म्हणजे जो माणूस आपल्याला आवडत नाही त्याच्याबद्दल तुच्छबुद्धी नसणे. हे कठीण आहे. प्रेमाचे dimension थोडे निराळे आहे. मुलाला, आईचे आपल्यावर किती प्रेम आहे याची कल्पना नसते त्याप्रमाणे आपल्यालाही सद्‌गुरूंचे आपल्यावर किती प्रेम आहे याची कल्पना येत नाही. त्यांनी पुष्कळ वेळा आपल्याला संकटातून वाचवलेलेही असते. तथापि हे कळायला देखील काही पात्रता यावी लागते. यासाठी श्रीमहाराजांबद्दल आपल्या मनात कृतज्ञता हवी. आपल्या सर्व कृतींना ते साक्षी आहेत हे लक्षात ठेवून आपण त्यांना आवडेल असेच वागावे.

श्रीमहाराजांचे व्यक्तिमत्त्व अतिशय प्रसन्न होते. श्रीमहाराजांच्या चरित्रलेखनाच्या निमित्ताने मी अनेकांना भेटलो, आठवणी गोळा केल्या. ज्यांना ज्यांना भेटलो त्या सर्वांच्या श्रीमहाराजांच्याबद्दल गोड स्मृती होत्या. श्रीमहाराजांचे हे वैशिष्ट्य मला साधलेले नाही; पण आपण गेल्यावर लोकांच्या मनात आपल्याबद्दल गोड स्मृती रहाव्या असे वाटते. अशा जनप्रियत्वासाठी लोकांवर निस्वार्थी प्रेम असावे लागते. पू. तात्यासाहेब म्हणत की जेथे श्रीमहाराज तेथे आनंद असायचाच.

श्रीमहाराज म्हणत, साधू दोन प्रकारचे असतात. एक, कर्म करून लोकांचे कल्याण करतात तर दुसरे कर्म न करता केवळ आपल्या अस्तित्वाने लोकांचे कल्याण करतात. यासंबंधी श्रीमहाराज उदाहरण देत. एक गृहस्थ अतिशय

शिस्तीने वागणारे होते. त्यांची पावले जिन्यावर वाजली की माडीवर दंगा करणारी त्यांची मुले आपोआप गप्प बसत. आता मुलांना गप्प बसविण्यासाठी वास्तविक त्यांनी काय कर्म केले? काहीच नाही. त्याप्रमाणे सद्गुरूंच्या नुसत्या अस्तित्वाने कल्याण होते. म्हणून आपण त्यांच्या अस्तित्वाचा भाव ठेवावा.

एका गुरुपौर्णिमेला श्रीमहाराज म्हणाले होते की जीवांचे कल्याण होण्यापलीकडे मला कोणतीच अपेक्षा नाही. असे गुरु आपल्याला लाभले हे आपले केवढे भाग्य!

## ।१४९। (२७ जुलै १९९०)

आम्ही पू. बाबांकडे गेलो तेव्हां तेथे रूपारेल कॉलेजचे निवृत्त प्राचार्य डॉ. मुद्गल आलेले होते. ते तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते. नुकतेच ते गोंदवल्याला ८-१० दिवस राहून आले होते. त्यांच्याकडून कर्नाटकातील भक्तिसंप्रदायासंबंधी माहिती ऐकावयास मिळाली. पुरंदरदासांचे एक कानडी पद म्हणून दाखवून नंतर त्यांनी त्याचा भावार्थ सांगितला. भक्त कृष्णाला आळवीत आहे; म्हणतो आहे - अरे कृष्णा! तू पांडवांकडे जाऊ नकोस; तेथे गेलास तर ते तुला घोडे धुवायला लावतील. नंदाकडे जाऊ नकोस; तो तुला गाई चारावयाला वनात पाठवून देईल. यशोदेकडे जाऊ नकोस; ती तुला खांबाला बांधून ठेवील. त्यापेक्षा, हे कृष्णा! माझ्याकडे ये ना! माझ्या हृदयात मी तुझ्यासाठी आसन सिद्ध केले आहे.

नामाचे महत्त्व सांगतांना डॉ. मुद्गल म्हणाले, नाम हे सत्वस्वरूपच आहे. सगुणमूर्तीचे ध्यान एकसारखे करता येणार नाही पण अखंड नामस्मरण शक्य आहे. त्याला कोणतीही उपाधि अथवा बंधन नाही. नामाला विधिनिषेध एकच. स्मरण हा विधि आणि विस्मरण हा निषेध. मुखात नाम असणे हे हातात भगवंत असण्यासारखेच आहे. पण म्हणूनच अखंड नामस्मरण अवघड आहे. तथापि ज्ञानमार्ग जास्त अवघड असून ज्ञानी माणसाचा अहंकार केव्हां धोका देईल सांगता येत नाही. ज्ञान शुद्ध आहे तर भक्ती रसमय आहे. भागवत संप्रदायाने सामान्य माणसाला भक्तिमार्ग दाखविला आहे कारण प्रत्येकाला तीव्र बुद्धी नसली तरी भावना असते. तिच्या आश्रयाने तो भक्ती करू शकतो.

डॉ. मुद्गल गेल्यानंतर शरणागतीसंबंधी बोलणे निघाले. पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांनी ओल्या धोतराचे उदाहरण दिले आहे. ओले धोतर बदलून कोरडे

नेसल्यावर ओले धोतर जमिनीवर तसेच पडते तसा गुरुप्रेमाने भिजलेला शिष्य गुरूच्या दारी पडून राहतो. ही श्रेष्ठ शरणागती होय. अशा शिष्याला गुरु उचलून घेतात. श्रीमहाराज कृपासिंधू होते. त्यांच्या गोष्टी निघाल्या की डॉ. कूर्तकोटींच्या डोळ्यांना पाणी येई. ब्रह्मानंद महाराज म्हणत की ज्याच्यावर श्रीमहाराजांची दृष्टी पडली त्याला त्यांनी सोडले नाही. एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की आपण इतक्या लोकांना नाम देता, ते तुमच्या लक्षात राहतात का? श्रीमहाराज म्हणाले, सैन्यातल्या घोड्यांना ओळखता यावे म्हणून नंबरचा ठसा डागतात; तसा नाम दिलेला माझा माणूस मला केव्हांही ओळखता येतो.

## |१५०| (३ ऑगस्ट १९९०)

सुरुवातीला पू. बाबांनी पाँडिचरीच्या 'मदर' यांच्या **The Great Adventure** या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. एका थिऑसफिस्ट बाईंनी त्यांना विचारले की जीवनातील लहानसहान गोष्टीत देखील परमेश्वराची इच्छा काय आहे हे कसे ओळखायचे? उदाहरणार्थ, माझ्या कॉफीच्या कपात मी एक चमचा साखर घालावी की दोन चमचे? मदरनी लिहिले आहे की हा प्रश्न त्या बाईंनी अगदी गंभीरपणे विचारला होता. मदरनाही त्यावर थोडा विचार करावा असे वाटले. त्या म्हणाल्या, कोणत्याही लहानमोठ्या कर्मात ईश्वराचे स्मरण व्हावे. कर्म लहान आहे की मोठे यापेक्षा ईश्वराचे स्मरण होणे ही जास्त महत्त्वाची गोष्ट आहे.

पू. बाबांनी विचारले, खरोखर त्यांची (भगवंताची किंवा सद्गुरूंची) इच्छा समजणे शक्य आहे काय आणि ते केव्हां शक्य आहे? जीवनात हरघडी पावलोपावली आपल्यासमोर समस्या उभ्या रहातात. हे करू की ते करू असा संभ्रम निर्माण होतो. अशा वेळी काय करायचे? त्यांची इच्छा कशी ओळखायची?

**साधक प** : हा प्रश्न करतांना आपण त्यांचे अस्तित्व आणि ते माझ्या जीवनात कमीजास्त करू शकतात - नव्हे, माझे जीवन त्यांच्यावरच अवलंबून आहे या दोन गोष्टी गृहीत धरतो. जीवनातले मोठे प्रसंगच नव्हे तर साधा हात खाली-वर करणे त्यांच्या सत्तेने घडते असे वाटू लागले तर जे जे घडेल ते ते त्यांची इच्छा असे वाटून अस्वस्थता येणार नाही.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणत की आपण रोज झोपी जातो आणि सकाळी पुन्हा जागे होतो हाच जीवनातला केवढा मोठा चमत्कार आहे. तथापि आपण

जागे होतो, उठतो ते त्याच्या इच्छेने असे खरोखर कधी वाटते का? खरे म्हणजे आपण याबद्दल कधी असा विचारच करीत नाही.

**साधक ख** : जोपर्यंत मी कर्ता असे वाटते तोपर्यंत सद्गुरु कर्ते आहेत असे वाटणारच नाही. माझी इच्छा नाहीशी झाल्याखेरीज त्यांची इच्छा समजणे कठीण आहे. श्रीमहाराज असतांना त्यांचे उत्तर ऐकून देखील त्यांची इच्छा लोकांच्या लक्षात येत नसे कारण आपली इच्छा त्यात घालून ते त्याचा अर्थ लावत. पदोपदी अगदी लहानसहान गोष्टीत देखील त्यांना विचारणे शक्य होते.

**पू. बाबा** : होय, हे खरे आहे. आम्ही अगदी लहानसहान गोष्टी देखील त्यांना विचारत असू आणि त्यांनी सांगण्याचा कधी कंटाळा केला नाही. तथापि गुरु देहात असतांना त्यांनी प्रश्नाचे उत्तर दिले तरी संशय राहण्याची भीती असते. श्रीमहाराज मोठ्या खुबीने बोलत. काही वेळा त्यांच्या मनात नेमके काय आहे याचा थांगपत्ता लागत नसे. श्रीमहाराजांवर पूर्ण श्रध्दा ठेवणारी माणसे थोडी. ते करतील ते आपल्या हिताचेच असेल असे त्यांना खरोखर वाटत असे.

ह्या संदर्भात पू. बाबांनी एक हकिगत सांगितली. एक गृहस्थ श्रीमहाराजांचे अनुग्रहीत होते. आपला मुलगा डॉक्टर व्हावा अशी त्यांची इच्छा होती. पुढे ते खूप आजारी पडले तेव्हां त्यांनी पत्नीला सांगितले की तुला श्रीमहाराज सांभाळतील. मुलगा डॉक्टर होण्याच्या संदर्भात ते म्हणाले की श्रीमहाराजांची इच्छा काही अन्य दिसते. पुढे ते वारले. मुलगा इंटर सायन्स पास होऊन फर्गसन कॉलेजात बी. एस्‌सी. च्या वर्गात दाखल झाला. एक दिवस फर्गसन कॉलेजच्या प्रिन्सिपलना बी. जे. मेडिकल कॉलेजच्या डीनचा फोन आला की एम्. बी. बी. एस्. च्या वर्गात एक जागा रिकामी आहे, कोणी चांगला मुलगा असला तर पाठवावा. प्रिन्सिपलनी ह्या मुलाला विचारले. तो जायला तयार होता पण त्याच्याजवळ फीसाठी पैसे नव्हते. प्रिन्सिपलनी स्वत: पैसे देऊन त्याला मेडिकल कॉलेजात पाठवले आणि पुढे तो डॉक्टर झाला!

ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, हे सर्व ठीक आहे. आपण काय करायचे ते सांगा.

**साधक ग** : श्रीमहाराजांना सांगून सर्व काही करायची सवय लावून घेतली पाहिजे; म्हणजे मी कर्ता हा भाव नाहीसा होईल आणि त्यांची इच्छाच काम करते हे जाणवेल.

**पू. बाबा :** आपल्या जीवनात जे काही बरेवाईट घडते ते सारे रामइच्छेने घडते असे खरे खरे आतून वाटले तरच मी कर्ता हा भाव नाहीसा होईल. श्रीसमर्थांच्या बाबतीत रघुनाथ पंडितांनी म्हटले आहे की हा लोकाभिराम - लोकांच्या मनाला आनंद देणारा समर्थ पुरुष स्वत:ला रामदास म्हणवून घेतो आणि त्याच्या तोंडी नेहमी राम कर्ता हे शब्द आहेत. श्रीमहाराजांनाही काही विचारले की ते राम करील असे म्हणत असत. एकदा एकजण त्यांना म्हणाले, तुम्ही मी करीन असे म्हणा. याबर ते म्हणाले, अरे, जे शब्द उच्चारून मी माझी जीभ जन्मात कधी विटाळली नाही ते तू मला म्हणायला सांगतोस!

**साधक क :** भगवंतांनी गीतेत मन आणि बुद्धी माझ्या ठायी ठेव म्हणून सांगितले आहे. बुद्धी योग्य अयोग्य ठरवते पण मन तिचे ऐकत नाही. जेव्हां या दोहोत समन्वय होईल तेव्हां त्यांची इच्छा समजेल.

**पू. बाबा :** चित्त शुद्ध झाल्याखेरीज (त्यात बुद्धीही आलीच) त्यांची इच्छा समजणार नाही. आणि वैराग्याखेरीज चित्तशुद्धी होणार नाही. त्यांची इच्छा कळण्यासाठी विवेक आणि वैराग्य आवश्यक आहेत.

**साधक क :** माणूस साधनचतुष्टयसंपन्न झाला की त्याचा जीवनातला रसच **(Interest)** कमी होतो. मग काहीही घडले तरी तो सुखदु:ख करीत नाही. ज्याला प्रारब्धाचा सिद्धान्त पटला आहे तो निर्णय करतांना गोंधळून जात नाही. प्रश्न आहे तो सामान्य माणसाचा आहे.

**साधक ग :** बाहेर जातांना श्रीमहाराजांना सांगून जायचे, परत आल्यावर परत आल्याचे त्यांना सांगायचे अशी प्रत्येक कृती त्यांना सांगून करायची सवय लावून घेतली तर त्यांच्या इच्छेविरुद्ध काही होणार नाही.

**पू. बाबा :** तरीदेखील बुद्धी जोपर्यंत विकाराधीन आहे तोपर्यंत त्यांची इच्छा समजणार नाही. आपली इच्छा मारण्यासाठी राम इच्छा, राम कर्ता हा भाव वाढवलाच पाहिजे. त्यासाठी सर्व गोष्टी त्यांना सांगून कराव्या. अनुसंधान वाढवावे आणि आपली प्रत्येक कृती आपल्या ध्येयाशी सुसंगत आहे ना याचे आत्मपरीक्षण करावे. यासाठी साधकाने सर्वकाळ सावध असले पाहिजे.

## |१५१| (१० ऑगस्ट १९९०)

मुक्काम गोंदवले.

आज गोंदवल्याला ६ वे नामसाधन अभ्यास शिबीर सुरू झाले. संध्याकाळी शंकासमाधानाच्या सत्रात विचारलेल्या काही शंकांबद्दल नंतर पू. बाबांकडे चर्चा झाली.

एका साधकांनी विचारले होते, श्रीमहाराजांनी म्हटले आहे की हवेनकोपण सोडावे. यातील हवेपण एकवेळ सोडणे जमेल; आता पुरे असे वाटेल. पण नकोपण कसे सोडायचे? पू. बाबांनी विचारले, असे का होते?

**साधक प :** जे व्हावयाला नको वाटते ते नेहमीच दु:खाचे असते. दु:ख यायचे असेल तर येऊ दे असे म्हणणे जास्त कठीण आहे. तसेच नको ते टाळणे आपल्या हातात नाही.

**साधक ग :** हवेपणाला एक वेळ मर्यादा घालता येईल पण नकोपणाला मर्यादा कशी घालणार?

**साधक प :** जीवनात दु:खाचे प्रमाण जास्त आहे. 'सुख पाहता जवापाडे। दु:ख पर्वताएवढे।' गौतमबुद्धाने देखील जगात दु:ख आहे आणि ते नाहीसे करण्याचा मार्ग आहे असेच म्हटले आहे.

**साधक क :** सुखापेक्षा दु:खाची संवेदना जास्त खोल असते आणि त्यामुळे दु:खाची भीती वाटते. जीवनातली अनिश्चितता माणसाला सुखाने जगू देत नाही. आज ठीक चालले आहे, उद्या काय होईल कोणास ठाऊक असे वाटते. अशुभ टळावे असे वाटते.

**साधक ग :** हवेनकोपण जाणे ही श्रीमहाराजांची वासनाशून्य होण्याची भाषा आहे. हवे आणि नको अशी वेगळी पदे घेऊन ह्या वचनाचा अर्थ लावता येणार नाही. हवेनकोपण सोडावे म्हणजे वासनाशून्य व्हावे.

**पू. बाबा :** वासना सूक्ष्म देहातून येतात. चित्तशुद्धी झाली की सूक्ष्म देहही शुद्ध होऊ लागतो.

आणखी एका साधकांनी विचारले होते की भगवंत हा सहजसाध्य आहे म्हणजे काय?

**पू. बाबा :** आज आपण सहज जीवन जगत नाही. आपल्या इच्छा आकांक्षांप्रमाणे जीवन घडवण्याचा प्रयत्न करतो. व्यवहारातल्या या प्रयत्नांसारखाच भगवंत मिळावा यासाठी प्रयत्न असतो. पण व्यवहारात आणि परमार्थात जोपर्यंत आपण सर्व काही त्याच्यावर सोपवत नाही तोपर्यंत जीवनात सहजता येणार नाही. ती आली की तो आहेच. म्हणून भगवंत सहजसाध्य आहे.

## ।१५२। (११ ऑगस्ट १९९०)

**पू. बाबा :** आज सकाळी निरूपणात सांगितलेली तुलसीदासांची ओळ मला पुन: पुन्हा आठवते आहे. ''को ऐसो उदार जगमाँहीं। बिनु सेवा जो

द्रवँही दीनपर। रामसरिस कोऊ नाहीं॥'' मला ही ओळ फार आवडली. श्रीमहाराज देखील स्वत:ला दीनदास म्हणवून घेत असत. ते म्हणत, प्रापंचिक माणूस दीन असतो. त्याची सेवा करणे मला आवडते. खरोखर, तुलसीदास, मीराबाई कशी तयार होत गेली याचा मोठा अचंबा वाटतो. मीराबाई म्हणते, 'मोहीं लागि लगन गुरु चरननकी।' लगनला मराठी शब्द कोणता?

आम्ही चटक आणि छंद हे शब्द सुचविले.

**पू. बाबा** : छंद योग्य वाटतो. 'गोविंद गोविंद मना लागलिया छंद।' तुम्हाला सांगतो, ऐकून ठेवा, दृश्य सुटल्याखेरीज भगवंताचे दर्शन नाही. एक वेळ अशी येते की दृश्य सुटलेले असते आणि भगवंताचे दर्शन झालेले नसते. त्यावेळी जीवास फार भीती वाटते.

हे बोलणे चालू असतानाच डॉ. आप्पासाहेब आठवले आले. पू. बाबांनी विचारले म्हणून त्यांनी मग रमणमहर्षींच्यासंबंधी आणि स्वामी स्वरूपानंदांसंबंधी काही आठवणी सांगितल्या.

साधक ड म्हणाले की ते जेव्हां जेव्हां स्वामी स्वरूपानंदांकडे जात तेव्हां तेव्हां स्वामी त्यांना नेमके श्रीमहाराजांसंबंधी एखादे पुस्तक काढून त्यातला काही भाग वाचावयाला सांगत असत.

श्री. राघवेंद्रस्वामी रामदासी म्हणाले की स्वामींनी त्यांना पावसला चार दिवस ठेवून घेतले होते. राघवेंद्रस्वामींच्या मनात ज्या शंका येत असत त्यांचे विचारण्यापूर्वीच स्वामी समाधान करीत असत.

## |१५३| (१२ ऑगस्ट १९९०)

संध्याकाळी ७-३० वाजता आम्ही पू. बाबांच्या खोलीत गेलो तेव्हा पू. बाबा एका म्हाताऱ्या बाईशी बोलत होते. खोलीत खूप गर्दी होती. आम्ही नमस्कार करून बसलो तेव्हां पू. बाबा विनोदाने म्हणाले की आमचे दुकान लहान आहे. तेव्हा त्या बाई चटकन म्हणाल्या, पण माल खच्चून भरलेला आहे!

**पू. बाबा** : परमार्थाकडे वळण्यासाठी आणि जो वळला आहे त्याच्यासाठी म्हणून सामान्य माणसाला काय सांगावे?

येथे नामस्मरण चांगले होते हा येथील वातावरणाचा परिणाम आहे. एका बँकेतले अधिकारी इंग्लंडमधील शाखेत सहा वर्षे होते. संध्याकाळी ऑफिसातून आल्यावर आंघोळ करून ते जपास बसत. पण तरीदेखील त्यांचा जप सकाळच्या जपाइतका चांगला होत नसे. नाम हे फार नाजुक आहे. साधन करतांना सुरुवातीला फार जपावे लागते, कारण त्या काळात

वातावरणाचा आपल्या साधनावर फार परिणाम होतो. आपण नाम घेतो पण व्यवहारात उतरलो की नामाची पातळी टिकत नाही. गैरसोयी सोसून देखील माणसे येथे येतात त्याअर्थी त्यांच्यामधें परमार्थाचे बीज आहे. म्हणून आलेल्या या संधीचा फायदा कसा करून घ्यावा ते समजले पाहिजे. संधी कशी हुकते याची त्यांनी काही उदाहरणे दिली.

१) श्रीमहाराज देहात असतांना गंगूबाई नांवाच्या एक बाई येथे सैपाकघरात काम करत असत. स्वयंपाक आणि इतर काम झाल्यावर शेवटी ब्रह्मानंद महाराजांबरोबर त्या जेवायला बसत असत. एक दिवस श्रीमहाराजांनी त्यांना त्यांच्या पंगतीला जेवायला बसायला सांगितले. त्यांनी लक्ष दिले नाही म्हणून श्रीमहाराजांनी पुन्हा गंगूबाई, आज माझ्याबरोबर जेवायला बसा म्हणून सांगितले. पण तरीदेखील शेवटी ब्रह्मानंद महाराजांबरोबर बसायचे म्हणून त्या जेवायला बसल्या नाहीत. नंतर जेवायला बसल्या तेव्हां श्रीमहाराजांची आज्ञा आपण पाळली नाही ही मोठी चूक केली हे लक्षात येऊन त्यांना रडू आले. पण आता संधी हुकली होती. आज्ञापालन अतिशय महत्त्वाचे आहे. अगदी लहानसहान बाबतीत देखील गुरुआज्ञेबाहेर जाता कामा नये.

२) श्रीमहाराजांसह बरीच मंडळी रामेश्वरला गेली होती. ज्या पर्वणीवर श्रीरामांनी सेतुबंधनास सुरुवात केली होती त्या पर्वणीवर, प्रपंच रामाला अर्पण करून रामाचा म्हणून करावा असे श्रीमहाराजांनी सांगितले तेव्हां सर्वांनी तसे केले पण पुढे सर्वजण ते विसरले.

३) व्यंकटापूरला श्रीमहाराज म्हणाले, तुम्ही कोणी माझे ऐकत नाही म्हणून मी आता येथेच राहतो. श्री. गणपतराव दामले वगैरे सर्वजण रडू लागले. त्यांनी श्रीमहाराजांची प्रार्थना केली; नंतर तो प्रसंग संपला. पण या प्रसंगावरून कोणी काही शिकले नाही.

**पू. बाबा** : इंद्रियांचे सुख आज जरी गोड वाटले तरी परिणामी विषमय आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे, अन्नात विष आहे असे कळले की भरल्या पानावरून माणूस उठून जाईल. साधन वाढण्यासाठी जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शन आवश्यक आहे.

## **।१५४।** (१३ ऑगस्ट १९९०)

**साधक** : आपण पुनर्जन्म मानतो. आपल्याला पूर्वजन्माची स्मृती का नसते ?

**पू. बाबा :** पूर्वीचे कळून उपयोग काय? आणि पूर्वीचे कळू लागले तर पुढचेही कळू लागेल कारण तुम्ही काळाच्या परिमाणाबाहेर जाल. कदाचित साधकाला या गोष्टीचा उपयोग होईल, पण सामान्य माणसाला याचा काय उपयोग?

**साधक ग :** चिन्मय मिशनच्या मासिकाच्या एका अंकात ह्या प्रश्नाला दिलेले उत्तर मी वाचले होते. त्यात दोन प्रकारांनी उत्तर दिलेले होते.

१) आपली स्मृती मेंदूत असते. देह गेला की मेंदूबरोबर स्मृतीही जाणारच. शिवाय ह्या जन्मातले देखील सगळे आपल्याला कोठे आठवते?

२) पूर्वजन्माची स्मृती म्हणतांना पूर्वीचा एकच जन्म का म्हणून विचारात घ्यायचा? समजा, मागच्या अनेक जन्मांच्या स्मृती जागृत झाल्या आणि तुमचा मुलगा दोन जन्मांपूर्वी तुमचा शत्रू होता, भावाने गेल्या जन्मी तुमच्यावर विषप्रयोग केला होता अशासारख्या गोष्टी तुम्हाला समजल्या आणि असेच तुमच्याबद्दल काहीबाही त्यांना समजले तर जीवन किती दु:सह होईल! तेव्हां ईश्वराने टाकलेला हा विस्मरणाचा पडदा योग्यच आहे.

**साधक क :** होय; तथापि काही वेळा अबोध स्मृती जागृत होत असाव्या. काही माणसे पाहिली की आपल्याला त्यांच्याबद्दल अकारण प्रेम वा द्वेष वाटतो.

**साधक ग :** कालिदासाने म्हटलेच आहे की भावस्थिराणि जननान्तर सौहृदानि।

**पू. बाबा :** साईबाबांची एक गोष्ट सांगतो. एकदा ते काही लोकांबरोबर बोलत बसलेले असतांना एकाएकी उठले आणि तळ्याकाठी गेले. तेथे एक साप एका बेडकाला गिळत होता. साईबाबांनी त्या बेडकाची सापाच्या तोंडातून सुटका केली. लोकांनी त्यांना याचे कारण विचारले तेव्हां ते म्हणाले की मागच्या जन्मी ह्या दोघांचे एकाच स्त्रीवर प्रेम होते. तेव्हां आता बेडूक झालेल्या ह्या माणसाने आता साप झालेल्या माणसाला ठार मारले. मरतांना तो म्हणाला की पुढच्या जन्मी मी ह्याचा सूड घेईन. तेव्हां घाबरून आणि पश्चात्ताप होऊन तो खुनी माणूस मला शरण आला. पुढच्या जन्मी तुझे रक्षण करीन असे मी तेव्हां त्याला सांगितले होते.

ही गोष्ट सांगून पू. बाबा म्हणाले, जो संतांना शरण जातो त्याचे नेहमी कल्याणच होते. खरोखर सद्गुरूंचा विचार मनात आला की कृतज्ञता वाटली पाहिजे. आपण किती क्षुद्र माणसे, पण श्रीमहाराजांनी आपल्यावर किती

उपकार केले! पू. तात्यासाहेब म्हणत की श्रीमहाराजांनी किती लोकांवर उपकार केले ते पाहिले की मन विस्मित होते. ते म्हणत, जेथे श्रीमहाराज तेथे नेहमी आनंदच असे.

## ।१५५। (१७ ऑगस्ट १९९०)

मालाड येथे पू. बाबांच्या घरी.

कालच पुण्याहून परत येऊनही पू. बाबा आज आमची वाट पहात होते. ते म्हणाले, मी अजून गोंदवल्याच्याच वातावरणात आहे. समजा एक टी.व्ही आहे. त्याची रचना समजली, त्याचे कार्य कसे चालते ते समजले तर त्याचे गुणधर्म माहीत होतील. त्याप्रमाणे जीवनाची रचना आणि गुणधर्म माहीत झाले तर माणूस दु:खाच्या घटना घडल्या तरी दु:ख करणार नाही.

**साधक प** : मी जर टी.व्ही चा एखादा भाग असलो तर मला टी.व्ही कडे वेगळेपणाने पहाता येणार नाही. त्याप्रमाणे जोपर्यंत साक्षीभाव आलेला नाही तोपर्यंत जीवनाकडे तटस्थ वृत्तीने पहाता येणार नाही आणि त्यामुळे सुखदु:खे राहणारच.

**पू. बाबा** : याकरताच राम कर्ता हा भाव पाहिजे.

**साधक ज** : साक्षीभाव आला तर सिनेमाच्या पडद्यावर घडणाऱ्या घटनांकडे पाहिल्याप्रमाणे माणूस स्वत:च्या जीवनाकडे वेगळेपणाने पाहू शकेल.

**पू. बाबा** : पुढे काय होणार आहे ते कळले तर साधनात जोर येईल का?

**साधक प** : साधनात जोर यावयाला साधन कशासाठी करतो याची स्पष्ट कल्पना पाहिजे.

**पू. बाबा** : ऑर्थर कोस्टलरच्या Act of creation मधे Science and Emotion संबंधी लिहितांना त्याने आइन्स्टाइनचे एक विधान दिले आहे. आइन्स्टाइन म्हणतो, माझे संशोधन सफल होवो अथवा न होवो, मी कसून प्रयत्न केला याचाच मला आनंद होतो. तसे मी म्हणतो की ह्या जन्मी साधन सफल होवो अथवा न होवो, आपण कसोशीने साधन केले असे वाटावे. याचाच अर्थ असा की फलावर दृष्टी न ठेवता उत्कटतेने कर्म करता आले पाहिजे. हे का शक्य होत नाही?

**साधक ग** : फलाशिवाय कर्म करण्याचे आम्हाला व्यवहारात माहीतच नाही. आणि येथे तर सूक्ष्मात जायचे आहे.

**पू. बाबा** : माझ्यामधें जी शक्ती वास करते आणि कार्य करते ती शक्ती विश्वशक्तीचाच भाग आहे. तिचे स्वतंत्र आणि वेगळे अस्तित्व नाही अशी जाणीव झाली तर माणसाच्या हातून कर्म घडेलच आणि त्यातला मी कर्म करतो हा अहंकार निदान कमी तरी होईल.

**साधक ख** : याचाच अर्थ, राम कर्ता हा भाव वाढविला पाहिजे.

**पू. बाबा** : ब्रदर लॉरेन्सच्या जीवनात ह्या भावाचा परमोत्कर्ष झालेला आढळतो. तो म्हणतो, सर्व काळ भगवंताचे स्मरण राहिले, तो कर्ता ही जाणीव टिकू लागली की आनंदच आनंद! सैपाकघरात काम करत असतांना भांड्यांच्या आवाजात देखील (clatter of utensils) मला त्याचा आवाज ऐकू येत असे. त्याने त्याच्या प्रगतीच्या तीन पायऱ्या सांगितल्या आहेत. १) Recollection - स्मरण २) Conversation - संभाषण. सुरुवातीला हे एकतर्फी असते. तुम्ही ईश्वराशी बोलता. तो बोलेलच असे नाही. ३) Sustained awareness - अनुसंधान. सुरुवातीला यात प्रयत्न असतो पण पुढे ते सहज होते. म्हणून मी नेहमी सांगतो की हा अभ्यास आहे आणि निश्चयाने तो केला पाहिजे.

नंतर श्रीमहाराजांसंबंधी गोष्टी निघाल्या.

**पू. बाबा** : श्रीमहाराज मला म्हणाले होते की मला माझा संसार नीट करता आला नाही पण दुसऱ्याचा संसार चांगला करता येतो; तो माझ्यावर सोपवा. तेव्हां आम्हाला त्यांचे बोलणे समजले नाही. ते फक्त भाऊसाहेबांना जमले. त्यांची बालवृत्ती होती.

**साधक क** : श्रीमहाराजांनी सांगितले तरी लोकांचा विश्वास बसत नसे. पू. तात्यासाहेबांच्या डायरीत एक हकिगत दिली आहे. श्री वामनराव आपटे बरेच आजारी होते. म्हणून त्यांना मालाडहून त्यांच्या बंधूंकडे नेले. वामनरावांच्या पत्नी श्रीमहाराजांना भेटायला आल्या आणि रडू लागल्या. श्रीमहाराजांनी त्यांना पुष्कळ प्रकारे समजावून सांगितले. 'काळजी करू नये, रामाचे कृपेने त्यांना खात्रीने बरे वाटेल' असे म्हणाले तरी त्या जाईनात. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की, 'मी काय केले म्हणजे तुम्हाला खरें वाटेल? त्या काही बोलेनात व उठेनात तेव्हां श्रीमहाराजांनी हळदीकुंकवाचा करंडा आणण्यास सांगितले, व आपल्या हाताने त्यांना कुंकू लावले तेव्हा धीर येऊन त्या उठल्या. पुढे वामनराव त्या आजारातून चांगले बरे झाले.

**पू. बाबा :** बाळंभट जोशांचे गांजाचे व्यसन श्रीमहाराजांनी कसे सोडवले ते श्रीमहाराजांच्या चरित्रात आहेच. बाळंभटांना दोन-तीन मुली होत्या. त्यांच्या बायकोला श्रीमहाराजांनी तुम्हाला काय पाहिजे म्हणून विचारले. त्या म्हणाल्या मुलगा पाहिजे. यावर श्रीमहाराज, काय शिंची बायकांची बुद्धी तरी, म्हणाले व तिला म्हणाले, बाई, पण ते शेवटास जाणार नाही. तरीही तिने हट्ट धरल्यावर म्हणाले, ठीक आहे. पुढे मुलगा झाला आणि २०-२२ वर्षांचा होऊन वारला. बाईंनी श्रीमहाराजांना अजिबात दोष दिला नाही. पुढे त्यांची विपन्नावस्था आली तरी शेवटपर्यंत त्या समाधानात होत्या.

अशीच गोष्ट श्री. गणपतराव दामल्यांच्या पत्नीची. श्री गणपतरावांच्या मृत्यूनंतर त्यांचा मोठा मुलगा श्री. रामकृष्णपंत जलोदराने वारले. पुढे बाईही खूप आजारी होत्या. मी त्यांना भेटायला गेलो होतो तेव्हां विचारले की श्रीमहाराजांनी असे कसे केले असे नाही का वाटत? तेव्हां आजारी असूनही एकदम अर्धवट उठून बसत त्या म्हणाल्या, त्यांना का दोष देता? हे आपल्या प्रारब्धाचे भोग आहेत. श्रीमहाराजांनी सामान्यातून अशी निष्ठावान माणसे तयार केली. खरोखर, त्यांनी मातीतून अत्तर काढले!

पू. बाबांनी विचारले, ही निष्ठा कशी वाढवावयाची? पुढे तेच म्हणाले, यासाठी सत्संग पाहिजे. त्यांचे जीवन जवळून पाहिले की उत्साह वाढतो. पण सत्संग कायम कसा मिळणार?

**साधक प :** यासाठी दुसरा मार्ग म्हणजे प्रार्थना.

**पू. बाबा :** होय. रोज सकाळी उठतांना आणि रात्री झोपतांना हा दिवस त्यांच्या कृपेने मिळाला असे वाटले पाहिजे.

**साधक ज :** राम कर्ता म्हणतांना त्याने माझ्या मनासारखे करावे असे थोडे तरी वाटतेच. त्यापेक्षा प्रारब्धाचा सिद्धान्त पटला तर सुखदु:खाची बोच कमी होईल.

**साधक प :** घटना घडतातच. त्या चांगल्या की वाईट हे मी ठरवतो. मुळात त्या चांगल्या किंवा वाईट नसतातच; पण मी कल्पना करतो. तो मी गेला की कल्पना राहिल्या तरी त्यातील माझेपण जाईल. उदाहरणार्थ, हात कापला तर दु:ख होईलच पण ते शरीराचे आहे हे जाणून आत दु:खी होणार नाही.

**साधक ग :** श्रीमहाराजांनी एका प्रवचनात म्हटलेच आहे की राम कर्ता आणि राम इच्छा मानली की घटना प्रारब्धानुसार घडतील पण त्यांचे सुखदु:ख वाटणार नाही.

**साधक ड :** आपण कृतज्ञता भावासंबंधी म्हणाला होतात. ती कृतज्ञता कशी वाढवावयाची?

**पू. बाबा :** आपल्या जीवनात जे यशापयश आले त्यातले आपले कर्तृत्व किती याचा विचार केला तर मिळालेल्या यशाला आपण पात्र नसतांना देखील ते मिळाले हे सद्‌गुरूंच्या कृपेचे फळ आहे हे लक्षात येते आणि त्यांच्याबद्दल कृतज्ञता वाटू लागते. त्यामुळे मग मी विरघळू लागतो. हा मी जसा विरघळत जातो तशी कृतज्ञता वाढू लागतो.

## |१५६| (२४ ऑगस्ट १९९०)

पू. बाबांनी Mother च्या The Great Adeventure मधील काही उतारे काढून ठेवले होते ते वाचून दाखवले आणि म्हणाले की गोंदवल्याहून मालाडला परत आल्यावर दोन दिवस आपण गोंदवल्यात आहोत असे मला वाटत होते. गोंदवल्याचे वातावरण इथे कसे राखता येईल? त्यासाठी काय करावे? By leading intense life (उत्कट अंतर्मुख जीवनातून) हे साधता येईल असे मदर म्हणतात. त्या म्हणतात की सामान्य लोकांचा संबंध सोडावा, सामान्य विचार सोडावे. आश्रमात राहून हे ठीक आहे पण श्रीमहाराजांचे म्हणणे असे आहे की प्रपंचाची कोणतीच बाजू परमार्थाच्या आड यावयाला नको. आपला प्रपंच सुद्धा अगदी नीतीचा आहे. प्रपंच देखील भगवंताने दिलेला आहे. तेव्हां प्रपंचात राहून परमार्थ खात्रीने साधता येईल.

दुसरा मुद्दा मौनाबद्दल होता. मदरचे म्हणणे प्रत्येकाने रोज निदान एक तास अगदी कमी बोलावे. यामुळे निरुपयोगी बोलणे थांबेल.

**साधक अ :** कमी बोलण्याचा अर्थ नाराजी आहे असा घरात केला जातो.

**साधक क :** दहाव्या अध्यायात विभूति सांगतांना भगवंतांनी गूढ गोष्टीत मौन मी आहे असे सांगितले आहे.

**पू. बाबा :** मौनी माणसापुढे ब्रह्मदेव देखील वेडा ठरतो असे म्हटले आहे. साधनासाठी शक्तिसंचय करायचा असेल तर बोलणे कमी केलेच पाहिजे. त्यासाठी सावधानता हवी.

तिसरा मुद्दा आपण दुसऱ्यांबद्दल जी मते बनवतो त्यासंबंधी होता. We have no right and capacity to judge others (दुसऱ्यांसंबंधी मते बनविण्याचा आपल्याला अधिकार नाही आणि पात्रता नाही) असे मदर

म्हणतात. तथापि व्यवहारात आपली दुसऱ्याबद्दल इमेज (प्रतिमा) असते हे मान्य करावे लागेल. म्हणून त्याची आपल्या साधनाला बाधा होत नाही ना एवढेच पहावे. इतरांबद्दल वाईट विचार मनात येणार नाहीत याबद्दल दक्ष असावे. जे मन भगवंताला द्यावयाचे ते इतर लोकांच्या विचारात गुंतवणे योग्य नाही. दुसऱ्यांची निंदा करू नये. श्रीमहाराज सांगत की निंदा हा बिनभांडवलाचा धंदा आहे. आपलेच मन गढूळ करून घेणे आहे.

**पू. बाबा :** आपण जाणार हे प्रत्येकाला माहीत आहे, पण त्याला अजून वेळ आहे असे प्रत्येकाला वाटते. किंवा मला कॅन्सर होऊ शकेल हे आज वाटत नाही. जगात कोणाला, कधीही, काहीही होऊ शकते हे माहीत असले तरी ते मला होणार नाही असे माणूस धरून चालतो.

**साधक प :** इथे आपल्या मूळ कल्पनांनाच धक्का पोचतो. दुःख आले तर ते नैसर्गिक आहे असे वाटावे. पण आपण आपल्या जुन्या सुखाच्या कल्पना मोडावयाला तयार नसतो.

**पू. बाबा :** ब्रदर लॉरेन्सने म्हटले आहे की काम करत असतांनाही मला ईश्वराचे तेवढेच स्मरण राहते की जेवढे प्रार्थना करताना असते. माझे मन प्रशांत (tranquil) असते. प्रशांती ही शांतीच्याही पलिकडची घनदाट शांतीची अवस्था आहे.

**साधक प :** ती आकाशासारखी असून ती सर्व गोष्टींची पार्श्वभूमी आहे. तिच्यातच सर्व गोष्टी आहेत. कोणत्याही घटनांमुळे ती विचलित होत नाही. कृष्णमूर्तींनी या अवस्थेचे सुरेख वर्णन केले आहे.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांचे एक-अष्टमांश लक्ष बाहेर आणि सात-अष्टमांश लक्ष आत होते असे वर्णन आहे.

**साधक प :** त्यांचे एक-अष्टमांश लक्ष हे आमच्या सर्व लक्षापेक्षाही जास्त होते. आपल्याला उत्कट लक्षाची कल्पना नाही. त्या जाणिवेची व्याप्ती व खोली खूप असते. मला वाटते मदरनी सांगितलेले मुद्दे आपण ध्येयाच्या संदर्भात लक्षात घेतले पाहिजेत. प्रथम ध्येय नक्की झाले पाहिजे. मग ह्या गोष्टी अनुषंगाने होतील.

**पू. बाबा :** ह्या सर्वाला उपाय म्हणजे आपण नाम घ्यावे. बाकीच्या सर्व गोष्टी श्रीमहाराजांवर सोपवाव्या.

## |१५७| (३१ ऑगस्ट १९९०)

**पू. बाबा :** आपली श्रीमहाराजांवर श्रद्धा आहे. आपण नामस्मरणही करतो, पण ते वाढत का नाही? अडथळा कोणता आहे?

**साधक ख :** आमची श्रद्धा ॲनिमिक आहे.

**पू. बाबा :** नुसती ॲनिमिक नाही. हा अति घातक ॲनिमिया आहे.

**साधक प :** श्रीमहाराजांपेक्षाही नामावर श्रद्धा बसणे जास्त अवघड आहे. मी एखाद्या व्यक्तीचा हात धरू शकतो पण नाम धरायचे म्हणजे काय ते कळत नाही.

**पू. बाबा :** नामस्मरण करतांना आत जाता आले पाहिजे.

**साधक ग :** आत जाणे म्हणजे काय तेच समजत नाही. पुष्कळदा आपण त्याचा शारीरिक पातळीवरचा अर्थ करतो. आध्यात्मिक दृष्ट्या आत जाणे म्हणजे काय ते आम्हाला - निदान मला तरी माहीत नाही.

**पू. बाबा :** देकार्तने (Descart) म्हटले आहे, तुम्ही आत पाहू लागलात की सर्व काही त्यानेच व्यापले आहे हे लक्षात येते. ह्यूम (Hume) म्हणतो की आत डोकावलात की तुम्ही शून्यापर्यंत पोचता आणि नाहीसे होता. कदाचित यामुळेच आत जाणे अवघड जात असावे.

**साधक प :** आत्मानात्मविवेक करतानाही 'मी' नाहीसा करावयाचा आहे आणि तेही 'मी'च करायचे आहे हा एक विरोधाभास आहे.

**साधक ज :** तसेच परमात्म्याशी एकरूप व्हावयाचे म्हणजे मी नाहीसे व्हावयाचे आणि ते 'मी'च करायचे हाही असाच विरोधाभास आहे.

**पू. बाबा :** साधनात येणाऱ्या impediments चा म्हणजे प्रतिबंधांचा प्रश्न क्षणभर बाजूला ठेवू या. मी दुसरा प्रश्न विचारतो की नामस्मरण करतांना जुन्या आठवणी आणि इतर विचार मनात येतात ते कसे नाहीसे करावयाचे असे पुष्कळजण विचारतात. ही पूर्वस्मृती कोठे असते? मला वाटते की ती मेंदूद्वारा व्यक्त होत असली तरी ती मेंदूत नसावी. ती कोठेतरी वायुमंडलात असावी.

**साधक प :** आधुनिक विज्ञानाला आणि वैद्यकशास्त्राला हे मान्य नाही.

**पू. बाबा :** माझी सर्वात जुनी आठवण सांगतो. मी त्यावेळी चार वर्षांचा असेन. माझ्या वडिलांनी गटारावर झाकण ठेवलेला दगड काढला तेव्हां त्याच्याखालून एक साप निघाला आणि तो माझ्या वडिलांनी मारला. ही आठवण मेंदूत खोल कोठे असणार?

**साधक ग** : शास्त्रज्ञांच्या मते आपल्या मेंदूची शक्ती अफाट आहे. आजचा सर्वसाधारण माणूस त्या शक्तीचा फारच थोडा भाग उपयोगात आणतो. जप करतांना येणाऱ्या विचारातही मला वाटते, भविष्यकाळाच्या विचारापेक्षा भूतकाळाच्या आठवणी जास्त असतात.

**साधक ज** : तथापि आपण नजीकच्या भविष्याचा जास्त विचार करतो.

**साधक प** : आपले दैनंदिन जीवन अगदी साध्या व रुक्ष अशा अनेक त्याच त्या घटनांचे (रूटीन) असून त्यातच गढून जाण्याची आपल्याला सवय आहे. त्यामुळे नामस्मरणापेक्षा तेच बरे वाटते.

**साधक क** : माझे जग मीच माझ्या कल्पनांनी तयार केले आहे आणि त्यामुळे ते विसरणे किंवा नाहीसे करणे माझ्याच हातात आहे.

**साधक प** : मी जुन्या आठवणींचाच बनलेला आहे. आठवणींचा संदर्भ नाहीसा करणे म्हणजे मीच नाहीसा करण्यासारखे आहे.

**साधक ग** : माझ्या आठवणी हा माझ्या व्यक्तिमत्त्वाचा भाग आहे.

**पू. बाबा** : कृष्णमूर्ती जेव्हां burden of the past (भूतकाळाचे ओझे) म्हणतात तेव्हां माणसे ओळखणे, नांवे लक्षात ठेवणे यांसारख्या पूर्वस्मृती नाहीशा करायला ते सांगत नाहीत तर त्यातून जे भावविश्व मी रचलेले असते ते नाहीसे करायला सांगतात.

**साधक ग** : भूतकाळ राहायला हरकत नाही; तो मानगुटीवर बसता कामा नये.

**पू. बाबा** : ते काहीही असो, आपल्याला नाम धरून ठेवता आले पाहिजे.

**साधक क** : त्यासाठीच सत्संग पाहिजे. खरोखर तुलसीदासांइतका सत्संगाचा महिमा कोणी वर्णन केला नसेल. ते म्हणतात की एका सत्संगात सर्व पुण्ये येतात.

बिनु सतसंग विवेक न होई। रामकृपा बिनु सुलभ न सोई॥
सतसंगत मुद मंगल मूला। सोइ फलसिधि सब साधन फूला॥
तसेच
बिधि हरिहर कवि कोबिदबानी। कहत साधुमहिमा सकुचानी॥

**पू. बाबा** : सत्संगती पाहिजेच पण आपणही याच्यामागेच लागले पाहिजे.

**साधक क** : होय, साधन करतांनाही जिद्द पाहिजेच. पण ती टिकत नाही म्हणून पुन:पुन्हा संतांना भेटले पाहिजे. त्यांचे साधन पाहून आपला उत्साह वाढतो.

|१५८| (७ सप्टेंबर १९९०)

काही दिवसांसाठी आपल्या नवऱ्यासह अमेरिकेत गेलेल्या एका बाईंचे पू. बाबांना पत्र आले होते. त्यांनी त्यांना तेथे वाटणाऱ्या एकाकीपणाचे वर्णन केले आहे. ते वाचून दाखवून पू. बाबा म्हणाले, भीती आणि एकाकीपणा यांबद्दल जे. कृष्णमूर्तींनी बरेच सांगितले आहे. Exploration into Insight या पुस्तकात त्यांनी एकाकीपणाच्या चार अवस्था सांगितल्या आहेत 1) Sense of loneliness - एकटेपणाची भावना 2) Sense of abandonment - टाकून दिल्याची भावना 3) Sense of isolation - वेगळे पडल्याची भावना आणि 4) Sense of helplessness - असहायतेची भावना.

पू. बाबा म्हणाले, कृष्णमूर्तींच्या सांगण्यात आणि श्रीमहाराजांच्या सांगण्यात पुष्कळ सारखेपणा वाटतो. श्रीमहाराज म्हणाले की माणूस असहाय होतो. Sense of loneliness - एकटेपणा किंवा एकाकी वाटणे येथून सुरुवात होते. नुकतेच एक विद्वान गृहस्थ भेटायला आले होते. त्यांनी त्यांची पत्नी वारल्यानंतर त्यांना कसे एकाकी वाटू लागले ते सांगितले. त्यांनी Self-pity असा शब्दप्रयोग केला. आपल्या स्थितीची आपल्यालाच कीव वाटू लागते! याच्या पुढची पायरी म्हणजे सगळे आपल्याला सोडून देत आहेत, दुर्लक्ष करीत आहेत, टाळत आहेत असे वाटू लागणे म्हणजेच Sense of abandonment. बरोबरीचे सगळे गेले, आपण एकटेच उरलो असे वाटू लागणे हा Sense of isolation आणि मग येते ती असहायता - Sense of helplessness.

हे सांगून पू. बाबांनी विचारले की माणसाला असे का वाटते? एकटेपणाची भीती का वाटते? ती भीती माणूस कशी घालवतो?

**साधक प :** माणूस दृश्यात राहतो, दृश्याच्या आधाराने जगतो. साहजिकच दृश्य जगाबद्दल त्याच्या काही कल्पना असतात. प्रत्यक्ष परिस्थिती त्यापेक्षा वेगळी झाली की भीती वाटते. काही वेळा तिचे तात्पुरते निरसनही होते. उदाहरणार्थ, घरात कोणी आजारी पडले की भीती वाटते. पण डॉक्टरनी निदान करून औषधोपचार सुरू केले की काही प्रमाणात तरी भीती कमी होते.

**पू. बाबा :** समजा, एखाद्या चांगल्या ज्योतिषाने पुढच्या दहा वर्षांत तुमच्या जीवनात काय काय चांगले आणि वाईट घडणार आहे ते सांगितले तर भीती जाईल का? कारण माणसाला अज्ञाताची भीती वाटते.

**साधक ग** : आपल्या रोजच्या जीवनात येणाऱ्या लहानसहान संकटांना आपण तोंड देतो कारण त्यानंतर कदाचित त्यापेक्षाही मोठे संकट येणार आहे हे आपल्याला माहीत नसते. समोरच्या संकटातून पार पडलो की सुखी होऊ असे वाटत असते. माणूस दु:खात असतांना सुखाच्या आशेवर जगत असतो. पण भविष्य कळले तर पुढच्या दहा वर्षांतील संकटांचा एकत्रित विचार मनात येऊन कदाचित त्या दडपणाखाली माणूस गुदमरून जाईल.

**पू. बाबा** : होय, हे शक्य आहे.

आपल्याला दृश्याचा आधार किती वाटतो आणि आपली श्रद्धा किती डळमळीत असते यासंबंधी पू. बाबांनी एक जुनी घटना सांगितली.

श्रीमहाराजांच्या निकटवर्ती एका बाईच्या तान्ह्या मुलीला एकदा फीट आली. त्यांचे वडील म्हणाले की तिला बरे वाटेल. तथापि श्रीमहाराजांना विचारा म्हणून त्यांनी हट्ट धरला. श्रीमहाराजांना विचारल्यावर प्रथम ते म्हणाले, असं एवढ्या तेवढ्याला कशाला घाबरायचं? या शब्दांतून योग्य तो अर्थ न घेता त्यांनी विचारले, पण बरं वाटेल ना? तेव्हां श्रीमहाराज होय म्हणाले आणि त्यांनी सुचविले की मुलीला पू. तात्यासाहेबांच्या मांडीवर द्या. यावर त्या म्हणाल्या, नको; काय व्हायचं ते माझ्या मांडीवर होऊ द्या! म्हणजे श्रीमहाराजांनी इतके सांगूनही संशय राहिलाच. आपल्याला दृश्याचा आधार खरा वाटतो आणि संत तर नामाचा आधार धरायला सांगतात. स्वामी रामदासांनी म्हटले आहे की He had the protection of the Divine Name, all the time.

**साधक क** : आम्हाला नामाच्या शक्तीची कल्पनाच नाही; त्यामुळे त्याचा आधार वाटत नाही.

**साधक प** : त्या शक्तीची कल्पना आली तर माणूस एकदम निर्भय होईल.

**साधक ग** : भीती ह्या भावनेला जीवनात महत्वाचे स्थान आहे. माणसाला, नव्हे सर्व प्राणिमात्रांना जगण्यासाठी भीती ही आवश्यक प्रेरणा आहे. उदाहरणार्थ, मला सापाची किंवा वाघाची भीती वाटली नाही तर मी त्यांच्या समोरून पळून जाणार नाही आणि माझा मृत्यू ओढवेल.

**पू. बाबा** : शरीर रक्षणासाठी हे ठीक आहे; पण मानसिक भीती का वाटावी? वाघ येईल ह्या कल्पनेने का घाबरावे? भीती आपल्या रक्तातच असते का?

**साधक ख** : भीती आपल्या मज्जासंस्थेवर (Nervous system) आणि शरीरावर परिणाम करते. भीती वाटली की ॲड्रिनिलीन ग्रंथीतून स्राव सुरू होतात आणि माणूस भीतीच्या कारणापासून पळून तरी जातो किंवा त्यावर हल्ला करतो. त्याचबरोबर भीतीचे कारण नाहीसे करायला कोणाची मदत होते का तेही पहातो. कारण तो समाजात राहतो.

**पू. बाबा** : उपनिषदात द्वितीयात् भयम् म्हटले आहे. म्हणजे जोपर्यंत मी वेगळा व बाकीचे जग वेगळे आहे तोपर्यंत जगापासून भीती राहणारच.

**साधक ग** : भक्त जगाकडे वेगळ्या दृष्टीने पाहतो. तो राम कर्ता या भावाने जगतो. त्यामुळे जे जे घडते ते ते त्याच्या इच्छेने घडते म्हणून भीती वाटली तरी तो त्याचाच आधार घेतो. तुलसीदासांनी म्हटलेच आहे की जब जानकिनाथ सहाय करे तब कोन बिगाड करे नर तेरो। ग्रहदेखील मग तुमचे सहाय्यकारी होतात आणि राहूकेतूही काही वाकडे करू शकत नाहीत.

**साधक क** : हे बरोबर आहे. शिवाय तो जे करतो ते कदाचित मला आवडणार नाही; पण तो नेहमी माझ्या हिताचेच करतो अशी भक्ताची दृढ श्रद्धा असते. श्री. भाऊसाहेब म्हणत असत की श्रीमहाराज अकल्याणाचे कसे करतील!

**साधक प** : सहाय्य मागायचे म्हणजे शरणागतीच आहे; ती टिकत नाही. सामान्यत: आपण मोठ्या गोष्टीत भगवंताला, बाबा, आता तूच काय ते कर म्हणून शरण जातो. पण रोजच्या जीवनातल्या साध्या गोष्टी मी करतो हा भाव नाहीसा होत नाही. त्यामुळे पूर्ण शरणागति (Total surrender) आपल्याला माहीतच नाही.

या संदर्भात पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. श्री. भाऊसाहेबांच्या पत्नी आजारी असतांना श्रीमहाराजांनी भाऊसाहेब, कठीण दिसते आहे, मी काय करू म्हणून विचारल्यावर महाराज काहीही करू शकतात हे माहीत असूनही ते म्हणाले, तिच्या कल्याणाचे असेल ते करा. ही आदर्श शरणागति. त्यांनी मी पूर्णपणे पुसून टाकला.

**साधक प** : त्यांनी स्वत:चा विचार न करता त्या जीवाच्या कल्याणाचे असेल ते करा असे सांगितले. ही शरणागतीची आणि दुसऱ्याच्या कल्याणासंबंधीची पराकोटी आहे.

**साधक ग** : स्वत:च्या कल्याणाचा विचार त्यांच्या मनातून केव्हांच नाहीसा झाला होता. श्रीमहाराज भेटले, आपले काम झाले असा त्यांचा भाव

होता. श्रीमहाराजांच्या थोरपणाची त्यांना खरी कल्पना आली. श्रीमहाराजांनी मागितल्यावर आपला संसार त्यांच्या हवाली करून ते मोकळे झाले आणि हे कसे केलेत म्हणून विचारल्यावर येवढा मोठा माणूस जबाबदारी घेतो म्हणाला म्हणून दिला इतके सहज साधे उत्तर त्यांनी दिले.

**पू. बाबा** : फार थोड्या लोकांना श्रीमहाराजांचा मोठेपणा समजला. आणि ते देहापलीकडे आहेत हे तर फार थोड्यांनी जाणले. प्रयागला संगमाकडे जाताना नाव बुडू लागल्यावर नाम आपले रक्षण करील असे न वाटता सगळे श्रीमहाराजांना मिठी मारायला धावले. आपल्याला दृश्याचा आधार वाटतो हेच खरे. श्री. वामनराव आपटे म्हणत की श्रीमहाराजांचे वागणेच असे होते की काही वेळा ते फार मोठे आहेत असे वाटूनही माणूस ते परत विसरून जायचा.

आपल्याला दृश्य सोडायचे नाही आणि ते सुटतही नाही. तथापि दृश्याचे प्रेम गेले पाहिजे. त्याचे आज जे खरेपण वाटते ते नाहीसे झाले पाहिजे. आपण प्रपंच आणि परमार्थ अशी विभागणी करतो आणि त्यामुळे घोटाळा होतो. प्रपंचात भगवंताचे अनुसंधान ठेवून परमार्थ साधता येतो.

**साधक क** : शिवमहिम्नातील 'असित गिरिसमं स्यात्' या श्लोकातील वर्णन ऐकतांनाच श्रीरामकृष्णांची भावसमाधी लागली.

**पू. बाबा** : संसारातील रस नाहीसा झाल्याखेरीज नामात रस येणार नाही. आपले (म्हणजे आमचे) साधन चालते याला का साधन म्हणायचे! फार तर मॉंटेसरीत आहोत म्हणता येईल.

**साधक ग** : तरीदेखील प्रगती मोजायचीच झाली तर आता शाळेत न रडता जातो येवढे तरी म्हणता येईल ना!

**पू. बाबा** : म्हणा, पण हे काही खरे नव्हे!

## |१५९| (१४ सप्टेंबर १९९०)

सध्या रविवारी ज्ञानेश्वरीच्या १८व्या अध्यायातील गीतेच्या ५९ व ६० या श्लोकांवरील निरूपण चालू आहे. तोच विषय पू. बाबांनी चर्चेसाठी घेतला. ते म्हणाले, यदहंकारमाश्रित्य या ५९व्या श्लोकात म्हटले आहे की प्रकृती - जन्मोजन्मींचे तुझे वासनाजन्य संस्कार - तुझे नियमन करीत आहे. मी लढणार नाही असे मोठ्या अहंकाराने तू किती जरी म्हणालास तरी शेवटी तुझा स्वभाव तुला लढावयास भाग पाडेल. पुढच्या श्लोकावरील भाष्यात तर ज्ञानेश्वर महाराजांच्या श्रीकृष्णाने अर्जुनाला विराट गोग्रहण प्रसंगी बृहन्नडेच्या वेशात

असूनही तू कसा लढलास असे त्याला विचारले आहे. ६० व्या श्लोकात म्हटले आहे की तू तुझ्याबरोबरच जन्मलेल्या कर्माने सर्व बाजूंनी बांधला गेलेला आहेस आणि मोहाने-अज्ञानाने हे कर्म मी करणार नाही असे म्हणत असलास तरी तुला लाचारपणे (अवशोऽपि) ते करणे भाग पडेल. यावर टीका करतांना ज्ञानराजांनी म्हटले आहे की प्रवाह पूर्वेकडे वाहात असतांना एखादा जर मी पश्चिमेला पोहत जाईन म्हणाला तर त्याचा तो आग्रहच तेवढा राहतो. प्रत्यक्षात तो पूर्वेकडे खेचला जातो. किंवा साळीचा दाणा जर पेरल्यावर आम्ही साळी म्हणून उगवणार नाही म्हणाला तर ते शक्य आहे का?

हे सांगून पू. बाबांनी विचारले की याचा अर्थ माणसाला काही स्वातंत्र्य नाहीच का? तसे असेल तर परमार्थाचा प्रयत्न व्यर्थच ठरेल. माणूस कोणत्या बाबतीत परतंत्र आहे आणि कोणत्या बाबतीत स्वतंत्र आहे? पण त्यापूर्वी मी आणखी एक प्रश्न विचारतो. आपल्याला देव पाहिजे असे वाटते का? दु:ख नको असेही मोठ्या तीव्रतेने वाटते का?

**साधक ग :** प्रकृतीच्या क्षेत्रात आपण परतंत्र आहोत. जोपर्यंत अहंकार आणि मोह म्हणजे अज्ञान आहे तोपर्यंत कर्माच्या कचाट्यातून सुटणे शक्य नाही; आणि त्या अर्थाने माणसाला स्वातंत्र्य नाही.

**साधक प :** आपल्याला दु:ख नको असे निश्चित वाटते. त्याचप्रमाणे आपली देवासंबंधी काहीही कल्पना असो, देव भेटावा असा आत कोठेतरी भाव आहे.

**पू. बाबा :** पण सर्व काही नियतीनेच ठरवलेले असेल तर स्वातंत्र्य कोठे आले?

**साधक प :** कर्माचे स्वातंत्र्य नसेल. ते तुमच्या प्रारब्धानुसार घडणारच. पण त्यात गुंतून राहायचे की राम कर्ता हा भाव वाढवून त्यातून बाहेर पडायचे हे ठरवायचे स्वातंत्र्य माणसाला आहे. राम इच्छा किंवा राम कर्ता हा भाव वाढवला तर कर्म तेच राहील पण ते बंधनकारक होणार नाही.

**पू. बाबा :** देव हवा असे वाटणे देखील अनेक गोष्टींवर अवलंबून राहील. तुमचा जन्म, भोवतालची परिस्थिती, इत्यादींवर ते अवलंबून राहील.

**साधक क :** तुम्हाला केव्हां, कोठे, कोणत्या परिस्थितीत जन्म यावयाचा हे तुमच्या संचितावर - वासनांवर अवलंबून आहे. आणि कर्मासंबंधी म्हणाल तर केवळ व्यक्त कर्माचा विचार करून चालणार नाही. अव्यक्तातून व्यक्त कर्म येते. ते नको असेल तर अव्यक्तातच बदल केला पाहिजे. म्हणजे वासनाच

नाहीशा झाल्या पाहिजेत. जीवनात कर्म राहणारच. पण ते करतांना नवीन बंधने निर्माण होऊ न देण्याचे माणसाला स्वातंत्र्य आहे.

**साधक प** : बीज भाजले की ते पेरले तरी उगवणार नाही.

**साधक क** : कर्म करतांना हे करू की ते करू, करू की करू नको असा संदेह कित्येकदा निर्माण होतो. अशा वेळी रामाची इच्छा काय आहे ते कसे ओळखायचे ?

**साधक प** : असा संभ्रम निर्माण होतो तेव्हां काहीच करू नये. ते रामावर सोपवावे.

**साधक ज** : काहीच करू नये हा देखील निर्णयच होतो आणि अशा काही न करण्याने पश्चात्ताप होण्याची शक्यता असते. बरोबर असो की चूक, आपण काही तरी करायला पाहिजे होते असे वाटत राहते.

**साधक ग** : काहीही न करणे म्हणजे श्रीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे ओल्या धोतराप्रमाणे पडून राहणे आहे. ते फार कठीण आहे. इतकी शरणागती आली तर काय पाहिजे!

**साधक क** : काय करू अशी समस्या उभी राहते तेव्हां कोणीतरी सत्पुरुषाने हे कर किंवा करू नको म्हणून सांगावे.

**साधक प** : वास्तविक आपल्यापुढे जेव्हां मोठ्या समस्या असतात तेव्हां आपल्याला 'त्यांची' इच्छा कळते कारण अशा वेळी आपण कळवळून प्रार्थना करतो. पण अशा वेळी निर्माण झालेले ते कम्युनिकेशन आपण लहान सहान बाबतीत टिकवून धरत नाही. तेथे मी कर्ता असे वाटते आणि ते कम्युनिकेशन तुटते. सर्व बाबतीत त्याची इच्छा जाणून घेण्याचा प्रयत्न केला तर ते टिकेल.

**साधक ग** : याचा अर्थ तिकडून संदेश (signals) चालूच असतात. आपण आपले यंत्र म्हणजे मन बरोबर ट्यून केले पाहिजे.

**साधक क** : गीतेच्या पुढच्या ६१ व्या श्लोकात म्हटले आहे की सर्वांच्या हृदयात ईश्वर स्थित असून तो एखाद्या यंत्राप्रमाणे माणसाला नाचवतो. असे जर आहे तर यंत्राला यंत्री ते कसे चालवतो हे जाणून घ्यायची कधी तरी इच्छा असते का? तशी आपण तरी इच्छा का करावी?

**साधक प** : सर्वसामान्य यंत्रांना ती इच्छा नसेल पण चंद्रावर जाणाऱ्या यंत्रमानवासारख्या कॉम्प्युटरवर आधारलेल्या नव्या यंत्रांच्या बाबतीत हे पूर्णपणे लागू पडत नाही; पण ते असो. श्रीकृष्णाला अर्जुनाने नंतर काय उत्तर दिले ते सांगा. ते जास्त महत्त्वाचे आहे.

**पू. बाबा** : त्याने शेवटी करिष्ये वचनं तव म्हटले आहे. सुरुवातीला तो न योत्स्य - मी लढणार नाही असे म्हणाला पण शेवटी म्हणाला की तू सांगशील तसे करतो.

**साधक प** : मग हेच खरे उत्तर आहे. मी ठरवून काही होत नाही. तू करशील, सांगशील तसेच घडेल असे वाटू लागले - नव्हे खात्री झाली की खरी शरणागती येईल आणि मग खरे साधन घडेल.

**पू. बाबा** : हेच खरे आहे. कोणतेही कर्म - अगदी साधन देखील 'मी करतो' असे जोपर्यंत वाटते तोपर्यंत भगवंत दूरच राहील.

**।१६०।** (२१ सप्टेंबर १९९०)

नुकतेच एक साधक काही दिवस अमेरिकेत जाऊन आले. पू. बाबांनी त्यांच्या तेथील वास्तव्यासंबंधी चौकशी केली. ते म्हणाले की तिकडची भौतिक सुबत्ता, शास्त्र व तंत्रज्ञानातील प्रगती आणि दैनंदिन जीवनातील शिस्त खरोखर वाखाणणी करण्यासारखी आहे. तेथील कुटुंबसंस्था मोठी विचित्र आहे. मुले लहान असताना त्यांची ते लोक घेत असलेली काळजी आणि वयात आल्यावर भौतिक समृद्धीमुळे त्या मुलांत येणारी व्यसनाधीनता आणि स्वच्छंदी वागणे यांचा मेळ घालता येत नाही. त्या देशातले एकंदर वातावरण परमार्थाला पोषक नाही.

पू. बाबा म्हणाले, भौतिक समृद्धी आली तरी माणूस समाधानी होत नाही. खा, पी, मजा कर असे त्याचे जीवन बनते आणि मग त्याच्या मनात परमार्थाचा विचारच येत नाही. त्यातूनच समृद्धीतील वैफल्य आणि व्यसनाधीनता निर्माण होतात. म्हणूनच समर्थांनी ''संसारसंगें दुखवला। त्रिविध तापें पोळला। तोचि एक अधिकारी झाला। परमार्थासी।।' असे म्हटले आहे.

पू. बाबा पुढे म्हणाले, खरे म्हणजे आपले साधन बाह्य परिस्थितीवर अवलंबून राहता कामा नये. कै. कविभूषण खापर्डे थिऑसफिस्ट होते. ते पॉंडेचरीला योगी अरविंदांकडे गेले की अरविंद त्यांना एरवी कोणाला न सांगितलेले आध्यात्मिक अनुभव सांगत असत; ते म्हणत की हे तुम्हाला सांगावे असे मला का वाटते ते समजत नाही. तेव्हां कविभूषण म्हणाले होते की वातावरणात माणसांची विचारचित्रे असतात. मी ती पाहिली आहेत. ती

अनुकूल असली तर माणूस नकळत मोकळा होतो. अमेरिकेत केवळ भौतिक सुखांचा विचार करणाऱ्या माणसांची विचारचित्रे तशीच असतात त्यामुळे पारमार्थिक विचार करणाराला ती प्रतिकूल असतात आणि त्यामुळे साधन नीट होत नाही.

नंतर पू. बाबांनी प्रश्न केला की आपले साधन मनासारखे का होत नाही? भीती व काळजीचे येवढे दडपण का येते? जे. कृष्णमूर्तींनी याबद्दल पुष्कळ लिहिले आहे.

**साधक ग** : जीवनातील अनिश्चिततेमुळे भीती वाटते.

**साधक प** : त्याबरोबरच आपल्या कर्तृत्वावर आपला पूर्ण विश्वास नसतो. त्यामुळे मनासारखे होईल की नाही याची काळजी वाटत राहते. काळजी कर म्हणून कोणी सांगावे लागत नाही.

चर्चेचा एकूण सूर असा होता की जोपर्यंत देहबुद्धी आहे तोपर्यंत भीती आणि काळजी राहणारच; आणि त्यामुळे साधनात चांगली प्रगती होणार नाही. देहबुद्धी नाहीशी होण्यासाठी, शिस्त म्हणून का होईना साधन करीत राहणे हाच उपाय आहे.

**साधक ब** : आमची देहबुद्धी आम्ही नाहीशी करू शकत नाही. ती नाहीशी करणे सद्गुरूंच्याच हातात आहे. ते दयासिंधू आहेत. तेव्हां त्यांची प्रार्थना करण्याखेरीज गत्यंतर नाही.

**साधक प** : आपले पैशाचे प्रेम आणि पैशांमुळे वाटणारी सुरक्षितता जितकी खरी वाटते तितके नाम खरे वाटायला पाहिजे.

**पू. बाबा** : कृष्णमूर्ती म्हणत की आजचे अनेक मठ आणि मंदिरे निःसत्त्व झाली आहेत. तेथे नुसती राख राहिली आहे. ज्योती केव्हांच विझून गेल्या आहेत. याच संदर्भात श्रीमहाराज एकदा म्हणाले होते की पंढरपूरचा विठोबा, नाशिकचा राम, कोल्हापूरची अंबाबाई आणि रामेश्वर ही जागृत देवस्थाने आहेत. गोंदवल्याच्या रामाचा त्यांनी साहजिकच उल्लेख केला नव्हता!

**साधक प** : आपले सगळे जीवन दृश्यात आहे. त्यामुळे आपले सर्व विचार वासना इत्यादी दृश्याला धरून आहेत. त्यांचा विसर पडला पाहिजे. दृश्यापेक्षाही विद्येचा अभिमान जास्त सूक्ष्म आहे. ती देखील उपयोगाची नाही म्हणून टाकून देण्याचे धाडस ब्रह्मानंद महाराजांनी दाखवले; इतकेच नव्हे तर या विद्येने माझा घात केला आहे असे ते म्हणाले.

**साधक क** : पुढे एकदा त्यांना शास्त्रार्थासंबंधी काही प्रश्न विचारला होता तेव्हां ते म्हणालें की माझी जीभ नामाला विकली आहे. मी ते सर्व सोडले आहे आणि तुम्हीही त्याच्यामागे लागू नका.

**पू. बाबा** : हे तरी जमले पाहिजे नाहीतर श्री. भाऊसाहेबांसारखा अकृत्रिम सहजपणा पाहिजे. श्रीमहाराज भेटल्यावर त्यांना आपले साधन झाले असे वाटले. त्यानंतर त्यांचे नामस्मरण केवळ श्रीमहाराजांना आवडते म्हणून चालू होते.

विद्या विसरण्याच्या संदर्भात पू. बाबांनी तुकाराम महाराजांच्या "जाणोनि नेणतें करी माझें मन। तुझी प्रेमखूण देऊनिया॥" या अभंगाचा उल्लेख केला. भगवंताची प्रेमखूण मिळेपर्यंत साधनात शीण आहे. ती मिळाली की चालला! मग तो संसारात असून नसल्यासारखा राहील.

**साधक ग** : व्यवहारात बरोबर वागावे लागेलच पण त्यात गुंतून चालणार नाही. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे श्रीकृष्णाचे चरित्र आहे.

**साधक म** : श्रीमहाराजांचे जीवनही अगदी तसेच होते.

**पू. बाबा** : ऑटो रुडॉल्फ म्हणून एक पाद्री होता. तो भाषापंडित होता. पुण्याच्या आनंदाश्रमात त्याने संस्कृतमधे भाषण केले होते. त्याचे The original Geeta नांवाचे एक पुस्तक आहे. त्यात तो म्हणतो की ज्याला गीतेचा ११ वा अध्याय समजला त्यालाच गीता समजली आणि माणसाच्या कर्तृत्वाचा खरा अर्थही समजला.

पू. बाबा पुढे म्हणाले, तुकाराम महाराजांनी म्हटले आहे तशी उन्मनी योग्यासारखी, निंदास्तुतीचा मनावर काहीही परिणाम होत नाही अशी स्थिती, देहबुद्धी सुटल्याखेरीज होणार नाही. सगळे साधन चित्तशुद्धीसाठी म्हणजे देहबुद्धी जाण्यासाठीच करावे लागते. बुद्धी शुद्ध झाली की देहाचा विसर पडतो. म्हणूनच तुकाराम महाराजांनी "देवा आतां ऐसा करी उपकार। देहाचा विसर पाडी मज॥" अशी देवाची प्रार्थना केली आहे. ते म्हणतात, "मागणें तें एक हेंचि आहे आतां। नाम मुखीं संतसंग देई॥" मुखीं नाम आणि संतसंग या दोन गोष्टींवर त्यांनी भर दिला आहे. संतसंग मिळायला भाग्य लागते, पण त्यासाठी नाम मुखीं ठेवायचा तरी प्रयत्न नको का? साधनाच्या बाबतीत हयगय काय कामाची?

**साधक क** : श्रीरामकृष्ण देखील एरवी मऊ वाटत पण साधनाच्या बाबतीत ते कडक होते.

**पू. बाबा :** काही वेळा आपले साधन चांगले होते पण आपण लगेच खाली येतो. वरची पातळी टिकवता आली पाहिजे. साधन चांगले व्हावे, देव भेटावा यासाठी तुकाराम महाराजांचा जीव झुरणीला लागला होता; तसे झाले पाहिजे. मी आता का जगतो हा प्रश्न नेहमी स्वत:ला विचारावा म्हणजे नको त्या व्यापात आपण कसे गुंतलो आहोत ते लक्षात येऊन साधनाकडे लक्ष वाढेल. खरोखर, जीवन ही समस्या झाल्याखेरीज साधन होणार नाही.

## ।१६१। (२८ सप्टेंबर १९९०)

**पू. बाबा :** नेमाचा वेळ सोडून इतर वेळी नामस्मरण करतांना कंटाळा का येतो? खरे म्हणजे आता तरी नामाखेरीज इतर गोष्टींचा कंटाळा आला पाहिजे. जोपर्यंत आपण कशात तरी गुंतलेले असतो तोपर्यंत कंटाळा ही समस्या होत नाही. आज कंटाळा नाहीसा करण्याचे आपले सर्व उपाय उपाधींवर अवलंबून आहेत. उद्योगात मन गुंतलेले नसेल तेव्हां ते काय करते? देह उद्योगात गुंतलेला असतांना सत्पुरुषांचे मन कोठे गुंतलेले असते याचा आपण अंदाज करू शकतो पण नुसते बसलेले असतांना त्यांचे मन कोठे असते? अशा वेळी ते निर्विचार समाधी अवस्थेत असतात.

**साधक ड :** स्वामी रामदासांनी त्यांच्या मनाची ही अवस्था In the vision of God मधे चांगली सांगितली आहे.

**पू. बाबा :** रविवारच्या निरूपणात आपला ईश्वर: सर्वभूतानां हा १८.६१ श्लोक चालू आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात - तेथ जया जें कर्मसूत्र। मांडून ठेविलें स्वतंत्र। तें तियें गती पात्र। होंचि लागे॥ १८.१३०९॥ मूळ श्लोकात नसलेले 'स्वतंत्र' हे पद ज्ञानेश्वर महाराजांनी योजिलेले आहे ते कां? सर्व जग योजनाबद्ध आहे तर स्वातंत्र्य कोठले? Emergent evolution हा जो उत्क्रांतिवाद आहे त्यात याचे उत्तर सापडेल. आपण कर्मसूत्राने बांधलेले असलो तरी नवी रचना करण्याचे स्वातंत्र्य असू शकेल. नाहीतर सर्व एकासारखे एक रटाळच निर्माण व्हावयास पाहिजे. तसे ते नसते. श्रीमहाराज म्हणत, नवनिर्मितीचा चमत्कार पहायला दूर जायला नको. ह्या एक वीतभर चेहेऱ्यात किती नाविन्य! एकासारखा एक दुसरा माणूस सापडायचा नाही.

नवनिर्मिती, नवरचना हेच जर स्वातंत्र्य असेल तर साधनाला त्याचा उपयोग कसा करून घेता येईल? आपल्या नेहमीच्या जीवनात आपल्या अनुभवाची अशी एखादी गोष्ट आहे का, की जी नेहमी नवीन, ताजी असते?

केव्हांही, कोठेही, कधीही हवीशी वाटणारी नवीन गोष्ट आवडीची, प्रेमाचीच असली पाहिजे. स्त्री पुरुष जेव्हां प्रेमात पडतात तेव्हां त्यांची मने एका पातळीवर एकमेकात मिसळतात. त्यात कंटाळा नाही. गवयाने तोच तो राग कितीदा म्हटला तरी नवीन असतो.

अमृतानुभवात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात 'पढियंतें सदां तेंचि। परी भोगी नवी नवी रुचि। म्हणोनि हा उचितुचि। अनुवाद सिद्ध॥१०.१३॥ जो स्वत:सिद्ध, स्वसंवित् आत्मा आहे त्याबद्दल हा ग्रंथ का लिहिला या शंकेचे निरसन म्हणून ही ओवी आहे. आवडीची वस्तु पुन:पुन्हा भोगली तरी त्यात नवी नवी गोडी येते म्हणून हा उद्योग. नामाच्या बाबतीत हे कसे होईल? प्रेम ओढून ताणून आणता येत नाही. नामाकडून, श्रीमहाराजांकडून आपल्याकडे प्रेमाचा ओघ आहेच म्हणून आपल्याकडून आपण त्या ओघाला कोणतीही आडकाठी आणली नाही तर आपले काम होईल.

**साधक ड** : नामाची वेळ सोडून बाकीचे जे व्यापार करावे लागतात ते कमी कसे करावे? त्यांचे मनावरचे दडपण कसे काढावे?

**पू. बाबा** : 'रामाची इच्छा' हा मंत्र जमला तर हे सर्व सोपे होईल. 'राम कर्ता' म्हणजे मी कर्ता नाही याचा अभ्यास करून अनुभव घ्यायला हवा. 'मी' करतो म्हणून करावयाच्या गोष्टी 'त्याने' करीपर्यंत टाळावयाच्या. काय होते पाहू तरी असा प्रयोग करून अनुभव नको का घ्यायला? बरे आठवले! गोंदवल्यास एकदा सैपाकघरात काम करणाऱ्या बायकांमधे काही कुरबूर झाली आणि सैपाकास उशीर झाला. सर्व लोक जेवायचे खोळंबले. श्रीमहाराजांना हे आवडले नाही. ते पंचांना म्हणाले की येथे कोणीही असे समजू नये की त्याच्यावाचून काम अडेल. वेळ आली तर लाकडे जाऊन चुलीत पडतील आणि वाटेचा वाटसरू येऊन सैपाक करेल. आपला अहंकार बाजूला ठेवला की कळेल की सर्व गोष्टी आपोआप होत जातात. याचा अनुभव येईपर्यंत वाट बघायचे धाडस आणि धीर मात्र पाहिजे.

## ।१६२। (५ ऑक्टोबर १९९०)

**पू. बाबा** : दोन-तीन दिवसांपूर्वी पुण्याचे एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांच्या वडिलांना आणि डॉ. कूर्तकोटींना श्रीमहाराजांनी एकाच दिवशी अनुग्रह दिला होता. पुढे एकदा ते डॉ. कूर्तकोटींना म्हणाले की श्रीमहाराजांनी आपल्याला एकाच वेळी अनुग्रह दिला पण तुम्ही कुठे आणि मी कुठे! तेव्हां

डॉ. कूर्तकोटी म्हणाले, ते काही असो; पण अनुग्रह एकच ना! डॉ. कूर्तकोटींजवळ असे बोलले तरी ते चांगले साधक होते. नामस्मरणात तल्लीन असत. नामामृताची चव चाखली आहे असे म्हणत. ८० व्या वर्षी ते आजारी पडले आणि त्यांची शुद्ध गेली. दुसऱ्या दिवशी शुद्धीवर आले तेव्हां मुलाला (पू. बाबांना भेटायला आलेल्या गृहस्थांना) म्हणाले, बाजूला आहे ती श्रीमहाराजांची तसबीर माझ्यासमोर दिसेल अशी ठेव. तशी ती ठेवल्यावर हात जोडून श्रीमहाराजांना म्हणाले, आपण दोन गोष्टी सांगितल्या होत्या. १) ज्याने तुमच्या हातात हात दिला त्याला तुम्ही श्रीरामाजवळ नेलेत २) तुम्हाला दुसऱ्याचा अंतकाळ साधता येतो. यांपैकी पहिलीबद्दल मला काही माहीत नाही; पण आता अंतकाळ जवळ आला आहे. तेव्हां बेशुद्धीत मृत्यू येऊ नये. नामस्मरण करतांना तो येऊ दे. त्यानंतर काही दिवस ते होते. एक दिवस त्यांनी घरातल्या मंडळींना सांगितले, माझ्या हातात माळ द्या. आता मी जाणार. माझ्या उशाशीच श्रीमहाराज आहेत. आणि मग जप चालू असतांना एखादा भाता जसा थांबावा तसा हळूहळू त्यांचा श्वासोच्छ्वास थांबला.

मला भेटलेले हे गृहस्थ आता ८३ वर्षांचे आहेत. पोट जड असते तेव्हां नामस्मरण चांगले होत नाही हे लक्षात आल्यावर गेली १५ वर्षे त्यांनी जेवण सोडले होते. रोज २ ते ३ पावशेर दूध व केळी किंवा त्या त्या ऋतूत मिळणारी फळे खातात. गृहस्थ शांत आणि समाधानी वाटले. व्यवहारातील गोष्टींमुळे शक्तिपात होतो, जमत आलेली शक्ती वाया जाते याची त्यांना जाणीव आहे.

पू. बाबा पुढे म्हणाले, नाशिकचे बाळशास्त्री फडके यांनी एकदा मालाडला भागवताचा सप्ताह केला होता. सकाळी संस्कृत वाचत आणि दुपारी त्याचा अर्थ सांगत असत. त्यांना मी तेव्हां विचारले होते की इच्छा असूनही चांगले साधन का होत नाही? ते म्हणाले की हातून सत्कर्म, सदाचरण आणि अंत:करण शुद्ध होऊन पुण्यसंचय झाल्याखेरीज साधनाला जोर येत नाही. ज्ञानेश्वर महाराजांनीही 'बहुत सुकृताची जोडी। म्हणुनी विठ्ठली आवडी।' असे म्हटले आहे.

**साधक प** : नामस्मरणामुळे जे काही पुण्य घडते ते साठून न राहता रोजच्या व्यवहारातल्या वासना पूर्ण होण्याकरता खर्च होऊन जाते. त्यामुळे साधनाची उंची वर जातच नाही.

**साधक ब** : ब्रदर लॉरेन्सने हे बरोबर ओळखले होते. त्याने एका पत्रात म्हटले आहे की माझ्या हातून एखादे सत्कर्म घडले की हे प्रभू, त्याचे फळ तू

लगेच माझ्या पदरात टाकतोस आणि मी फसवला जातो. खरोखर असे होऊ नये. तुला न कळतच माझी सत्कर्मे घडावीत म्हणजे माझा पुण्यसंचय होईल.

**पू. बाबा** : ज्ञानेश्वरीत भगवंतांनी म्हटले आहे की माझ्या भक्ताला प्रपंचातील सुखदु:खाचे आघात होऊ नयेत, देहविकलता येऊ नये म्हणून मी त्याला आत्मबुद्धीच्या पिंजऱ्यात सुरक्षित ठेवतो. ''देहवैकल्याचा वारा। झणें लागेल या सुकुमारा। म्हणोनि आत्मबोधाचे पांजिरा। सुयें तयातें॥८.१३२॥ तथापि भगवंत पाहिजे तर ज्ञान देतो पण भक्ती सहजासहजी देत नाही कारण भक्ती दिली की तो भक्ताचा बंदिवान होतो. त्याला भक्ताचे ऐकावे लागते.

**साधक ग** : होय. कृष्णप्रेमाने दाखवलेला हलव्याचा नैवेद्य त्याला खावा लागला.

**पू. बाबा** : देहाने सत्कर्म आणि मनाने अखंड नामस्मरण याखेरीज दुसरा मार्ग नाही असे श्रीमहाराज सांगत असत. सत्कर्मात नीतीने वागणे आलेच. अखंड स्मरण म्हणजे एकसारखे नामस्मरणच पाहिजे असे नाही, पण सारखे त्याचे भान, त्याची आठवण पाहिजे. आपण मनाने फार क्षुद्र आहोत. लगेच घसरतो.

**साधक ग** : चित्तशुद्धीसाठी पंतजलींनी उपाय सांगितला आहे. सुख, दु:ख, पुण्य आणि पाप यांच्याविषयी क्रमाने मैत्री, करुणा, हर्ष आणि उपेक्षा म्हणजे दुर्लक्ष अथवा उदासीनता ह्या चार भावना केल्याने चित्त प्रसन्न होते. उदाहरणार्थ, दुसऱ्याचे भले झाले आणि सामान्यत: ते पाहून आपल्या मनात असूया उत्पन्न होत असेल तर तो माझा मित्र आहे अशी भावना करावी.

**साधक प** : ह्या प्रतिपक्ष भावनेचा निश्चितच उपयोग होईल. पण याहीपेक्षा मी हे सगळे का करतो, माझे ध्येय काय आहे याची सतत जाणीव पाहिजे.

**पू. बाबा** : यासाठी एकसारखे आत्मनिरीक्षण पाहिजे. राग आल्याचे लक्षात येताच आज मला मांग शिवला, मी अपवित्र झालो असे तुकाराम महाराज म्हणाले. क्रोधाची भेट होऊन तोंडावाटें नर्क लोटला, अपशब्द आले. 'तोंडावाटे नर्क लोटी' चा अर्थ श्रीमहाराजांनी फार चांगला सांगितला. ते म्हणाले, शरीरातील नरक (घाण) जावयाची वाट वेगळी आहे. तो तोंडावाटे बाहेर पडण्याइतका क्रोध वाईट, किळसवाणा आहे.

**साधक ग** : हे लक्षात येताच त्यांनी तोंडाने विठ्ठलनामाचा उच्चार करून प्रायश्चित्त घेतले.

**पू. बाबा** : आपण निश्चय करावा की प्रपंचातल्या बारीक सारीक गोष्टींनी मी खाली येणार नाही. 'त्याची इच्छा' असे एकसारखे म्हणत राहिलो तरच हे

होईल. आपण नेमके तेच विसरतो. आपले नामस्मरण म्हणजे नुसती कवाईत होते.

**साधक ब :** काही वेळा लक्षात येते की ठराविक गोष्टींबद्दल आपले मन ठराविक गोते खाते आहे. त्यातून ते बाहेर पडत नाही. अशा वेळी त्याला गप्प बसवून नामस्मरण केले पाहिजे.

**साधक ग :** होय, अशा वेळी लक्ष लागले नाही तरी वैखरीने नामस्मरण केले पाहिजे.

**साधक ब :** हे आपले मन घाणेरडे आहे. हे घात करते.

**साधक ग :** याबद्दल आपली पूर्वी चर्चा झाली आहे. एकनाथ महाराजांनी म्हटले आहे 'जेवि हिरेनि हिरा चिरिजे। तेवि मनेंचि मन धरिजे॥'

**पू. बाबा :** होय, पण ते जमत नाही ना! आणि शरणही जाता येत नाही.

**साधक ब :** म्हणूनच प्रार्थना करायची. राम इच्छा राम कर्ता असे सारखे म्हणायचे.

**।१६३।** (१२ ऑक्टोबर १९९०)

सध्या काकड आरतीनंतर पू. बाबा नारदभक्तिसूत्रातील गेल्या वर्षी सांगून झालेल्या सूत्रांच्या पुढची सूत्रे सांगत आहेत. त्यातल्या एका मुद्द्यावरच चर्चा सुरू झाली.

**पू. बाबा :** आपले जीवन चिंता, काळजी, भीती यांनी व्यापलेले आहे. चिंता आणि काळजी यात काय फरक आहे?

**साधक ब :** चिंता विचारातून येते. तिचा पाया बौद्धिक आहे तर काळजी भावनेतून येते. तिचा पाया इमोशनल आहे.

**पू. बाबा :** विचार, भावना, कल्पना यांवर ताबा आल्याखेरीज चिंता आणि काळजी सुटणार नाहीत आणि त्या सुटल्याखेरीज साधन करताना वाया जाणारी शक्ती (शक्तिपात) टाळता येणार नाही.

या संदर्भात पू. बाबांनी Mary Lutensच्या Life and Death of Krishnamurty या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. लेखिका म्हणते की, कृष्णमूर्तींना त्यांच्या शरीरातून प्रचंड शक्तीचा स्रोत वाहतो आहे आणि ते स्वत: केवळ माध्यम (vehicle) आहेत याची जाणीव होती. (या संदर्भात कृष्णमूर्तींनी एका ठिकाणी आपल्या शरीराचे Twelve cylinder engine असे वर्णन केले आहे) हे सांगून लेखिका

म्हणते, असे वाटते की, त्यांना आपण कोण आहोत आणि काय करायचे आहे वगैरेची पूर्ण जाणीव होती का? कारण त्यांच्या शब्दाशब्दातून शक्ती वाहात होती खास. इतकेच नव्हे तर त्यांच्या मद्रासमधील शेवटच्या भाषणाची कॅसेट ऐकतांना त्या ठिकाणी प्रचंड शक्तीचा संचार झाला आहे असे तिला जाणवले! पू. बाबा म्हणाले, स्वामी विवेकानंद अमेरिकेतून परत आले तेव्हां म्हणाले की जगाला शंभर वर्षे पुरतील इतके विचार मी दिले आहेत. आता मी थकलो आहे. **I feel exhausted.** याचा अर्थ हा सगळा शक्तीचा खेळ आहे.

पू. बाबांनी आणखी एक हकिगत सांगितली, श्रीमहाराज एकदा कूर्तकोटीला गेलेले असतांना ब्रह्मानंद महाराजांनी डॉ. कूर्तकोटींच्या वडिलांना श्रीमहाराजांकडून अनुग्रह घ्यायला सुचवले तेव्हां ते म्हणाले की, अनुग्रह घेऊन असे काय साधणार आहे? त्याची काय आवश्यकता? तेव्हां ब्रह्मानंद महाराज म्हणाले गुरु अनुग्रह करतात तेव्हां ज्याला अनुग्रह देतात त्याच्या मुक्तीचा ते संकल्प करतात. तो शक्तिमय असतो आणि तो अनेक जन्म कार्य करतो व जीवास मुक्ती मिळते. गुरु अनुग्रह देतात तेव्हां त्या जीवाची जबाबदारी त्यांच्याकडे जाते. पू. बाबा पुढे म्हणाले, १९५० साली मी अनुग्रह घेतला तेव्हां श्रीमहाराजांना विचारले होते की, गुरूकडून येणाऱ्या शक्तीचा परिणाम काय होतो? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले होते की गुरूने दिल्यामुळे साधन कल्पनेच्या पलीकडे होईल.

पू. बाबांनी विचारले की आपण नामस्मरण करीत असलो तरी रोजच्या व्यावहारिक जीवनात शक्तिपात होतो तो कसा थांबवायचा?

**साधक क** : नामस्मरण करतांना शक्तिसंचय होतो म्हणावे तर ते करतांना थकवा का येतो?

**साधक प** : शक्ती असा आपण एकच शब्द वापरत असलो तरी तिचे वेगवेगळे प्रकार लक्षात घ्यावे लागतील. उदाहरणार्थ, शारीरिक शक्ती व मानसिक शक्ती. मानसिक शक्तीचेदेखील इच्छाशक्ती, भावना, कल्पना इत्यादी उपप्रकार आहेत. नामस्मरणाने मेंदूला येणारा थकवा शारीरिक असतो, तथापि त्याच वेळी ईश्वरसंबंधी धारणाशक्ती वाढणे शक्य आहे.

**पू. बाबा** : शक्ती वाढते आहे याचे गमक काय?

**साधक ग** : साधन करतांना उत्साह वाढला, आणखी साधन करावे असे वाटू लागले तर शक्ती वाढली असे म्हणता येईल.

**साधक प** : हे केवळ इच्छाशक्तीबद्दल झाले. साधन करताना मनाची खळबळ कमी झाली, विकार कमी झाले तर शक्ती वाढली असे म्हणता येईल.

**पू. बाबा** : शक्ती वाढवायची कशी आणि ती वाढते आहे हे ओळखायचे कसे ?

**साधक ड** : पाणी तापू लागले की प्रथम हळूहळू बुडबुडे जमू लागतात आणि मग पाणी उकळू लागते आणि वाफेच्या रूपाने ती उष्णता - बाष्पशक्ती बाहेर फेकली जाते. तसे साधन वाढू लागले की माणसाच्या वृत्तीत बदल होऊ लागतो. त्याच्या निकटच्या लोकांना तो बदल जाणवतो.

**साधक ब** : शक्ती वाढली पाहिजे. तथापि ती व्यवहारातील समस्या सुटण्यासाठी खर्च होता कामा नये. मन शांत होणे हे शक्ती वाढल्याचे चिन्ह आहे. कृष्णमूर्ती व्याख्यानापूर्वी मन रिकामे करीत असत.

**पू. बाबा** : शांती ह्या स्थितीपेक्षा वेगळी आहे. जीवन सारखे बदलते आहे हे आपल्या लक्षातच येत नाही. शोपेनहोअरने म्हटले आहे की कुंभाराच्या चाकावर बसलेल्या माशीला चाक फिरत असले तरी आपण स्थिर आहोत असे वाटते तसे आपण नियतीच्या चक्रावर फिरत असलो तरी आपल्याला स्थिर वाटते. साधनामुळे मन शांत झाले तर जीवनाचा प्रवाह तसाच चालू राहील पण त्याचे सुखदु:ख वाटणार नाही. आज आपण दृश्यात राहतो आणि अहंकारामुळे ते सुखदु:ख आपल्यावर लादून घेतो; म्हणून कर्तृत्व सोडले पाहिजे. ते सुटले की भोक्तृत्वही सुटेल. राम कर्ता असे आतून वाटले पाहिजे.

**साधक ज** : शक्तीच्या प्रकारांचा विचार करतांना लक्षात येते की ती वाढेल तसतशी जास्त सूक्ष्म आणि व्यापक होत जाते. Mechanical energy, Electrical energy, Magnetic energy ह्या जशा उत्तरोत्तर जास्त सूक्ष्म होतात, तशी व्यावहारिक जीवनाला लागणारी शक्ती आणि अध्यात्मिक जीवनाला लागणारी शक्ती भिन्न असाव्या. व्यावहारिक जीवनात अहंला जोर असतो तर अध्यात्मिक जीवनात अहं नाहीसा व्हावा लागतो. म्हणून साधनामुळे अहं पोसला जात नाही ना हे पहावे लागेल.

**पू. बाबा** : जीवनातली आसक्ती, वखवख कमी होऊ लागली तर शक्ती वाढते आहे असे मानायला हरकत नाही.

**साधक ग** : कदाचित खाण्यापिण्याची आवड, कामवासना इत्यादी म्हातारपणामुळे म्हणजे शरीर क्षीण झाल्यामुळेही कमी होतील.

**पू. बाबा** : भोगशक्ती कमी होईल पण इच्छा, वासना कमी होतीलच असे नाही आणि कदाचित त्या विकृत स्वरूपात व्यक्त होतील. वासना चिरतरुण आहे.

**साधक ब** : आपले साधन वाढले आहे आणि विकार कमी होत आहेत असे वाटले तरी त्याची परीक्षा पाहण्यात अर्थ नाही. कारण काही काल विकार नि:सत्त्व झालेसे वाटेल पण ते केव्हां उफाळून येतील ते सांगता येणार नाही. दहा वर्षे उंदीर दृष्टीस पडला नाही तरी त्यानंतर तो दृष्टीस पडला तर मांजर त्याच्यावर झडप टाकते तसे हे आहे.

**साधक ख** : नामाचे प्रेम आले पाहिजे.

**पू. बाबा** : तुकाराम महाराजांनी म्हटले आहे, 'प्रेम देवाचे देणे। देहभाव जाय जेणें। न धरावी मनें। शुद्धी देशकाळाची॥' देहबुद्धी कमी झाल्याखेरीज नामाचे प्रेम वाटणार नाही. पण यापेक्षाही, नाम का घेतो, तर श्रीमहाराजांना आवडते म्हणून अशी भाऊसाहेबांसारखी वृत्ती होणे हे भाग्याचे लक्षण आहे. त्यांना श्रीमहाराजांच्या अस्तित्वाबद्दल शंकाच नव्हती.

**साधक ब** : त्यांच्या अस्तित्वाचा थोडा जरी प्रत्यय आला तरी साधनात प्रगती होईल.

**साधक प** : त्यासाठी आधी मन शांत झाले पाहिजे. तेथूनच समाधानाची सुरुवात आहे. मन शांत होण्यासाठी आपल्या प्रतिक्रिया थांबल्या पाहिजेत.

## |१६४| (२६ ऑक्टोबर १९९०)

**पू. बाबा** : नाम सूक्ष्मही आहे आणि स्थूलही आहे. ते स्थूल व सूक्ष्म यांना जोडणारी साखळी आहे.

**साधक प** : स्थूल आणि सूक्ष्म असा नामात फरक होत नसून तो घेणारात होत असला पाहिजे. प्रवचनात श्रीमहाराजांनी दोन मार्ग सांगितले आहेत. (१) तळमळ, (२) शरणागति. यांपैकी शरणागती फारच कठीण आहे; पण तो शॉर्ट कट (जवळचा रस्ता) आहे. कारण बहुधा वासना ठेवूनही शरण जाता येत असले पाहिजे. लहान मूल जसे हटून रस्त्यात बसून राहिले की शेवटी बाप त्याला उचलून घेतो तशी ही अवस्था असावी. तळमळीत तो हवा असे आतून तीव्रतेने वाटले पाहिजे.

**पू. बाबा** : आपण नाम घेतो पण त्याची संकल्पना काय ते सांगता येईल काय ?

**साधक प** : ही अशक्य गोष्ट आहे, कारण खरे नाम कळते त्यावेळी 'मी' नसतोच. राम कर्ता ही संकल्पना जरी कळली नाही तरी त्याचा परिणाम जर जीवनात दिसू लागला, कोणत्याही गोष्टीचा त्रास उरला नाही आणि कोणत्याही परिस्थितीत समाधान राहिले तर संकल्पना करून मिळवायचे तरी काय? ज्याप्रमाणे working hypothesis ला (तात्पुरत्या अभ्युपगमाला) खरे महत्त्व असते त्याप्रमाणे नाम घेतल्याने आणि राम कर्ता अशी भावना करून समाधान राहिले की काम झाले.

चर्चा चालू असतांना मधेच कोणीतरी पू. बाबांना भेटून गेले. नंतर पू. बाबा म्हणाले की कोणी आले तर नको वाटते. पण श्रीमहाराजांनी सांगितले आहे की कोणी आले तर नाही म्हणू नये आणि नाही आले तर यावेसे वाटू नये. हाच आपला एकान्त. खऱ्या नामासाठी एकान्त लागतोच.

**साधक ब** : अशा एकान्तासाठी उपाय काय?

**पू. बाबा** : मी नामासाठी जगतो असे वाटले पाहिजे म्हणजे नामात गोडी येईल आणि जगाचा विसर पडेल. अब्दुल करीमखाँ म्हणत की मी स्वरांना गोंजारतो, तसे नाम घेतांना गोड वाटले पाहिजे. नामाचे प्रेम वाटले पाहिजे. याला थोडी भावनेची गरज आहे. नाम घेतांना सद्गुरूंनी मला हा केवढा मोठा ठेवा दिला आहे अशी कृतज्ञता वाटली पाहिजे.

आपण आपल्या शरीराच्या स्वस्थतेकडेच जास्त लक्ष देतो आणि नाम विसरतो. सेंट टेरेसाने शरीराला sack of dung (विष्ठेचे पोते) म्हटले आहे. शरीर आतून पाहिले तर किळसच येईल.

## |१६५| (२ नोव्हेंबर १९९०)

पू. बाबांनी जे. कृष्णमूर्तींच्या Commenteries on Living (Part II) मधील पृष्ठ ९ वरचा काही भाग वाचून दाखवला. कृष्णमूर्तींनी म्हटले आहे की, माणूस खरा एकटा असतो पण तो एकटेपणाला भितो. एकांताची ही भीती स्मृतीवर आधारित असते. पू. बाबांनी विचारले, आपल्याला एकांताची ओढ का वाटत नाही? ही ओढ म्हणजे एक प्रकारची अज्ञाताची हाक असते आणि ती आतून यावी लागते. मला वाटते की आपल्या वासना आपल्या एकांताच्या आड येतात.

**साधक प** : एकांताचीच वासना असली तर छान होईल. श्रीमहाराज म्हणत की रात्री १२ ते ३ हाच आपला एकांत.

**पू. बाबा :** आपल्याला कधी एकटे राहणे माहीत आहे का? जोपर्यंत जनात असतांनाही आत एकटे होता येत नाही तोपर्यंत साधनात प्रगती होणार नाही. 'माझे मज कळो येती अवगुण' असे तुकाराम महाराज म्हणतात तेव्हां त्यांनी एकांतातील आत्मनिरीक्षणाची पायरी ओलांडलेली होती. एकांत हे एक प्रकारे अलिप्त होणे **(withdrawal)** आहे. ते साधले तर मरणाची भीती राहणार नाही.

**साधक ग :** यासाठी सुरुवातीला तरी बाहेरची परिस्थिती एकांताला अनुकूल असण्याची गरज आहे. घरात किंवा चार लोकात राहून अलिप्तता येणे कठीण आहे. खरे म्हणजे एकटे असणे आम्हाला माहीतच नाही.

**पू. बाबा :** कोणीही आपल्याला ओळखत नाही अशा ठिकाणी चार दिवस जाऊन राहिले तर?

**साधक प :** मी एकटा आहे हे एकदा लक्षात आले की काम झाले.

**पू. बाबा :** तुम्ही सांगता तो मार्ग विचाराचा आहे. त्यापेक्षा सर्व लक्ष भगवंताकडे किंवा नामाकडे वळवले तर हळूहळू मी नाहीसा होईल. हा भक्तीचा मार्ग आहे. तथापि परमार्थात विवेकाचे महत्त्व आहेच. श्रवणामुळेही हा विवेक जागा होतो. नुकत्याच एक म्हाताऱ्या बाई भेटायला आल्या होत्या. जेरेशास्त्र्यांकडे त्यांनी वेदान्तश्रवण केले आहे. त्यांचा मोठा मुलगा ४५ वर्षांचा होऊन वारला. अलिकडे नवराही वारला. त्याला मधुमेह, पक्षाघात इत्यादी आजार होते. बाई म्हणाल्या, ते आधी गेले ते बरे झाले. माझ्यानंतर त्यांचे कोणी केले असते? मी त्यांना विचारले की येवढे आघात होऊनही तुम्ही शांत कशा? त्या म्हणाल्या, मी विवेकाला माझा मित्र केला आहे. पू. बाबा म्हणाले, विवेक नसल्यामुळे आपला शक्तिपात होतो.

**साधक ब :** इंद्रियांद्वारे आपला शक्तिपात होतो हे खरेच आहे पण एकदा आपल्याला हे नक्की कळले की आपण तो इंद्रियनिग्रह करून थांबवलाच पाहिजे. प्रथम आपण आत रंगून गेलेले नसू पण हा वायफळ शक्तिपात थांबवलाच पाहिजे.

**पू. बाबा :** दृश्याच्या विचारानेसुद्धा शक्तिपात होतो. एक भगवत्‌चिंतन सोडून इतर सर्व विचारांनी शक्तिपात होतो. तो अभ्यासाने कमी करावा. आपल्याला नामाची संगत वाटली पाहिजे.

**साधक ग :** संगत वाटायला आम्हाला नाम म्हणजे काय याची कल्पनाच नाही. यापेक्षा भगवंताच्या सगुणरूपाची किंवा सद्‌गुरूंची कल्पना करता येणे शक्य आहे.

**साधक ख** : खरे म्हणजे दोन्हीही कठीण आहेत.

**पू. बाबा** : गुरू म्हणजेच नाम हे कसे ते कळत नाही हीच सर्वांची तक्रार आहे. तथापि नाम हे भव्य दिव्य आहे. त्याचीच आपण प्रार्थना करावी की तू माझी संगत कर. मदतीसाठी नामाचीच प्रार्थना करावी. त्याला म्हणावे की, मी इतके दिवस तुझ्यामागे आहे, पण तू पळून जातोस. तू स्वत: कृपा केल्याशिवाय मला तुझी संगत मिळणार नाही.

**साधक प** : मनात येणारे इतर विचार आपल्याला नामापासून दूर करतात. विचार बरोबर झाला तर तो आपण होऊन थांबेल व मग एकांत मिळेल. मग खरे नामस्मरण आपोआप घडेल, करावे लागणार नाही. नाम हे स्वयंभू आहे. ते नेहमी असतेच. पण जोपर्यंत 'मी' नाम घेतो ही भावना आहे तोपर्यंत माझा त्यावर ताबा आहे असे वाटते. खरोखर नामाबद्दल काय भावना ठेवावी?

**पू. बाबा** : नाम हे माझ्याव्यतिरिक्त काहीतरी स्वतंत्र अस्तित्व आहे आणि ते सर्वव्यापी आहे अशी भावना ठेवावी. जुनी हकिगत आहे. एक दिवस श्रीमहाराजांनी वैद्य कासेगावकर आणि त्यांच्या पत्नीला काही सांगायचे आहे म्हणून बोलवून घेतले. त्यांना वाटले महाराज काय सांगणार आहेत कोणास ठाऊक. दोघे समोर बसल्यावर श्रीमहाराजांना भरून आले आणि श्रीराम स्मरणात राहावे इतकेच ते बोलू शकले. श्रीमहाराजांना ते केवढे सत्य आणि सर्वस्व वाटत होते ते आपल्याला कसे सांगता येईल?

मन किंवा विचार प्रत्यक्ष दिसले नाहीत तरी खरे वाटतात तसे नाम खरे वाटले पाहिजे. ते अंतर्मनात शिरले पाहिजे. श्रीमहाराज एक गोष्ट सांगत. एक मुलगी अती झोपाळू होती. झोपली की कितीही मोठा आवाज झाला तरी जागी होत नसे. पुढे लग्न होऊन तिला मूल झाले. ते रात्री थोडे जरी रडले तरी ती लगेच जागी होई. मुलाचे रडणे जसे तिच्या अंतर्मनात (subconscious) शिरले होते तसे नाम खोल गेले पाहिजे.

## ।१६६। (९ नोव्हेंबर १९९०)

पू. बाबांचे एक जुने विद्यार्थी त्यांचा आज ५० वा वाढदिवस आहे म्हणून पू. बाबांना नमस्कार करावयाला आले होते. ते नामस्मरण करतात आणि रोज ज्ञानेश्वरीतील काही ओव्या वाचतात, ते म्हणाले की ज्ञानेश्वरी कशी समजून घ्यावी, वाचणाऱ्याची भूमिका काय असावी ते ज्ञानेश्वर महाराजांनी ग्रंथाच्या सुरुवातीलाच सांगितले आहे.

**"जैसे शारदियेचिये चंद्रकळे-। माजि अमृतकण कोंवळे।**
**ते वेंचिती मनें मवाळें। चकोरतलगें॥**
**तियापरी श्रोतां। अनुभवावी हे कथा।**
**अति हळुवारपण चित्ता। आणूनिया॥"१.५६,५७.**

ते म्हणाले की ह्या ओव्यांवर त्यांचे चिंतन चालू असतांना आपण जणु काही शरदऋतूतील चांदण्यात बसलो आहोत असा त्यांना अनुभव आला.

**पू. बाबा** : खरोखर ज्ञानेश्वरीचा अभ्यास असा हळुवारपणे केला पाहिजे.

**साधक क** : ह्या ओव्यांनंतर लगेच ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे की कमलदलांना कळणार नाही अशा नाजुकपणे भुंगे त्यातील परागकण नेतात तसा ह्या ग्रंथाचा आस्वाद घ्यावा.

**"जैसे भ्रमर परागु नेती। परी कमळदळें नेणती।**
**तैसी परी आहे सेविती। ग्रंथीं इये॥"१.५९॥**

**पू. बाबा** : ही सूक्ष्मता साधन करतांना कां येत नाही? आणि आलीच तर कां टिकत नाही? आपल्याला अनुभव येतात पण ते खरे कां वाटत नाहीत?

**साधक क** : दृश्याचे खरेपणच तेवढे आम्हाला समजते.

**साधक प** : येणारा अनुभव खोटा किंवा भ्रम आहे असे वाटत नाही पण तरीदेखील त्याचे खरेपण टिकून रहात नाही.

**पू. बाबा** : येणारे अनुभव खरे असले तरी मनाच्या ज्या पातळीवर ते अनुभव येतात ती पातळी टिकून रहात नाही कारण आपला सतत शक्तिपात होत असतो. आपण क्षुद्र बनतो. होणारा शक्तिपात थांबवल्याखेरीज साधनात प्रगती होणार नाही.

**साधक ग** : जागरूक राहून शक्तिपात थांबवला पाहिजे हे खरेच. तथापि शक्तिसंचय होतो आहे की नाही हे कसे ओळखावयाचे?

**पू. बाबा** : शक्तिसंचय होतो आहे हे दोन प्रकारे ठरविता येईल. १) मन शांत राहील. कोणतीही परिस्थिती असो, मनाची उलघाल होणार नाही. २) साधन जास्त चांगले जमू लागेल. त्यात आनंद वाटू लागेल. पण शक्तिसंचय कसा करावयाचा?

**साधक प** : अखंड अनुसंधानात राहणे, अगदी वैखरीने का होईना, पण अखंड नामस्मरण करणे हाच मार्ग आहे. आमचे साधन नीट होत नाही कारण अहंकार आड येतो.

**पू. बाबा :** सद्ग्रंथवाचन आणि सत्संगती हे शक्तिपात थांबवावयाला अतिशय प्रभावी उपाय आहेत.

**साधक क :** केवळ भगवंताचा विचार हाच सद्विचार. श्रीरामकृष्णांना त्यांच्या एका शिष्याचे पत्र आले. ते नुसते हातात घेऊनच त्यांनी सांगितले की हे चांगले पत्र आले. यात ईश्वराखेरीज इतर गोष्टी नाहीत. तसे नसते तर ते मला हातात धरवले नसते. इतका सूक्ष्मपणा त्या शरीरात होता. कृष्णमूर्तींनीही पवित्र शरीराचे महत्त्व सांगितले आहे.

**साधक प :** संतांचे शब्द हे मंत्रच असतात. ज्ञानेश्वरी वाचतांना माउली आपल्याशी हितगुज करते आहे अशी वारकऱ्यांची भावना असते. श्रीअरविंदांच्या लिखाणातील एकही शब्द बदलू नका. त्या शब्दांमागे त्यांची शक्ती काम करते आहे असे मदरनी एकदा सांगितले होते. या गोष्टी विचाराने पटतात पण तसा भाव जागृत होत नाही. डोके आणि हृदय यांमध्ये सुसंवाद निर्माण होत नाही आणि व्हावे तसे साधन होत नाही. काहीतरी तळमळ लागल्याशिवाय सावधानता येणार नाही आणि साधनात प्रगती होणार नाही.

## |१६७| (१६ नोव्हेंबर १९९०)

**पू. बाबा :** आज सकाळी एक गृहस्थ आले होते. ते म्हणाले की साडेतीन कोटी जपाच्या संकल्पाचे उदक सोडावे असे मनात येते; काय करू? मला सत्पुरुषाचा छत्तीस वर्षे सहवास लाभला. त्यामुळे याबाबतीत काय सांगावे, कसे वागावे ते समजू लागले आहे. श्रीमहाराज सांगत तेच मी त्यांना सांगितले. मी म्हणालो की एकट्याने संकल्प करण्यापेक्षा नवरा-बायको दोघांनी मिळून संकल्पाचे उदक सोडा. श्रीमहाराज म्हणत की यामधे दोन गोष्टी साधतात. १) घरातून विरोध राहात नाही आणि २) जपात भागीदारी **(sharing)** होते. मी त्यांना रोजचे व्यवहार सांभाळून सुरुवातीला प्रत्येकजण रोज पाच हजार जप करा म्हणून सांगितले. म्हणालो, फार हिशोब करू नका. दोघांचा मिळून रोज दहा हजार जप झाला तरी साडेतीन कोटीला अंदाजे दहा वर्षे लागतील.

साडेतीन कोटी जपसंख्या देतांना श्रीमहाराज म्हणत की यामुळे तीन गोष्टी साधतात. १) देह व मन शुद्ध होतात. २) नामाच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो आणि ३) पुण्यसंचय होतो. पुण्यसंचयाची अतिशय गरज आहे. श्रीमहाराजांनी डॉ. कूर्तकोटींना गोंदवल्याच्या नदीपलीकडच्या भीमाशंकराच्या

देवळात चाळीस दिवस जप करायला सांगितले होते. शेवटच्या दिवशी श्रीमहाराजांनी त्यांच्या डोक्यावर हात ठेवताच त्यांची समाधी लागली पण ती पाऊण-एक तासच टिकली. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की पुण्यसंचय कमी आहे. अद्यापि लौकिकाची वासना शिल्लक राहिली आहे.

विवेक आणि वैराग्याचा आश्रय घेऊन देह आणि मन शुद्ध केल्याखेरीज नाम स्थिर होणार नाही. नामात रस येणार नाही.

**साधक प** : नाम हेच सत्य आहे. पण जोपर्यंत ते 'मी घेतो' म्हणतो तोपर्यंत ते स्थिर कसे होईल?

**साधक ग** : श्रीमहाराज म्हणत की नाम ही स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारी साखळी आहे. मी स्थूलातच नाम घेतो. देह जोपर्यंत शुद्ध होत नाही तोपर्यंत ते सूक्ष्मात पोहोचणार नाही. म्हणून आचार, विचार, आहार यात संयम पाळणे आवश्यक आहे.

**पू. बाबा** : लहान सहान गोष्टीत आपण घसरतो; क्षुद्र होतो. व्यवहाराच्या थोड्याशा संबंधानेही मन दूषित होते. सत्पुरुषांचे कसे असेल? सर्व काळ विषयी लोकात वावरूनही त्याचा त्यांच्यावर परिणाम होत नाही. खरोखर ते समुद्रासारखे असतात. ''निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें। साधन बरवें हेंचि एक॥' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. ही निर्वैराची अवस्था काय असेल?

**साधक क** : गीतेतही ''निर्वैर: सर्वभूतेषु य: स मामेति पांडव।'' असे म्हटले आहे.

**साधक ग** : द्वैत असेल तर वैर. मीच सर्व ठिकाणी आहे हे जाणले की वैर कोणाशी?

**साधक प** : ही शेवटची स्थिती झाली. येथे हे साधन म्हणजे अभ्यास म्हणून सांगितले आहे. हा अभ्यास करतांना माझ्यासारखाच तो असे वाटले पाहिजे. साधक क म्हणतात की सर्व ठिकाणी मला तोच दिसला पाहिजे. पण मला वाटते, आधी माझ्यामधें तो आहे हे ज्ञान झाल्याखेरीज, म्हणजे तसा अनुभव आल्याखेरीज ही पुढची अवस्था येणार नाही.

**साधक ज** : एका ॐकारापासून सर्व झाले आहे. तोच सर्व ठिकाणी आहे, तर मग द्वैत कोठून आले?

**साधक प** : अज्ञानामुळे द्वैत भासते. घटामधें सूर्याचे प्रतिबिंब दिसावे तसे जीवामधें परमात्म्याचे प्रतिबिंब आहे.

**पू. बाबा :** एकदा श्रीमहाराज म्हणाले, तुम्ही इतके वाचता त्यात चमत्काराची व्याख्या नाही का दिलेली ? श्रीमहाराजांनी विचारले त्यापूर्वी दोन दिवसच तो भाग मी बी. ए. च्या विद्यार्थ्यांना शिकवलेला होता त्यामुळे मी लगेच म्हणालो, आहे. ज्या घटनेचे कारण माहीत नसते त्या घटनेला चमत्कार म्हणतात. **(Miracle is an event the cause of which is not known).** दृश्य जगात तरी कारणाशिवाय कार्य घडत नाही. फार तर ते आपल्याला अद्यापि माहीत नसेल. पण दृश्याच्या पलीकडे गेले की स्थल-कालाबरोबर कार्यकारण भावही लुप्त होतो.

**।१६८।** (२३ नोव्हेंबर १९९०)

**पू. बाबा :** (साधक प ना) तुम्ही दिलेले मदरचे **(The Psychic Being)** पुस्तक वाचले. अरविंदांपेक्षा मदरची लेखनशैली समजण्यास सोपी आहे. पृष्ठ ६९ वर मनाला शांती मिळविण्याचे दोन मार्ग त्यांनी सांगितले आहेत. १) साक्षीभावाने जगाकडे आणि स्वत:कडे पाहणे. असे करतांना आपण कोठे चुकतो, कशामुळे आपली शांती बिघडते इकडे लक्ष देऊन माणूस त्यातून बाहेर पडू शकतो. २) सर्व काळ भगवंताच्या अनुसंधानात राहणे. विचार करायचा तो त्याचा, कल्पना करायची ती त्याची, स्मरण करायचे ते त्याचे. आपल्या आजूबाजूला असलेल्या जीवमात्रात त्याला पाहायचा अभ्यास करायचा. यामुळे वृत्ती एकविध होऊन चित्त अशांत होणार नाही. मदरच्या या सांगण्यात आणि श्रीमहाराजांच्या सांगण्यात पुष्कळ साम्य आहे. शांतीबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणत, शांत शब्द देखील किती शांऽत आहे!

नंतर पू. बाबांनी दोन जुन्या घटना सांगितल्या.

श्रीमहाराजांचे एक निकटचे भक्त एकदा आजारी होते. श्रीमहाराजांना (पेटीवर पू. तात्यासाहेबांना) म्हणाले की मला भाऊसाहेबांना (केतकर) भेटावेसे वाटते. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, ते आता येथून खूप दूर (परलोकी) आहेत आणि आनंदात आहेत. त्यांची भेट आता कशी होणार ? तेव्हां ते भक्त पू. तात्यासाहेबांना म्हणाले, मला महाराजांना भेटायचे आहे. यावर श्रीमहाराज म्हणाले, तुम्हाला मी गेलो असं वाटतं म्हणून मला परत भेटावंसं वाटतं म्हणता. वास्तविक मी कधी गेलोच नाही. ज्या देहाला तुम्ही मी समजत होता तो मी नव्हतोच! मी आहे तेथे तुम्ही या. मला कशाला खाली ओढता ? हे सांगून पू. बाबा म्हणाले, खरोखर सत्पुरुषाचे अस्तित्व जाणवणे

फार अवघड आहे. ती भाग्याची गोष्ट आहे. आपण त्यांना देहात पहातो आणि देह पडला की ते गेले असे समजतो. वास्तविक ते देहात नसतातच.

श्रीमहाराज गेले तेव्हां श्री. गणपतराव दामले त्यांच्या एका मित्राबरोबर पुण्याहून सायकलवरून गोंदवल्याला गेले. ते तेथे पोहोचले तेव्हां श्रीमहाराजांचा देह चितेवर ठेवला होता. ते आले आहेत असे कळताच अग्निसंस्काराच्या ठिकाणी ते पोहोचण्यापूर्वीच श्री. आप्पासाहेब भडगावकरांनी त्या दोघांना श्रीमहाराजांचे दर्शन घेऊ न देता परत पाठवले! पुढे एकदा यासंबंधी बोलतांना श्री. आप्पासाहेब म्हणाले, गुरूंना जळतांना पाहू नये; ते आता नाहीत अशी भावना होते.

नामातच गुरूंना पहावे असें सांगून पू. बाबांनी विचारले की आपण नामस्मरण करतो; ते करतांना काही वेळा आनंदही वाटतो. आणि तरीदेखील नामस्मरण का वाढत नाही?

**साधक प** : मला वाटते की नामस्मरण करतांना आनंद झाला की तो आनंद पुन:पुन्हा मिळावा असे वाटते आणि त्यामुळे पुण्यसंचय न होता उलट आनंदाच्या भोगामुळे ते संपून जाते. कशासाठी तरी नाम न घेता नामाकरिता नाम घेतले पाहिजे. नाम पूर्ण आहे. त्यातून आणखी काही मिळवायचे नाही अशा भावनेने नामस्मरण झाले पाहिजे.

**साधक ड** : नाम हे साधन नसून साध्य आहे हे लक्षात येत नाही.

**पू. बाबा** : मी यावर विचार केला. मला वाटते, आपण संसारात गुंतून राहतो. त्यामुळे आपला एकसारखा शक्तिपात होतो. खरे नामस्मरण शरणागतीनंतरच होते. साधनाची हद्द झाली असे जेव्हां होते तेव्हां शरणागती येते. शरणागती वाटते तितकी सोपी नाही. त्याला फार शक्ती लागते.

आता जीवनाचा शेवट आला तरी देणे का होत नाही? बरे, हे देणे बाहेरचे नाहीच; मनाचे आहे.

**साधक ब** : विचार केला की आत्तापर्यंतचे सर्व जीवन फुसके होते, त्यात आपले कर्तृत्व नव्हते हे लक्षात येते. मला जर कोणी विचारले की तुला पुन्हा तरुण करतो, होणार कां? तर मी नको म्हणेन. कारण हे सर्व किती फुसके आहे, तात्पुरते आहे, ते समजले आहे.

**पू. बाबा** : ययातीने त्याच्या मुलाकडून त्याचे तारुण्य घेऊन भोगले आणि त्यानंतर तो अशा निष्कर्षाला आला की उपभोगाने इच्छा तृप्त होत नाहीत.

उलट आगीत आहुती टाकल्याप्रमाणे त्या आणखीनच भडकतात, "न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते॥'

अल्बर्ट कामूने जीवनाचे वैय्यर्थ वर्णन केले आहे. तसेच ॲडलरनेही आसक्तीमुळे मनुष्य जीवनात कसा गुरफटतो ते सांगितले आहे. अब्दुल करीम खाँ सुरांना गोंजारत तसे नामाला गोंजारावे. त्याची आठवण करावी, प्रार्थना करावी. सर्व कर्मे करतांना त्याची आठवण ठेवावी. या बाबतीत खरोखर ब्रदर लॉरेन्स हा आदर्श आहे.

## ।१६९। (३० नोव्हेंबर १९९०)

पू. बाबांना भेटावयाला एक गृहस्थ, त्यांच्या पत्नी व मुलगा आले होते. नोकरी ठीक चालू आहे ना? असे पू. बाबांनी मुलाला विचारले. तो होय म्हणाला. ती मंडळी गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले, जोपर्यंत गुलामगिरी चांगली वाटते तोपर्यंत परमार्थ नाही. संसार ही गुलामगिरीच आहे. तशी ती जाणवत नाही इतकेच! मी एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की मला चांगली सोयीची नोकरी मिळावी. त्यावर श्रीमहाराज झट्दिशी म्हणाले, मागायचे तर मालकी मागावी. नोकरी कशाला? सत्पुरुषांची दृष्टी ही अशी असते.

नंतर धर्म व नीती यासंबंधी बोलणे निघाले.

**पू. बाबा** : पाश्चात्य तत्त्वज्ञ धर्मापेक्षाही नीतीला जास्त महत्त्व देतात. धर्माशिवाय नीती असू शकते. ती समाजधारणेला आवश्यक आहे असे त्यांचे मत आहे. प्रसिद्ध विचारवंत ह्यूम म्हणतो की नीतीचा पाया असल्याशिवाय समाजधारणा अशक्य आहे. तो म्हणतो, समजा, समाजातला प्रत्येक माणूस खोटे बोलू लागला किंवा कसलाही करार (contract) करतांना तो पाळावयाचा नाही असे प्रत्येकाने ठरवले तर समाज कसा टिकेल? संत धर्म आणि नीती दोहोंनाही महत्त्व देतात. वेदान्ती लोकांवर हा आक्षेप आहे की त्यांनी नीतीला आवश्यक ते महत्त्व दिले नाही.

पू. बाबांनी नंतर तुलसीदासांच्या विनय पत्रिकेतील एक पद (क्र. २२६) वाचून दाखवले. पदाची सुरुवात 'भरोसो जाहि दूसरो सो करो।' अशी आहे. या पदात ते म्हणतात 'मेरे तो माय-बाप दोउ आखर, हौं सिसु-अरनि अरो।' पदाच्या शेवटी म्हणतात 'अपनो भलो राम-नामहि ते तुलसिहि समुझि परो।' पू. बाबा म्हणाले की पदातील 'मेरे तो माय-बाप दोउ आखर' या ओळीचा पूर्ण अर्थ लक्षात येत नाही. रा आणि म ही दोन अक्षरे म्हणजे माझे आईबाप आहेत.

त्यांच्याजवळ मी बालहट्ट धरून बसलो आहे. हे म्हणतांना त्यांचा नेमका काय भाव आहे? रा आणि म ह्या दोन अक्षरांना मायबाप कां म्हटले आहे?

**साधक ब** : मायबाप म्हणण्यात नामाचे संरक्षण आहे.

**साधक प** : ह्याच पदात सुरुवातीला रामनामाला कल्पतरू म्हटले आहे. आई-बाप जन्म देतात. मी रामनामातून आलो आहे आणि मला त्याचेच संरक्षण आहे.

**पू. बाबा** : हा अर्थ जास्त बरोबर वाटतो.

**साधक क** : तुलसीदास लहानपणीच पोरके झाले म्हणून त्यांनी रामालाच आईबाप मानले.

**साधक ब** : मायबाप म्हणतांना त्यांनी फक्त रामाचे नांव घेतले आहे. सीतेचा उल्लेख केलेला नाही.

**साधक ग** : येथे उल्लेख केलेला राम दाशरथी राम नसून ते परमात्मतत्त्व आहे. त्यातूनच जीव येतो. येथे रामनामावर भर दिलेला आहे. नामाचे महत्त्व सांगितलेले आहे.

**SPAN** मासिकाच्या एका अंकात शास्त्रज्ञांनी बदकांच्या पिलांवर केलेल्या एका मानसशास्त्रीय प्रयोगाची माहिती दिलेली आहे. साधक प यांनी ती माहिती सांगितली. प्रयोग करणाऱ्या शास्त्रज्ञांना असे आढळून आले की अंड्यातून बाहेर आल्याबरोबर पिलांना पहिल्यांदा जी वस्तू दिसते त्या वस्तूला ती आई समजू लागतात आणि संरक्षणासाठी तिकडे धावतात. सामान्यत: मादीच उबलेल्या अंड्यांना चोंच मारून ती फोडते व साहजिकच पिलांना ती प्रथम दिसते. शास्त्रज्ञांनी स्वत: काही अंडी फोडली व पिले बाहेर पडतांच त्यांना एक बाहुली दाखविली. परिणाम असा झाला की भीती वाटतांच संरक्षणासाठी पिले त्या बाहुलीकडे धावू लागली!

माणसाच्या पिलाची देखील हीच स्थिती असते. जन्मल्यानंतर ते सर्वस्वी आईवर अवलंबून असते. पू. बाबा म्हणाले, त्या मुलासारखे आपल्याला सर्व काही नामावर सोपविता आले पाहिजे. कोणावर तरी अवलंबून राहावयाला मिळणे देखील भाग्याचे असते.

पू. बाबा म्हणाले, कृष्णमूर्तींनी म्हटले आहे की त्यांना बालपण असे मिळालेच नाही. सुरुवातीचा काही साधनकाल सोडता पुढे लोक त्यांच्याकडे World Teacher म्हणूनच पाहू लागले. त्याविरुद्ध त्यांनी बंड केले. Order of The Star of East, Thesophical society इत्यादी

सर्व त्यांनी सोडून दिले. स्वत:बद्दल एका ठिकाणी त्यांनी म्हटले आहे की **The boy had a vacant mind.** निर्विचार अवस्था. पू. बाबा म्हणाले, हे सगळे वाचल्यावर माझ्या मनात विचार आला की अशी विचारशून्य अवस्था अनुभवलेला एखादा माणूस तरी पाहण्यात यावा; आणि काय सांगू, आज सकाळीच धारवाडचे एक गृहस्थ भेटायला आले! त्यांच्या गुरूनी त्यांना बाकी काहीही करू नकोस, फक्त कोणताही विचार न करता बसण्याचा अभ्यास कर म्हणून सांगितले होते. ते म्हणाले की गुरूनी सांगितलेला हा अभ्यास त्यांनी सुमारे पंधरा वर्षे केल्यानंतर साधनाला बसले की ते देहभान विसरून जाऊ लागले आणि शून्यावस्था येऊ लागली. हातपायही हलवता येत नसत. तथापि ह्या अवस्थेत आनंद नव्हता. गुरूना हे सांगितल्यावर त्यांनी नामस्मरण करावयाला सांगितले. अनुभव असा आला की मनात फक्त नामाचाच विचार राहतो आणि आनंद वाटतो.

**साधक म** : त्यांची विचारशून्य अवस्था ताटस्थ्याची असावी.

**साधक प** : वास्तविक ती सास्मित आणि सानंद समाधीची अवस्था आहे. त्यांना त्यात आनंद होत नव्हता याचा अर्थ त्यांचे कोठेतरी अडत असले पाहिजे. कदाचित आता कोणताच विचार करावयाचा नाही हाच विचार प्रबळ होत असावा आणि आपण आता कोणता विचार करत नाही असे त्यांना वाटत असावे. नाहीतर निर्विचार होणे ही मोठी अवस्था आहे.

**पू. बाबा** : त्यापेक्षा केवळ नामस्मरणाची वृत्ती टिकवणे सोपे आहे आणि त्यात कोणताही धोका नाही.

आता उद्या गोंदवल्याला जायचे आहे. तीन तारखेपासून उत्सव सुरू होईल. तेथे रोज प्रवचन आहेच. पण तेथे सर्व गर्दी संमिश्र असते. त्यांना काय सांगायचे असा प्रश्न पडतो. खरा परमार्थ कोणाला पाहिजे? आपण श्रीमहाराजांना सांगतो आहोत असे समजून सांगावे म्हणतात पण ते जमणे कठीण. त्यापेक्षा श्रीमहाराजांनी सांगितले होते की सांगतांना आपणच ते ऐकावे. ते जास्त सोपे आहे. खरे म्हणजे मला वाटते की रात्री एकट्यानेच एखाद्या शेतात जाऊन शांतपणे नामस्मरण करावे. पण तेथे मी बंदिवान होऊन पडतो! पाहू आता काय सांगायचे ते!

**साधक ग** : मेघवृष्टी न्यायच खरा. पाऊस पडला की मेघ त्याचा परिणाम पहायला परत येत नाहीत. तुम्ही सांगता, आम्ही सर्वजण ऐकतो. कोणाचा दिवा केव्हां पेटेल हे कोणी सांगावे!

**पू. बाबा** : थिअरी (सिद्धान्त) म्हणून हे ठीक आहे पण प्रत्यक्षात जमलेली गर्दी पाहिली की त्यांना कसे सांगावे असा प्रश्न पडतो. एका जर्मन तत्त्वज्ञान्याने Religion is complete dependence on the divine असे म्हटले आहे. आपल्याला असा complete dependence का जमत नाही? श्रीमहाराजांनी सर्व जबाबदारी घेतलेली असूनही भाऊसाहेबांसारखे आपण त्यांच्यावर का सोपवत नाही? याचे उत्तर असे की आमची त्यांच्यासारखी निष्ठा नाही, ती वाढेल असे वागले पाहिजे.

## |१७०| (२ डिसेंबर १९९०)

गोंदवले.

**पू. बाबा** : आज सकाळी एक गृहस्थ भेटायला आले होते. ते म्हणाले की, श्रीमहाराजांच्या तसबिरीकडे पहात ते बसले की त्यांना श्रीमहाराजांच्या हातातली माळ फिरतांना दिसते. बोलण्याच्या ओघात मी त्यांना विचारले की, त्यांना भीती वाटते का किंवा कशाची काळजी लागते का? ते हो म्हणाले. तुम्हाला सांगतो, खरोखर ज्याला श्रीमहाराज माळ फिरवतांना दिसतील तो भीती, काळजी इत्यादींच्या पलीकडे जाईल. श्रीमहाराज माझ्या घरात आहेत हा भाव स्थिर झाला की काळजीला जागाच राहणार नाही. असे होत नाही तोपर्यंत माळ फिरतांना दिसणे किंवा आणखी काही दिसणे हा केवळ भ्रम आहे. श्रीरामकृष्णांसारख्या थोर विभूतींचे हे अनुभव असतात. श्रीमहाराज घरात आहेत असे ज्याला खरे खरे वाटेल त्याचे सारे जीवनच बदलून जाईल. मी असा एक पुरुष पाहिला. ते म्हणजे श्री. भाऊसाहेब केतकर.

**एक साधक** : महाराज, मला फार राग येतो. रागाच्या भरात नको ते बोलतो, करतो आणि नंतर त्याचे वाईट वाटते. तसेच जप करतांनाही मन एकाग्र होत नाही.

**पू. बाबा** : राग का येतो आणि वाईट वाटते म्हणजे काय होते, कशाचे वाईट वाटते? उदाहरणार्थ, राग आला याचे वाईट वाटते की, राग आल्यामुळे व्यावहारिक नुकसान होते त्याचे वाईट वाटते इत्यादींवर विचार करा. हा राग तुम्हाला का काढायचा आहे? धंद्यावर प्रतिकूल परिणाम होतो म्हणून, की तो साधनाच्या आड येतो म्हणून, की लोकांमध्ये प्रतिमा खराब होते म्हणून, की शक्ती वाया जाते म्हणून, की अस्वस्थता येते म्हणून किंवा माझ्या गुरूंना

आवडत नाही म्हणून राग हानिकारक वाटतो? विचार केलात तर तुम्हालाच तुमच्या रागाची कारणे सापडतील.

तुम्ही म्हणता की जप करतांना मन एकाग्र होत नाही; पण टी.व्ही. पहातांना होते. कारण उघड आहे. नामाची आवड नाही. आपण नकळत स्वत:ला फसवतो. पैसा हे साधन आहे हे विसरून त्यालाच साध्य मानतो. वास्तविक, जीवनाचे ध्येय काय, मी का जगतो इत्यादी आत्मानात्मविवेक केला पाहिजे. यालाच शुभेच्छा म्हणतात. आपण नाम घेतो. ध्येयाचीही अंधूक कल्पना असते. पण ते साध्य करण्यासाठी लागणारा निश्चय होत नाही. परमात्मा निश्चल पण चेतन आहे. त्याचा निश्चय करायचा आहे. **Resolution** (निग्रह) **Conviction** (दृढ विश्वास) आणि **Determination** (निश्चय) ह्या पायऱ्यांनी आपल्याला जायचे आहे.

## ।१७१। (३ डिसेंबर १९९०)

आज श्रीमहाराजांच्या पुण्यतिथी उत्सवाचा पहिला दिवस. सकाळी ९ ते १० पू. बाबांचे निरूपण झाले. त्यानंतर आम्ही काहीजण त्यांच्या खोलीत गेलो होतो. आज पू. बाबांनी तुकाराम महाराजांच्या नाटाच्या अभंगांपैकी 'नमो भाई नमो। उदासीना नमो।।' हा अभंग निरूपणासाठी घेतला होता. या अभंगात देहाचा भाव गेलेल्याला नमस्कार आहे. पू. बाबा म्हणाले की त्यासंबंधी सांगताना त्यांना भरून आले. तुकाराम महाराजांचा 'प्रेतरूप झाला शरीराचा भाव। लक्षियेला ठाव स्मशानीचा।।' हा अभंग एकदम आठवला.

**साधक प** : आत्मज्ञानानंतर रमणमहर्षींची स्थिती अशीच झाली होती.

**साधक क** : गीतेत सांगितलेल्या दैवी संपत्तीचेच हे वर्णन आहे असे वाटते.

संध्याकाळी पुन्हा पू. बाबांकडे गेलो तेव्हा उदासीन झालेल्याची देहबुद्धी किती गेलेली असते; तो देहाकडे कसा साक्षित्वाने पहातो याचे वर्णन नाथभागवताच्या तेराव्या अध्यायात केलेले आहे, ते पू. बाबांनी वाचून दाखविले.

**नाथ म्हणतात** : एवं पावोनि माझ्या स्वरूपासी। स्वानंदपूर्ण साधकासी। सुखें सुखरूपंता जाहली त्यासी। निजदेहासी विसरोनी।।५९५।। मग उठलें कीं बसलें। चालतें कीं राहिलें। जागतें कीं निजलें। हें स्मरण ठेलें देहाचें।।९६।। हें धालें कीं भुकेलें। हिंवलें कीं तापलें। प्यालें कीं तान्हलें। राहिलें उगलें स्मरेना

तो॥९७॥ हें येथें की तेथें। मुकें कीं बोलतें। होतें की नव्हतें। स्मरणसहितें स्मरेना तो॥९८॥ हें ओंवळें कीं सोंवळें। चोखट कीं मैळें। डोळस कीं आंधळें। अंगीं पांगुळलें स्मरेना तो॥९९॥ हें आलें कीं गेलें। होतें कीं केलें। जाहलें कीं मेलें। तटस्थ राहिलें स्मरेना तो॥६००॥ हें बाळ कीं प्रौढ। मोठें कीं रोड। हळू कीं जड। कांहीं सदृढ स्मरेना तो॥ १ ॥ हें खाटें कीं भुयीं। ठायीं कीं कुठायीं। आहे कीं नाहीं। हेंही पाहीं स्मरेना तो॥ २ ॥ हे मंत्रीं कीं तंत्रीं। तीर्थीं कीं क्षेत्रीं। विष्ठीं कीं मूत्रीं। आहे पवित्रीं स्मरेना तो॥ ३ ॥ जनीं कीं वनीं। अथवा निरंजनीं। जपीं कीं ध्यानीं। हेंही स्मरेना तो॥४॥ हें सुजनीं कीं दुर्जनीं। बंदीं की विमानीं। मंदिरीं कीं मसणीं। पाहती कोणी स्मरेना तो॥ ५॥ हें गजीं कीं तुरगीं। कीं अंगनासंभोगीं। खरीं कीं उरगीं। अंगींच्या अंगीं स्मरेना तो॥ ६ ॥ हें काशीं कीं कैकटीं। नरकीं कीं वैकुंठीं। घरीं कीं कपाटीं। राहिलें नेहटीं स्मरेना तो॥७॥ हें पूजिलें कीं गांजिलें। धरिलें कीं मारिलें। देहाचें येकही केलें। अथवा काय झालें स्मरेना तो॥८॥ मी शेषशयनावरी। कीं मातंगाच्या घरीं। कीं बैसलों शूळावरी। हेंही न स्मरी सहसा तो॥ ९॥ ऐशी ज्ञात्याची निरभिमानता। माझेनि न सांगवे तत्त्वतां। जे पावले माझी सायुज्यता। त्यांची कथा न बोलवे॥ ६१०॥

(-एकनाथी भागवत अध्याय १३ ओव्या ५९५-६१०)

नंतर पू. बाबा म्हणाले की ह्या ओव्यांत वर्णन केलेली दशा येणे अवघड आहे, पण ती येते हे निश्चित. आपल्याला इतके जमणार नाही, बालभाव येणेही शक्य नाही. पण परमार्थ समजून केला पाहिजे. नाहीतर फसगत होण्याची शक्यता असते. साक्षित्वाचा अभ्यास केला पाहिजे. साक्षित्व येणे आवश्यक आहे. ते परमार्थाचे मर्म आहे. एक तर 'त्याची' इच्छा म्हणून वागावे. आपली इच्छा बाजूला ठेवून भक्ती करावी किंवा भक्ती, साक्षीभाव इत्यादी बाजूला सारून हा निसर्गाचा धर्मच आहे, जे जन्मते त्याचा नाश होणारच, म्हातारपण त्रास देणारच हे विचाराने पटवून घ्यावे म्हणजे त्रास झाला तरी त्याचे दु:ख होणार नाही. हा दुसरा मार्ग अवघड आहे. त्यापेक्षा 'त्याची' इच्छा अशी शिकवण देत राहावे. श्री. अण्णासाहेब मनोहर यांना अर्धांगाचा झटका येऊन गेला त्याबद्दल मी त्यांना विचारले होते. तेव्हां ते म्हणाले की, 'त्यांच्या' इच्छेनेच सर्व काही होते तेव्हां वाईट कशाला वाटून घ्यावयाचे ?

श्रीमहाराजांसारख्या सत्पुरुषांजवळच खरे निस्वार्थी प्रेम आढळते. बरे आठवले! श्रीमहाराज काही मंडळींबरोबर घारापुरीला गेले होते. तेथे मी त्यांना विचारले की, तुम्ही येथे देव वगैरे काही नसतांना कसे आलात? तेव्हां ते म्हणाले, असं कां म्हणता? माझी माणसं जिथं असतील तिथं त्यांच्यामधे असणं मला आवडतं. सत्पुरुषांची लीनता पाहिली की आपला अहंकार विरघळू लागतो. ज्ञानेश्वर महाराजांनी लीनतेचं फार सुंदर वर्णन केलं आहे. 'कां फळलिया तरूची शाखा। सहजें भूमीसी उतरे देखा।'

इथं आपण सर्व मंडळी जमतो. ना नात्याची, ना गोताची पण तरी किती प्रेमानं सगळीजणं राहतात. आज गेली पन्नास वर्षं मी येथे येतो आहे पण ते प्रेम कमी होत नाही. हे प्रेम लक्षात घेऊन आपण समजून परमार्थ केला पाहिजे, इथून परत जातांना हे प्रेम घरी न्या.

## |१७२| (४ डिसेंबर १९९०)

**पू. बाबा :** प्रश्न नेहमीचाच आहे. तो कसा सोडवावयाचा ते सांगा. आपले साधन का होत नाही? मला वाटते की आपले ध्येय निश्चित होत नाही, आणि त्यामुळे इतर अनेक गोष्टींबरोबरच भगवंतही असावा असे वाटते. श्रीमहाराज म्हणत की, प्रापंचिक माणूस ज्वालामुखीच्या तोंडावर बसलेला असतो पण तरी तो निर्धास्त असतो. साधन होण्यासाठी सत्संगती उपयोगी पडते. सद्ग्रंथ वाचनाचाही फायदा होईल पण वाचतांना आपण त्या पातळीवर गेले पाहिजे. केवळ एक करमणूक होता कामा नये. तिसरी शक्यता म्हणजे नामाची संगत झाली पाहिजे. जेथे नाम तेथे मी असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. तेव्हां नाम घेतांना त्यांची आठवण ठेवावी.

**साधक प :** आठवण स्मृतीतून येते. त्यामुळे श्रीमहाराज होते असे वाटते. त्याऐवजी ते आत्तादेखील आहेत असे वाटले पाहिजे.

**पू. बाबा :** गेल्या दोन दिवसात मला भेटलेल्यांपैकी निदान शंभरजणांनी सांगितले की इच्छा असूनही मनासारखे नामस्मरण होत नाही. ते अतिशय प्रामाणिकपणे प्रयत्न करतात. एकंदरीत ही सर्वांचीच अडचण आहे. मनासारखे नाम होत नाही याचे कारण काय असावे? नाम घेतांना विवेक करून आपल्या आड काय येते ते दूर करायचा प्रयत्न केला पाहिजे. प्रत्येकाचे कारण वेगळे असेल, पण काहीतरी आड येते हे नक्की. वासना क्षीण

होणे आवश्यक आहे. त्या क्षीण झाल्या तरच त्यांच्याकडे धावणारी शक्ती नामाकडे वळेल. विवेक आणि वैराग्य यांच्याशिवाय परमार्थ नाही. वैराग्य म्हणजे घर सोडायला नको; पण आता आहे ते पुरे असे वाटावे.

बाकी काहीही न करतां, अगदी ध्येयाचा देखील विचार न करतां नुसते अखंड नामस्मरण केले तरी काम होईल.

**।१७३।** (५ डिसेंबर १९९०)

आज सकाळी ८ वाजता निरूपणात पू. बाबांनी भाव शुद्ध असला तर दगडाच्या मूर्तीतदेखील देवत्व कसे येते, त्याचप्रमाणे मानसपूजा करताना किंवा अन्य वेळी आपण जी 'विचारचित्रे (Thought Forms) निर्माण करतो. त्यांच्या प्रक्षेपणाने जड मूर्तीमधे देखील सूक्ष्म देह कसा निर्माण होतो ते काही उदाहरणे देऊन सांगितले होते.

निरूपणानंतर पू. बाबांकडे गेलो तेव्हां याच विषयावर त्यांनी सविस्तर चर्चा केली. सगुण मूर्तीचे भाव ज्यांना जाणवले अशा आणखी काहीजणांची माहिती त्यांनी सांगितली.

श्री. भीमराव गाडगुळी एकदा मालाडला गेले त्यावेळी श्रीमहाराजांच्या तसबिरीजवळ नेहमी असणारा बल्ब जळला म्हणून घरात होता तो शंभर वॉटचा बल्ब लावलेला होता. श्री. भीमराव म्हणाले की हा बदला, श्रीमहाराजांना उकडते आहे.

एक उत्तर भारतातील गृहस्थ मालाडला गेले होते. श्रीमहाराजांच्या तेथे असलेल्या तसबिरीत श्रीमहाराजांच्या चेहेऱ्याभोवती त्यांना पांढरे तेजोवलय दिसले. श्रीमहाराजांना नंतर हे सांगितल्यावर ते म्हणाले, नुसते पांढरे नाही, त्यात निळा प्रकाशही आहे. त्यांचे साधन कमी असल्यामुळे त्यांना फक्त पांढरा प्रकाश दिसला.

पू. बाबा पुढे सांगू लागले. ते म्हणाले, माझा एक विद्यार्थी पॉंडिचरीला गेला होता, श्रीअरविंदांच्या समाधीजवळून परतला आणि तो श्री. पंडितांना म्हणाला की मला तेथे प्रखर सोनेरी प्रकाश दिसतो आहे. श्री. पंडित म्हणाले की तो श्रीअरविंदांचा प्रकाश आहे. नंतर तो मदरना भेटला तेव्हां त्यांना काही विचारण्यापूर्वीच त्या म्हणाल्या, Yes, it is golden hue. तो 'ॐ नमः शिवाय।' असा जप करीत असे. तोच जप चालू ठेवा असे त्या म्हणाल्या.

पू. बाबा म्हणाले, एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो, आपण तात्यासाहेबांच्या मुखाने बोलता, तेव्हा त्यांनी पूर्वी तुमची सेवा केली असली पाहिजे. यावर श्रीमहाराज म्हणाले, होय, असलीच पाहिजे. मी विचारले की मी आपली सेवा कशी करू? श्रीमहाराज म्हणाले, नाम घ्या; तीच माझी सेवा आहे. तसेच एकदा श्रीमहाराजांना विचारले की श्री. गोविंद अनंत कुलकर्णी यांचे आपण काय नांव ठेवले? अनंतसागर की आनंदसागर? श्रीमहाराज म्हणाले, आनंदसागर. पुढे मी विचारले, त्यांच्यावर आपण कशी कृपा केली? श्रीमहाराज म्हणाले, ते शरण आले म्हणून! शरणागती म्हणजे काय ते मात्र तेव्हां विचारायचे राहून गेले.

बोलणे चालू असतानाच डॉ. आप्पासाहेब आठवले आले. त्यांनी रमणमहर्षींच्या व श्री. भाऊराव आठवले यांच्या एकदोन गोष्टी सांगितल्या. त्या ऐकल्यावर पू. बाबा म्हणाले, थोरामोठ्यांच्या गोष्टी पुष्कळ झाल्या. आता आपण सर्व काही सोडून नामामागे लागले पाहिजे. वाचनदेखील कशाकरिता करायचे? उरलेले आयुष्य श्री. भाऊसाहेबांप्रमाणे (केतकर) श्रीमहाराजांना आवडते म्हणून नाम घेतो असे ठरवून नामस्मरणात घालवावे.

संध्याकाळी साडेसात वाजता पू. बाबांकडे गेलो तेव्हां ते म्हणाले, पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांनी विचार कसा करावयाचा याची जी एक निश्चित पद्धती किंवा शिस्त ठरवून दिली आहे त्याचे आपण अनुकरण केले पाहिजे. भलेही एखाद्याचे विचार आपल्याला न पटोत, पण त्याला काय म्हणावयाचे आहे ते आधी समजून घेतले पाहिजे. सार्त्र ह्या ईश्वर न मानणाऱ्या तत्त्वज्ञान्याचे विचार समजून घेण्यास मला या पद्धतीचा फार उपयोग झाला.

नंतर श्रद्धा म्हणजे काय या विषयावर चर्चा झाली. प्रथम विश्वास वाटेल. पुढे त्याचे श्रद्धेत रूपांतर होईल. श्रद्धा दृढ झाली की निष्ठा निर्माण होईल. श्रद्धेत भरंवसा अंतर्भूत आहे. श्रद्धा भंगते का? विश्वास उडेल पण श्रद्धा अयोग्य ठिकाणी ठेवली असा प्रत्यय येऊ शकेल.

आज असारावर, दृश्यावर जी श्रद्धा आहे ती जाऊन नामावर श्रद्धा बसली पाहिजे. अशी श्रद्धा निर्माण झाली आणि साधन चालू राहिले म्हणजे श्रद्धेचे निष्ठेत रूपांतर होईल. यासाठी समजून नाम घेतले पाहिजे. एकतर, मी कोण, नाम कां घेतो याचा शोध घेऊन निष्ठा बळकट करावी नाहीतर भाऊसाहेबांप्रमाणे विचाराची दारे बंद करून सर्व काही श्रीमहाराजांवर सोपवावे.

## ।१७४। (६ डिसेंबर १९९०)

आज सकाळच्या निरूपणात ज्ञानेश्वर महाराजांचा 'सर्वव्यापक सर्वदेहीं आहे।' हा अभंग पू. बाबांनी घेतला होता. 'नामाचे साधन जिव्हे लावी बाण। तया अनुदिन जवळी असे॥' असा एक चरण या अभंगात आहे त्याचा उल्लेख करून संध्याकाळी पू. बाबांनी विचारले, नाम जिवंत पाहिजे असे आपण म्हणतो. आपली जिवंतपणाची जाणीव कशात आहे?

**साधक क** : माझे जिवंतपण मला येणाऱ्या अनुभवांवर आधारलेले आहे.

**पू. बाबा** : मी यावर खूप विचार केला. प्राण आहे तोपर्यंत जिवंतपण आहे. श्वासोच्छ्वास करता आला नाही तर जीव कासावीस होतो. नामस्मरण झाले नाही तर जीव कासावीस झाला, व्याकूळ झाला तर ते नाम जिवंत नाम म्हणता येईल.

ही व्याकुळता कशी येईल? त्याला मुख्यत: दोन बाजू आहेत. १) ते जीवनाचे सर्वोच्च मूल्य झाले पाहिजे. २) मरणाचे सतत स्मरण राहून, आता वेळ कमी राहिला, घाई केली पाहिजे असा अभ्यास केला पाहिजे. या दोहोंपैकी कशावर भर द्यायचा ते ज्याच्या त्याच्या मनोरचनेवर अवलंबून राहील.

**साधक घ** : व्याकुळता हा ज्ञानाचा अरुणोदय आहे असे श्रीरामकृष्ण म्हणत.

**साधक क** : आज आपल्याला नामाची गरज वाटत नाही. चालले आहे ते ठीक चालले आहे असे वाटते. व्याकुळता येण्यासाठी आज उठता-बसता, मिळेल तितका वेळ नाम घेण्याचा अभ्यासच केला पाहिजे. मोकळ्या वेळात नाम घ्यायचे विसरले तर, अरेरे! आपण चुकलो अशी टोचणी लागली पाहिजे.

**पू. बाबा** : गुरु देहात असतांना त्यांची सेवा करता येते. आपण चुकतो तेव्हां ते वेळोवेळी मार्गदर्शन करतात. सत्संगतीतही हा फायदा होतो. संत वागतात कसे, ते साधन कसे करतात ते पहायला मिळते, त्यामुळे साधनाची घसरणारी उत्कटता पुन्हा वाढविता येते. पण गुरु देहात नसतात तेव्हां त्यांची सेवा कशी करायची? त्यांना जे आवडते ते करणे हीच त्यांची सेवा होय. श्रीमहाराजांना नामस्मरण आवडत असे म्हणून अखंड नामस्मरण करणे हीच त्यांची सेवा. नाम एकसारखे घेतले, माझ्या गुरूंना आवडते म्हणून घेतले तर नामाचे प्रेम येईल. नाम घेतांना उत्साह वाटू लागला की समजावे की गाडी बरोबर चालली आहे.

## ।१७५। (७ डिसेंबर १९९०)

सकाळच्या निरूपणात सुरुवातीला पू. बाबांनी जिवंत नाम म्हणजे काय याबद्दल सांगितले. प्राण ही आपल्या जिवंतपणाची खूण आहे. श्वासोच्छ्वास करतांना त्रास होऊ लागला तर प्राण कासावीस होतात; तसे नाम राहिले तर जीव कासावीस झाला पाहिजे. नंतर याच विषयाला धरून तुकाराम महाराजांच्या 'कईं ऐसी दशा येईल माझ्या अंगा।' या अभंगावर त्यांनी निरूपण केले.

संध्याकाळच्या चर्चेत धुळ्याच्या कै. शंकरराव देवांचा एक श्लोक एका साधकांनी सांगितला तेव्हां पू. बाबांनी त्यांच्यासंबंधी एक जुनी हकिगत सांगितली. अठराव्या शतकात दक्षिणेत एक मौनी रामदासी होऊन गेले आणि त्यांची समाधी तंजावरकडे आहे अशी माहिती देवांना मिळाली होती म्हणून ते तिकडे गेले होते. ते रमणमहर्षींकडे गेले तेव्हां रमणांनी त्यांना सांगितले की एक मौनी अरुणाचलावर होते, दुसरे तुमच्यासमोर आहेत. तिसरे कोणी मौनी ह्या भागात झाल्याचे ऐकिवात नाही. तथापि मिळालेल्या पत्त्यावर जाऊन चौकशी करावयाचे देवांनी ठरविले. रामदासांचे काही संस्कृत वाङ्मय आहे काय अशी रमणमहर्षींनी चौकशी केली. देवांच्या जवळ त्यावेळी समर्थांच्या मनाच्या श्लोकांचे भाषांतर होते ते त्यांनी रमणांना वाचावयास दिले. रमणांनी ते वाचले आणि शंकरराव परत आल्यावर त्यांनी समर्थांचा उपदेश अतिशय आवडल्याचे सांगून शंकररावांना 'देहेबुद्धि हे ज्ञानबोधें त्यजावी। विवेकें तये वस्तुची भेटि घ्यावी। तदाकार हे वृत्ति नाहीं स्वभावें। म्हणोनी सदा तेंचि शोधीत जावें।। या श्लोकावर चिंतन करून तो आचरणात आणावा असे सुचविले. पू. बाबा म्हणाले, परमार्थाचा पुस्तकी अभ्यास सोपा आहे. तो आचरणात आणणे कठीण आहे. शंकरराव देवांनी समर्थ वाङ्मयाच्या संशोधनाचे प्रचंड कार्य केले पण पुढे त्यांचा मोठा मुलगा अकाली वारला तेव्हां त्यांची काही काळ भ्रमिष्ट अवस्था झाली होती!

नंतर पू. बाबांनी तुकाराम महाराजांच्या 'जाणोनि नेणतें करी माझें मन। तुझी प्रेमखूण देऊनियां।।' या अभंगावर चर्चा सुरू केली.

**पू. बाबा :** जाणोनि नेणतें म्हणजे तुकाराम महाराजांना नेमके काय म्हणायचे आहे?

**साधक ग :** मी तुझ्यावर प्रेम करतो आहे हे जाणून मला नेणते कर असे म्हणायचे असावे.

**पू. बाबा :** येथे प्रेमखूण दाखव म्हटले आहे. प्रेमखूण म्हणजे प्रेमाची खूण असाच अर्थ आहे.

**अर्थ स्पष्ट व्हावा म्हणून पू. बाबांनी पूर्ण अभंग वाचून दाखवला.**

"जाणोनि नेणतें करी माझें मन। तुझी प्रेमखूण देऊनिया (दाऊनिया)॥ १॥

मग मी व्यवहारी असोनी वर्तत। जेवीं जळाआंत पद्मपत्र॥ २॥

ऐकोनि नाईकें निंदास्तुती कानीं। जैसा का उन्मनीं योगिराज॥ ३॥

देखोनि न देखे प्रपंच हा दृष्टी। स्वप्नींचियां सृष्टी चेइल्या जेवीं॥ ४॥

तुका म्हणे ऐसे जालियावांचून। करणें तो शीण वाटतसे॥ ५॥

**साधक क :** मला जाणता असून नेणता कर. पाहूनही पहात नाही, ऐकूनही ऐकत नाही ही स्थिती म्हणजे ज्ञान्याचीच लक्षणे आहेत.

**पू. बाबा :** पण प्रेमखूण दाऊनिया म्हणजे काय? प्रेमाची लक्षणे काय आहेत?

**साधक ग :** तुकाराम महाराजांनीच म्हटले आहे 'प्रेम न ये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे॥'

**पू. बाबा :** हे खरे आहे. नारदभक्तिसूत्रातही प्रेम हे मूकास्वादनवत् म्हटले आहे. समर्थांनीही 'मुक्यानें गूळ खादला। गोडी न ये सांगायाला।'म्हटले आहे. तरीपण आपल्याला काही थोडी लक्षणे तरी सांगता येतील की नाही? प्रेमात आपलेपणा असतो. देह आपला म्हणून देहावर प्रेम.

**साधक प :** प्रेम केवळ सजीवावर करता येते. आपण पैशावर प्रेम आहे म्हणतो पण तो लोभ किंवा आसक्ती असते.

**साधक ग :** सजीवावर प्रेम असते आणि ज्याच्यावर प्रेम असते त्याच्याकडून त्या प्रेमाला प्रतिसाद (response) मिळतो. तुकाराम महाराजांचा पांडुरंग म्हणजे दगडाची मूर्ती नाही. तो सजीव आहे आणि त्याच्यावर त्यांचे प्रेम आहे. म्हणून ते म्हणतात, पांडुरंगा, माझे तुझ्यावर प्रेम आहे पण तूही माझ्यावर प्रेम करतोस याची काहीतरी खूण मला मिळू दे म्हणजे ह्या संसाराचे सत्यत्व नाहीसे होईल.

**पू. बाबा :** हे म्हणणे बरोबर वाटते.

**श्रोत्यांपैकी एकजण :** आपणच श्रीअरविंदांचे वचन सांगितले होते की When you accept God, He has already accepted you.

**पू. बाबा :** होय, ही त्याची बाजू झाली; पण ते आपल्याला कळले पाहिजे ना!

पू. बाबा पुढे म्हणाले, संसाराचा खरेपणा एकदा का नाहीसा झाला की मी संसारात असून नसल्यासारखा होईन. आता प्रश्न येतो की प्रेमखूण काय असावी? ती कशी ओळखायची?

**साधक ग** : तुकाराम महाराजांनीच ती दुसऱ्या एका अभंगात सांगितली आहे. 'बोलों जातां बरळ करिशी तें नीट' असे ते म्हणतात तेव्हां पांडुरंगाचे त्यांच्यावरचे प्रेमच त्यातून व्यक्त होते. ही प्रेमाची प्रचीतीच आहे. त्यांना हे समजले आहे.

**पू. बाबा** : पुष्कळांना अशी काही ना काही प्रचीती येते पण नंतर तो प्रेमभाव टिकत का नाही? कालच एक बाई आल्या होत्या; त्यांनी सांगितले की त्या बदरीकेदारला घोड्यावरून जात होत्या. जवळ बरेच पैसे होते. घोडा उधळेल काय? घोडेवाला आपल्याला लुबाडून खड्डयात ढकलून देईल काय? अशी त्यांना भीती वाटू लागली म्हणून त्यांनी श्रीमहाराजांची प्रार्थना सुरू केली आणि, त्या म्हणाल्या की, परत येईपर्यंत त्यांच्याभोवती एक संरक्षक कवच आहे असे त्यांना जाणवले. पण परत आल्यानंतर श्रीमहाराज माझे रक्षणकर्ते आहेत हा भाव राहिला नाही. त्याची हवा झाली!

**साधक क** : प्रचीतीच्या बाबतीत बाह्य प्रचीती आणि अंतर्प्रचीती असा काही फरक आहे काय? साधक प म्हणतात की ज्या प्रचीतीमुळे अहंकार कमी होतो तीच अंतर्प्रचीती.

**पू. बाबा** : हे तर आहेच. शिवाय ज्या प्रचीतीमुळे आपल्या अंत:करणात कायमचा बदल होईल आणि वागणे बाहेरून पूर्वीसारखेच राहिले तरी मन वरच्या अवस्थेत राहील तीच अंतर्प्रचीती म्हणता येईल. साधनाचा किंवा कोणत्याही पारमार्थिक अनुभवाचा अहंकार झाला तर मन वरच्या पातळीवर जाणारच नाहीं आणि अशा प्रचीतीला अंतर्प्रचीती म्हणता येणार नाही; बाह्य अनुभव येवढेच फार तर म्हणता येईल. तुकाराम महाराजांना देवाकडून असा प्रतिसाद पाहिजे की मग ते संसारात असून नसल्यासारखे होतील. अशा पुरुषाला आत्मवत् सर्वभूतेषु अशी प्रचीती येते. इतरांच्या डोळ्यांनी तो पहातो, इतरांच्या कानांनी ऐकतो इत्यादी.

**साधक आ** : श्रीरामकृष्णांना शेवटच्या आजारात जेव्हां खाता येईना आणि शिष्यांच्या आग्रहामुळे त्याबद्दल त्यांनी आईला (कालीमातेला) विचारले तेव्हां तिनेही इतक्या सगळ्या मुखांनी कोण खाते आहे, तूच ना? असे त्यांना विचारले.

साधनाबाबत अखंडानंदांनी उडियाबाबांचे एक अवतरण दिले आहे त्याचा पू. बाबांनी चर्चेच्या ओघात उल्लेख केला. त्यांनी म्हटले आहे की साधन थांबणे म्हणजे विधवा होण्यासारखे आहे.

## ।१७६। (८ डिसेंबर १९९०)

आज सकाळी पू. बाबांनी श्रीतुकाराम महाराजांच्या एका अभंगावर निरूपण केले आणि सकाळी निरूपणानंतर आणि संध्याकाळी साडेसात वाजता त्यांच्याकडे गेलो तेव्हां त्या अभंगावरच चर्चा केली. विशेषत: अभिमानाचे स्वरूप आणि तो घालवण्याकरिता काय करावे ते सांगितले. निरूपणासाठी घेतलेला अभंग असा होता :

इतुलें करीं देवा ऐकें हें वचन। समूळ अभिमान जाळीं माझा॥ १ ॥
इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी। सर्व समदृष्टी तुज देखें॥ २ ॥
इतुलें करीं देवा विनवितो तुज। संतचरणरज वंदीं माथां॥ ३ ॥
इतुलें करीं देवा ऐकें हे मात। हृदयीं पंढरीनाथा दिवसरात्रीं॥ ४ ॥
भलतीया भावें तारी पंढरीनाथा। तुका म्हणे आतां शरण आलों॥ ५ ॥

सकाळी निरूपणानंतर पू. बाबांच्याकडे गेलो तेव्हां साधक प म्हणाले, अभिमानाचा परिणाम काय होतो यावरून अभिमान म्हणजे काय ते समजून घेतले पाहिजे.

**साधक ग :** अभिमान आणि अहंकार यात फरक आहे. आपण अहंकार नको असे म्हणतो पण काही बाबतीत तरी अभिमान हवा असे म्हणतो. उदाहरणार्थ, देशाभिमान, गुरूबद्दलचा अभिमान. पण अहंकार - अगदी साधनाचा देखील - नसावा म्हणतो.

**पू. बाबा :** अहंकार हे अभिमानाचे एक अंग म्हणता येईल. अभिमान जास्त व्यापक आहे.

संध्याकाळी याच विषयावर बोलतांना पू. बाबा म्हणाले की अभिमानात तीन गोष्टींचा अंतर्भाव होतो. १) मी देह आहे हा अभिमान. २) मी सुखदु:ख भोगतो. मला आनंद पाहिजे. आहे ती परिस्थिती बदलून मी सुख मिळवेन. आणि ३) मला कळते. या तीन्हींपैकी मला कळते हा अभिमान जास्त खोल आहे. मी देह आहे असे देहाला खरेपण वाटते आणि त्यामुळे खरे सुख देखील देहातूनच मिळेल असे वाटते. मला पूर्ण कळले नसेल पण थोडे तरी कळते असे प्रत्येकाला वाटते आणि त्यामुळे मी परिस्थिती बदलेन असा विश्वास वाटतो.

**साधक क** : हेच असे सांगता येईल की अभिमानाची तीन अंगे आहेत १) मी कर्ता आहे २) मी भोक्ता आहे आणि ३) मी ज्ञाता आहे. कर्ता म्हणून मी प्रयत्न करतो, भोक्ता म्हणून सुखदु:ख भोगतो आणि ज्ञाता म्हणून मान-अपमान किंवा मी मोठा, मी लहान इत्यादी कल्पना करतो.

**साधक ग** : अभिमानामध्ये मान म्हणजे मोजमाप - माझे स्वत:बद्दलचे मोजमाप आहे. मी मोठा आहे, शहाणा आहे इत्यादी कल्पना आहेत.

**पू. बाबा** : बरोबर याच्या उलट अमान आहे. मी कोणी नाहीच असा तेथे भाव आहे. अमानित्वाबद्दल सांगतांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात 'वाचस्पतीचेनि पाडें। सर्वज्ञता तरी जोडे। परि वेडिवेमाजि दडे। महिमे भेणें॥ १३.१९०॥ अमानित्व आल्याखेरीज शरणागतीचा भाव येणार नाही. भाऊसाहेबांची खरी श्रद्धा आणि शरणागती होती. गोंदवल्याला राहायला गेल्यानंतर ते विषमज्वराने आजारी होते तेव्हांची गोष्ट. राममंदिरातील श्रीमहाराजांच्या सिंहासनाच्या मागे त्यांचे अंथरूण घातलेले होते. औषध म्हणून श्रीमहाराज रामाचे तीर्थ देत आणि शक्ती राहावी म्हणून दूधभात खाऊ घालत. पुढे दहा-बारा दिवसांनी त्यांना बरे वाटू लागल्यावर श्रीमहाराज म्हणाले, आजार औषधाशिवाय बरा होतो. प्रारब्धात जगायचे असेल तर आजारी माणूस बरा होणारच. दूधभात देऊन आपण त्याची शक्ती टिकवायची!

पू. बाबा पुढे म्हणाले, चार पुस्तकांचा अभ्यास केला तर वेदान्त समजतो; पण अभिमान जाण्यासाठी आपण काय करायचे हा खरा प्रश्न आहे. मनासारखे नामस्मरण होत नाही अशी प्रत्येकाचीच तक्रार आहे. आपली शक्ती कमी पडते हे याचे खरे कारण आहे. आज तरी आपल्याला काहीतरी उपाधी लावल्याखेरीज नाम घेता येणार नाही. काही नाही तरी हट्टी पोरासारखे श्रीमहाराजांजवळ रडावे, प्रार्थना करावी. पण हा भाव कसा आणायचा?

**साधक** : समर्थांच्या करुणाष्टकांसारखे काही श्लोक वाचून जपाला बसावे. अर्थात हे यांत्रिक होत नाही ना हे पहावे लागेल.

**साधक ग** : अशा प्रकारे श्लोक वाचतांना भाव येण्याऐवजी केवळ त्या श्लोकांच्या अर्थावरच चिंतन होण्याची शक्यता आहे. तसे झाले तर भाव निर्माण होण्याऐवजी केवळ बुद्धीला नवे खाद्य दिल्यासारखे होईल.

**पू. बाबा** : त्यापेक्षा भाऊसाहेबांसारखे करावे. श्रीमहाराजांना आवडते म्हणून मी नाम घेतो हा भाव किती छान आहे!

## ।१७७। (९ डिसेंबर १९९०)

आज उत्सवाचा सातवा दिवस. सकाळी पू. बाबांनी ज्ञानेश्वर महाराजांच्या 'इवलेसें रोप लावियेलें द्वारीं।' या सुप्रसिद्ध अभंगावर निरूपण केले. त्यानंतर आमच्याशी चर्चा करतांना ते म्हणाले, द्वारीं म्हणजे इंद्रियांपाशी माझ्या सद्गुरूंनी नामाचे लहानसे रोप लावले आणि ती मोगऱ्याची वेल इतकी झपाट्याने वाढत गेली की आकाशापर्यंत पोचली आणि मग मोगरा फुलला. अनुभवच अनुभव येऊ लागले. शेवटी त्या अनुभवांचे मनन करून - त्यांचा सुंदर शेला गुंफून मी तो विठ्ठलालाच पांघुरविला. अनुभव प्रथम देहाकाशात, नंतर चित्ताकाशात आणि शेवटी चिदाकाशात येतात. साधकाच्या देहात अनुभव येऊन त्याची खूण पटली तर काय होईल?

**साधक ग** : असा माणूस एकदम स्वस्थ होईल.

**साधक प** : तो पुढचे अनुभव घ्यायला आतून मोकळा होईल.

**पू. बाबा** : होय, असेच होईल. श्रीरामकृष्णांनी त्या कोष्ट्याची हकिगत सांगितली आहे. त्याला शिपायांनी लॉकअपमधे टाकले तेव्हां त्याला काय वाटले असेल?

**साधक प** : त्यातही त्याला रामाची इच्छा दिसून तो मजेतच राहिला असेल. काय गंमत आहे असे त्याला कौतुकच वाटले असेल. देहाला त्रास होत असतांनाही मनाने तो त्या त्रासाच्या वरच राहिला असेल. नाथांनी म्हटल्याप्रमाणे 'जैसी स्थिती आहे तैशापरी राहे। कौतुक तू पाहें संचिताचे।' असाच तो असणार.

**पू. बाबा** : साधकाची विचाराची भूमिका अशी पाहिजे की काहीही होवो त्याचा साधनावर प्रतिकूल परिणाम होऊ देऊ नये. व्यवहारातील अडचणी व्यवहाराच्या मार्गानेच सोडवल्या पाहिजेत. तथापि परमार्थात, योग्य व्हॅल्युएशन करून साधन करतांना, व्यवहारातील मार्ग साधनाच्या आड येता कामा नयेत.

**साधक ब** : साधक सिन्सिअर आहे, प्रयत्न करतो आहे पण प्रगती होत नाही असे त्याला वाटते आहे. अशा वेळी काय करावे?

**पू. बाबा** : अशी वेळ येते तेव्हां अदृश्य मदतनीस (invisible helpers) असतात. त्यांची योजना असते. ते येऊन तुम्हाला मदत करतात. याबाबतीत थिऑसफिस्टांनी बरोबर सांगितले आहे. कृष्णमूर्तींना अशी मदत झाली. साधकाची तळमळ पाहून सत्पुरुषही त्याला योग्य त्या

वेळी मार्गदर्शन करतात. सत्संगती मिळते. श्रीरामकृष्णांना त्या त्या साधनांच्या वेळी अशी मदत मिळाली. सर्वसामान्य साधकाला देखील अशी मदत मिळतेच. पण तशी तीव्र तळमळ निर्माण होत नाही ही खरी अडचण आहे.

## ।१७८। (१० डिसेंबर १९९०)

मार्गशीर्ष वद्य नवमी शके १९१२. आज उत्सवाचा आठवा दिवस. सकाळी पू. बाबांनी 'रात्रींदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग' या तुकाराम महाराजांच्या अभंगावर निरूपण केले. नंतर सकाळी खोलीत बोलतांना ते म्हणाले, तुकाराम महाराजांचा हा अभंग आणि ज्ञानेश्वर महाराजांनी अठराव्या अध्यायात केलेले वर्णन यात किती सारखेपणा आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी वैराग्याचे चिलखत म्हटले आहे आणि साधनाला हत्यार म्हटले आहे.

**साधक ग** : नाम हेच हत्यार आहे आणि ते अतिशय प्रभावी आहे. एका नामाच्या बळाने सर्वांचा पराभव केला असे तुकाराम महाराज म्हणतात. नाम हे एकच साधन अशी दृढ श्रद्धा पाहिजे.

**साधक प** : त्याचबरोबर वैराग्याचे चिलखतही महत्त्वाचे आहे. नाम घेतांना कोणते विचार त्रास देतात हे पाहिले म्हणजे कोणते विकार त्रास देतात हे लक्षात येईल.

**पू. बाबा** : स्वस्थ बसून थोडा विचार केला तरी कोणते विकार त्रास देतात हे साधकाच्या लक्षात येईल.

**साधक प** : साधन करतांना क्षत्रिय वृत्ती पाहिजे. प्रसंगाची वाट पाहात न थांबता कोणते विकार त्रास देतात ते आधीच पहावे. युद्ध सुरू होण्यापूर्वी शत्रू कोण मित्र कोण हे समजले पाहिजे. विकारांकडे नुसते पाहिले - without comment अलिप्तपणे पहाता आले तर ते नि:शक्त होतील.

**पू. बाबा** : याकरता स्वत:कडे थोडे तटस्थपणे objectively पहाता आले पाहिजे. यातूनच साक्षीभाव निर्माण होईल.

संध्याकाळी साडेसात वाजता पू. बाबांकडे गेलो तेव्हां त्यांनी सकाळच्या अभंगावरच चर्चा सुरू केली. ते म्हणाले, आपले विकार आपले शत्रू आहेत आणि त्यांच्याशी लढाई करायची आहे याबद्दल दुमत नाही. पण त्यांच्याशी सामना करण्यासाठी आधी त्यांचे रूप आणि स्वभाव समजून घ्यावा लागेल. ही लढाई कशी करायची?

**साधक ग :** काही प्रमाणात ही **war of attrition** आहे. त्यासाठी शत्रूला मिळणारी रसद तोडली पाहिजे. म्हणजेच इंद्रियांचे आहार तोडले पाहिजेत.

**पू. बाबा :** हे एक झाले; तथापि आपली हत्यारे काय आहेत हेही पाहिले पाहिजे. उदाहरणार्थ, राग हा विकार घेऊ. हा कसा जिंकावयाचा? राग येतो म्हणजे नेमके काय होते? क्रुध्पासून क्रोध शब्द झाला आहे. क्रोध म्हणजे खळबळ. राग मनात खळबळ निर्माण करतो.

**साधक प :** माझ्या अहंकाराला धक्का लागला की राग येतो.

**साधक ब :** केवळ अहंकार नव्हे, तर माझे मी एक इमेज (प्रतिमा) निर्माण केलेले आहे त्याला धक्का लागला की राग येतो.

**साधक ग :** अहंकारामुळे मी करणारा म्हणजेच कर्ता असे वाटते.

**पू. बाबा :** मी कर्ता ही भावना गेली तर राग जाईल का?

**साधक प :** केवळ तेवढे पुरणार नाही. मी कर्ता आहे, भोक्ता आहे आणि ज्ञाता आहे. हे तीन्ही गेले पाहिजे.

**पू. बाबा :** ही मनानेच खेळावयाची लढाई आहे. आपले मन विकारांना फितूर होते. त्याला रोखण्यासाठी काही प्रमाणात तरी स्वत:कडे वेगळेपणाने पहाता आले पाहिजे. विकार आवरल्याखेरीज साधनात पाऊल पुढे पडणार नाहीच.

पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. श्रीमहाराजांची समाधी बांधायच्या वेळी अभिषेकाचे जमणारे पाणी समाधीपासून बाहेर कसे काढावे ते भाऊसाहेबांनी (केतकर) सुचविले. ते ऐकून, तुम्हाला काही कळत नाही असे आप्पासाहेब भडगावकर त्यांना म्हणाले तरीदेखील त्यांना राग आला नाही. पुढे एकदा मी भाऊसाहेबांना त्याबद्दल विचारल्यावर ते म्हणाले, अहो, श्रीमहाराजांसमोर ते तसे म्हणाले म्हणजे ते खरे असलेच पाहिजे. (ते खरे नसते तर श्रीमहाराजांनी आप्पासाहेबांच्या तोंडातून हे शब्द येऊ दिलेच नसते, हा भाव) म्हणजे जे जे काही घडते ते ते श्रीमहाराजांच्या इच्छेनेच घडते अशी त्यांची खात्री होती.

**साधक ग :** श्रीमहाराज सर्वव्यापी आणि सर्व शक्तींनी परिपूर्ण आहेत हे त्यांना पटले होते.

**साधक प :** त्यापेक्षाही, मला वाटते, त्यांचा बालभाव होता. लहान मुलाला आईचे संरक्षण वाटते.

**पू. बाबा** : होय, एखाद्या प्रसंगी आई घाबरलेली असते पण तिच्या पदराखाली दडलेल्या मुलाला सुरक्षित वाटते. सकाळी साधक अ म्हणाले होते की जे जे काही घडते - मग तो राग का असेना - ते श्रीमहाराजांकडून येते अशी खात्री झाली तर हे युद्ध लढणे सोपे जाईल. हा भाव का येत नाही? बाकी काही न करता श्रीमहाराजांना शरण जावे.

**साधक ग** : अहंकार पुरता गेला नाही तरी तो क्षीण झाल्याखेरीज शरणागती कशी येईल? विनय पत्रिकेतील एका पदात (पद १२५) तुलसीदासांनी म्हटले आहे 'मम हृदय भवन प्रभु तोरा। तहँ बसे आइ बहु चोरा॥ अति कठिन करहिं बरजोरा। मानहिं नहिं बिनय निहोरा॥' हे माझे हृदय तुझे घर आहे पण त्यामधें षड्विकार हे चोर शिरले आहेत आणि ते माझ्यावर जबरदस्ती करतात. प्रभु! माझे काहीही होऊ दे; पण ते गेले नाहीत तर तुझी अपकीर्ती होईल याची मला चिंता वाटते. तेव्हां कृपा कर आणि त्यांच्यापासून मला सोडव. 'चिंता यह मोहिं अपारा। अपजस नहिं होइ तुम्हारा॥' हे करावेच लागेल. शरण जाऊन सर्व काही श्रीमहाराजांवर सोपवावेच लागेल. मंबाजीने मारले तेव्हां विठ्ठला सर्व काही तूच करतोस अशा अर्थाने 'कांटीवरी मारविले', 'क्रोधाहातीं सोडविले' अशी प्रयोजक शब्दरचना तुकाराम महाराजांनी केली आहे.

**पू. बाबा** : आजच्या अभंगात शेवटी 'तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें। अवघीयांचें काळें केलें तोंड॥' म्हटले आहे, याचा अर्थ काय?

**साधक प** : शत्रूला जिंकून त्याचा अपमान करायचा झाला तर त्याच्या तोंडाला काळे फासून त्याची गाढवावरून धिंड काढतात तसे या विकारांना तुझ्या नामाच्या शक्तीने केवळ जिंकले असे नाही तर तोंडाला काळे फासून त्यांची फटफजीती केली.

**साधक ब** : या लढाईत विकार नामोहरम करायचे आहेत हे खरेच. पण त्याचबरोबर हा 'मी' फुसका आहे तो पातळ झाला पाहिजे.

**पू. बाबा** : शत्रूशी लढतांना काही वेळा माघार (withdrawal) किंवा पळून जाणे (escapism) आवश्यक आहे. प्रत्येक वेळी छाती पुढे काढून जाण्यात अर्थ नाही. तुकाराम महाराजांबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणत की त्यांनी जळती शेगडी उरावर घेऊन परमार्थ केला.

आता उद्या पुण्यतिथी आहे; तेव्हां काय निश्चय करायचा ते सांगा. ही लढाई ज्याची त्यालाच लढावी लागणार आहे; आणि त्यासाठी सावध राहावे लागणार आहे. आपण श्रीमहाराजांना प्रार्थना करावी की मला आपण मदत

करा. त्याचबरोबर आपले विकार कमी होत आहेत ना याकडे लक्ष दिले पाहिजे. पुढच्या वर्षी श्रीमहाराजांना हिशोब द्यावा. पाहिजे तर त्याकरिता एक वेगळी डायरीच ठेवावी.

## ।१७९। (११ डिसेंबर १९९०)

आज उत्सवांचा नववा दिवस असला तरी मार्गशीर्ष वद्य दशमी आहे. आज उजाडता श्रीमहाराजांची पुण्यतिथी होती.

संध्याकाळी पू. बाबांनी चर्चेसाठी ज्ञानेश्वर महाराजांचा 'सगुणाची सेज निर्गुणाची बाज। सांवळी विराजे कृष्णमूर्ति॥१॥' हा अभंग घेतला. ते म्हणाले, निर्गुणाची बाज हे structure किंवा आधार आहे. त्यातून सगुण येते. सगुणाची सेज हे दृश्य अथवा विश्व. कृष्ण सगुण की निर्गुण? तो दोन्ही आहे. सगुण समजायला कठीण आहे असे तुलसीदासांनी म्हटले आहे. त्या मानाने निर्गुण सोपे आहे. मन ध्यान करू लागल्यावर कृष्ण डोळ्यात भरून राहिला. तो कृष्ण अगदी आत, सर्वांच्या आत आहे.

निवृत्ति म्हणजे काय? एका दृष्टीने निवृत्ति म्हणजे आता पुरे असे म्हणता येईल.

**साधक ब :** निवृत्तीसाठी valuation होणे जरूर आहे. विवेकाने किंमत ठरली की निवृत्ती येईल. म्हणून ज्ञानेश्वर महाराजांनी निवृत्ती ही वाट सांगितली. निघोट निवृत्ती म्हणजे शुद्ध निवृत्ती. त्यात प्रवृत्तीचा अंशही नाही, म्हणजेच बाह्याकडची ओढ पूर्णपणे आत वळली आहे.

काल आपण Invisible helper बद्दल (अदृश्य मदतनीस) जे सांगितले ते helper आम्हाला मदत करीत आहेत हे आम्हाला कळेल का?

**पू. बाबा :** जो मदत करतो आहे त्याला ते तुम्हाला कळावे किंवा नाही हे तुमच्यापेक्षा जास्त कळत नसेल का? ते मला कळावे हे तुम्ही त्याच्यावर का लादता? त्याला खाली खेचण्यापेक्षा तुम्हीच त्याच्या पातळीवर जावे. ते साधण्यासाठी जास्त नाम घ्यावे.

**साधक प :** आज पहाटे पुण्यतिथीच्या वेळच्या निरूपणात आपण म्हणालात की, मला येथे पुष्कळ पुण्यात्मे आलेले दिसत आहेत; त्यात ब्रह्मानंद महाराजही आहेत. ते आपल्याला कसे दिसले?

**पू. बाबा :** पुष्कळ पुण्यात्मे मला दिसले हे खरे आहे. त्या सगळ्यांना मी ओळखू शकलो नाही. पण ब्रह्मानंद महाराज श्रीमहाराजांच्या पायापाशी

बसलेले मला दिसले! **I was moved !** (मला अगदी भरून आले) त्यामुळे माझ्या पुढच्या निरूपणात थोडा व्यत्यय आला. तीस चाळीस हजारांचा येवढा मोठा समुदाय जो शांत होता तो या पुण्यात्म्यांच्या अस्तित्वामुळेच होता यात शंका नाही.

**साधक क :** साधकाला जर कोणाची तीव्रतेने आठवण होत असेल तर त्याचा अर्थ ती व्यक्ती आली होती असा घेता येईल का?

**पू. बाबा :** होय, हे अगदी शक्य आहे. क्वचित कधी आकृतीदेखील दिसेल. एकदा पहाटे जप करतांना मला हेबळ्ळीला भेटलेला एक मुलगा दिसला. त्याच संध्याकाळी तो मला भेटायला आला! असे अनुभव नित्याचेच आहेत. त्याबद्दल श्रीमहाराज म्हणाले होते की, इंद्रियांच्या अनुभवांपेक्षा हे वैचारिक पातळीवरचे अनुभव जास्त वरचे असतात.

## |१८०| (१२ डिसेंबर १९९०)

सकाळी पू. बाबांकडे गेलो तेव्हां ते म्हणाले की कालच्या अभंगावर विचार केला तेव्हा आणखी काही मुद्दे लक्षात आले. सगुणाच्या उपासनेला निर्गुणाची पार्श्वभूमी आहे. अभंगात सगुण आणि निर्गुण यांचा समन्वय **(synthesis)** सांगितला आहे. विश्व सगुण आहे. त्यापलीकडे निर्गुण आहे. **Individual, Cosmic and Ultra cosmic** (पिंड, विश्व आणि विश्वातीत) असा क्रम आहे. दुसरे म्हणजे बाज आणि सेज हे शब्द वापरतांना विश्रांती अभिप्रेत आहे. समर्थांनीही 'रामदास म्हणे विश्रांती मागणें। जीवीचें सांगणें हितगूज॥' असे म्हटले आहे. साधकाला समधर्मी वस्तूवर प्रेम करता येते. हीच सगुणोपासना होय. पण सगुणाच्या उपासकालाही शेवटी निर्गुणात विश्रांती आहे.

निवृत्तीची काल केलेली व्याख्या अपूर्ण आहे. निवृत्ती म्हणजे आता पुरे असा अर्थ आपण केला. पण त्यावरून असा अर्थ निघतो की आहे ते असू द्या. आहे ते असू द्या हा भावही गेला पाहिजे. दृश्याची गरज मुळापासूनच गेली पाहिजे.

**साधक :** समाधीचे दर्शन घेतांना कोणता भाव असावा?

**पू. बाबा :** समाधीचे दर्शन घेतांना समाधी, त्यामागचे व्यक्तित्त्व आणि त्याच्याही मागचे सर्वव्यापी अस्तित्व आपण लक्षात घेतले पाहिजे. साधकाची जसजशी प्रगती होईल तसतसा त्याचा दर्शनाचा अनुभव व्यापक होईल.

नंतर पू. बाबांनी काही उर्दू शेर ऐकवले आणि मीराबाईचे 'जोगी मत जा' हे पद सांगितले. त्याचवेळी श्री. आण्णासाहेब गाडगीळ त्यांना भेटावयाला आले. त्यांनी ते त्यांच्या वडिलांबरोबर कर्नाटकात गेलेले असतांना श्रीब्रह्मानंद महाराजांना पाहिले असल्याचे सांगितले. नंतर श्रीमहाराजांच्या पादुका कोठे कोठे आहेत ते सांगतांना ते म्हणाले की श्रीमहाराजांनी श्रीब्रह्मानंद महाराजांना आपल्या पादुका दिल्या होत्या. ब्रह्मानंद महाराज त्या सतत गळ्यात घालत आणि त्या मंगळसूत्रासारख्या जपत असत. आता त्या पादुका बेलधडीच्या राममंदिरात ठेवलेल्या आहेत. ही हकिगत सांगत असतांना श्री. आण्णासाहेबांच्या डोळ्यांना पाणी आले.

शिष्याच्या गुरुप्रेमाच्या ह्या संदर्भात साधक क यांना श्रीरामकृष्णांच्या जीवनातील एक गोष्ट आठवली. ते म्हणाले, श्रीरामकृष्णांच्या शेवटच्या आजारात त्यांना भेटायला श्रीनागमहाशय गेले होते. श्रीरामकृष्ण त्यांना म्हणाले, तू वैद्य आहेस, मला बरा कर. श्रीनागमहाशयांनी विचार केला की गुरूंचे देहदु:ख आपण आपल्यावर घ्यावे आणि असा विचार करून ते म्हणाले, होय, आपल्या कृपेने मी तुम्हाला बरा करू शकेन. श्रीरामकृष्णांच्या ते लक्षात आले आणि ते म्हणाले, समजले, तू मला खरेच बरा करू शकशील; पण मला तसे नको.

चर्चा चालू असतांना तेथे आलेले एक गृहस्थ सायन्स आणि अध्यात्म या विषयावर प्रकाशित झालेल्या एका पुस्तकाची स्तुती करून ते आम्ही वाचावे असा आग्रह करू लागले तेव्हां पू. बाबा त्यांना म्हणाले की, ते पुस्तक तुम्ही मला द्या, मी ते पाहीन आणि मग यांना काय सांगायचे ते सांगेन.

संध्याकाळी पू. बाबांच्याकडे गेलो तेव्हां आपण आता काय करावयाचे असा प्रश्न त्यांनी विचारला. पुढे तेच म्हणाले, आपण सर्वांनी श्रीमहाराजांच्या समोर जपाचा संकल्प सोडावा. ज्याला जितका जमेल तितक्याचाच संकल्प सोडावा. संकल्प सोडतांना कोणत्या गोष्टी लक्षात ठेवाव्या ते सांगतो. संकल्प एक वर्षासाठी म्हणजे पुढच्या वर्षीच्या पुण्यतिथीपर्यंत करावयाचा आहे. नामस्मरण करतांना

(१) उच्चार स्पष्ट आणि सर्व अक्षरांचा झाला पाहिजे.

(२) जप सावकाश करावा. सावकाश केला म्हणजे जपाकडे जास्त लक्ष लागते आणि अन्य विचार कमी होतात.

(३) कंटाळवाणेपणाने जप करू नये. कंटाळा आल्यास थोडा वेळ थांबावे.

(४) फार ताण देऊ नये.

(५) जप करतांना इतर व्यवहार सांभाळावा. व्यवहाराविरुद्ध वर्तन करू नये.

(६) आपला शक्तिपात इंद्रियांकरवी होतो. इंद्रियांचा उपयोग अगदी जरुरीपुरता म्हणजे कमीत कमी करावा.

(७) आपल्या संकल्पाच्या नामात कशासाठीही तडजोड (compromise) करू नये.

संकल्पाच्या जपात कशासाठीही तडजोड करू नये हे सांगतांना पू. बाबांनी श्री. अंबूराव महाराजांच्या जीवनातील एक गोष्ट सांगितली. एकदा त्यांना एका ठिकाणी जेवायला बोलावले होते. ते गेले, पण त्या दिवशी त्यांचा नेहमीचा जप पुरा झालेला नव्हता म्हणून ते म्हणाले की, जप करून मी तासाभराने जेवायला बसेन. पण यजमानाने फार आग्रह केल्यामुळे ते तसेच जेवायला बसले. पानावर बसून पहिला घास घेताच त्याच्या डोळ्यांना पाणी आले आणि ते न जेवताच उठले. ते येवढेच म्हणाले, 'आधी चाकरी मग भाकरी'. नंतर जप पूर्ण करून मगच ते जेवले.

गुरुदेव रानडे यांचीही एक गोष्ट पू. बाबांनी सांगितली. नाम छान जमले म्हणून व्हाइस चॅन्सेलर असूनही युनिव्हर्सिटीच्या एका महत्त्वाच्या समारंभाला ते गेले नाहीत. नामाबद्दल इतकी आस्था आणि तळमळ हवी.

पू. बाबा म्हणाले, नाम हा श्रीमहाराजांचा प्राण आहे, म्हणून तो प्राण टिकविण्यासाठी, त्याला पुष्टी येण्यासाठी आपण संकल्प सोडून नामच घेणे जरूर आहे. जनलौकिकाची लाज सोडायला हवी. या बाबतीत तुकाराम महाराज आदर्श आहेत. एका अभंगात ते पंडितजनांना 'तुका टाकावा थुंकोन' म्हणून सांगतात. आपण नामासाठी लोक काय म्हणतील हे थोडे तरी सोडलेच पाहिजे. लोकांना स्पष्ट सांगावे की ही माझी नामाची वेळ आहे. मी आपल्याला नंतर भेटेन.

## |१८१| (२१ डिसेंबर १९९०)

मालाड.

पू. बाबांनी Leaves from the Diary नांवाच्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखविला. १९३२-३३ मध्ये जे. कृष्णमूर्ती अहमदाबादला उद्योगपती अंबालाल साराभाई यांच्याकडे काही दिवस राहिले होते. साराभाईंच्या

मुलीचे कृष्णमूर्तींशी जे संवाद झाले ते शक्यतो त्यांच्याच शब्दात तिने ह्या डायरीत दिलेले आहेत कृष्णमूर्तींनी येथे स्पष्ट शब्दात सांगितले आहे की त्यांनी जॉन वुड्रॉफचे **Serpant Power** हे पुस्तक वाचले होते व त्यानंतर सुमारे सहा वर्षे त्यांनी कुंडलिनी योगाचा अभ्यास केला. त्यांची कुंडलिनी जागृत होऊन त्यांना आत्मज्ञान झाले होते. आज आत्मज्ञान झालेली आणखी काही माणसे आहेत का असा अंबालाल यांच्या मुलीने प्रश्न केला तेव्हां **How are you concerned** असा त्यांनी प्रतिप्रश्न केला.

अमेरिकेत असतांना सुरुवातीच्या काळात आपले विचार लोकांना कसे सांगावे याचा त्यांना प्रश्न पडे. त्या काळात त्यांनी काही कविताही केल्या होत्या. प्रथम प्रथम काय बोलायचे ते त्यांचा भाऊ नित्यानंद त्यांना लिहून देत असे. पुढे तो क्षय होऊन वारला. त्याचा कृष्णमूर्तींना जबर धक्का बसला व त्यातून त्यांचे चिंतन वाढत गेले.

अमेरिकेत असतांना, स्वयंपाक व इतर घरकाम ते स्वत:च करत असत कारण तेथील मजुरी देणे त्यांना परवडणारे नव्हते. साराभाईंनी त्यांना तुम्ही अमेरिका व हिंदुस्थान यांपैकी कोठे राहणे पसंत कराल असे विचारले असतां ते म्हणाले, अर्थात हिंदुस्थानात. ते पुढे म्हणाले की हे मी मोठ्या राष्ट्रप्रेमाने म्हणतो आहे असे नाही; पण मी एक गरीब माणूस आहे आणि भारतात अद्याप गरीबी तुच्छ मानत नाहीत. उलट लंगोटी लावून थर्ड क्लासने प्रवास करणाराची व देवाचे नांव घेणाराची येथे लोक पूजा करतात. ते म्हणाले की त्यांना कोणाचाही द्वेष व मत्सर वाटत नाही आणि ते सदैव आनंदात मग्न असतात.

पू. बाबांनी सांगितले की कृष्णमूर्तींबद्दल श्री. काका दीक्षित यांनी श्रीमहाराजांना सांगितले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की कृष्णमूर्तींचा मार्ग हठयोगाचा आणि ज्ञानाचा आहे. सामान्य माणसांना तो झेपणारा नाही. त्यांना आत्मज्ञान झाले आहे का असे श्री. काकांनी विचारले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की त्याच्याशी तुम्हाला काय करायचे आहे? पण ते श्रेष्ठ पुरुष आहेत हे निश्चित. पू. बाबा म्हणाले की कृष्णमूर्तींनी केलेल्या हठयोगाच्या अभ्यासाचा इतका निश्चित उल्लेख त्यांच्या वाचनात यापूर्वी आलेला नव्हता.

**साधक प** : कुंडलिनी शब्दाचा कृष्णमूर्तींनी उल्लेख केला आहे की नाही ते आठवत नाही पण हठयोगाच्या ज्या अनुभवातून ते गेले त्याचे वर्णन त्यांच्या दुसऱ्या एका ग्रंथात आणि श्रीमती पुपुल जयकर यांनी लिहिलेल्या त्यांच्या

चरित्रात आहे. तसेच जे. जे स्कूल ऑफ आर्टमध्ये त्यांची व्याख्याने होत तेव्हांही त्यांनी काही लोकांना मला कुंडलिनी इत्यादी माहीत आहे. नुसती भगवी वस्त्रे वापरून काही होणार नाही असे सांगितले होते.

**पू. बाबा** : द्वेष आणि मत्सर नाही आणि सदैव आनंदी वृत्ती म्हणजे काय अवस्था असावी! ज्ञानेश्वर महाराजांनी प्रसन्नता म्हटली आहे ती हीच. आपले साधन आणि प्रसन्नता देहाच्या स्थितीवर अवलंबून असतात. किडनी दुखू लागली किंवा डोके दुखू लागले किंवा पोट साफ नसले की मन स्वस्थ रहात नाही. देहाची काहीही स्थिती असली तरी प्रसन्नता भंग पावणार नाही यासाठी काय करावे?

**साधक प** : जोपर्यंत मी देह आहे असे वाटते आणि मी देहापलीकडे आहे हे खऱ्या अर्थाने समजत नाही तोपर्यंत देहाच्या स्थितीवरच मनाची स्थिती अवलंबून राहणार.

**साधक ब** : मी देहापलीकडे आहे. माझ्या जीवनात घडणारे सर्व काही श्रीमहाराज करतात. मी नाम घेतो त्याचा आणि श्रीमहाराजांचा संबंध आहे याची काहीतरी खूण मिळाली पाहिजे. ती मिळाली तर साधन चांगले होईल आणि श्रीमहाराजांच्या सर्वव्यापित्वाचा आणि शक्तीचा अधिकाधिक प्रत्यय येत राहील.

**साधक प** : हे देखील होईल, पण त्यासाठी तळमळ लागली पाहिजे. आतून हादरा बसला पाहिजे.

**साधक ग** : ते अद्यापि होत नाही. चालले आहे ते ठीक आहे असे वाटते. जोपर्यंत ही आत्मसंतुष्ट वृत्ती आहे तोपर्यंत पाऊल पुढे पडणार नाही.

**साधक क** : यासाठी शरणागती हा उपाय आहे, पण ती देखील आणू म्हणून येत नाही.

**साधक प** : तेथेही 'मी' शरण जाणार हा भाव राहतोच.

**पू. बाबा** : तुम्ही काहीही करा, पण वैराग्याशिवाय पाऊल पुढे पडणार नाही. सुरुवात म्हणून, झाले ते आता पुरे असे वाटलेच पाहिजे.

**साधक प** : मी आता किती जगणार आहे कोणास ठाऊक! आता जलदी केली पाहिजे अशी निकड निर्माण झाली पाहिजे.

**साधक ग** : आम्हाला अद्यापि परमार्थाची खरी भूकच नाही. कडकडीत भूक लागली की मनुष्य अन्न मिळविण्याची धडपड करतो तशी परमार्थाची खरी भूक लागल्याशिवाय साधनाची सर्वकाळ धडपड चालू होणार नाही.

**पू. बाबा** : ह्या सगळ्या फंदात न पडता, श्रीमहाराजांनी नाम घ्यायला सांगितले आहे ना, मी तेच करीत राहणार असा निश्चय करावा.

**साधक क** : असा निश्चय होणे हीच शरणागती आहे.

**साधक म** : बाकी काही विचार न करता भाऊसाहेबांसारखे श्रीमहाराजांना आवडते म्हणून नाम घेत राहणेच योग्य हे मला पटले आहे.

**साधक भ** : श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवण्यासाठी त्याचा अभ्यास केला पाहिजे. बाहेर जातांना, बाहेरून आल्यावर, घरात काम करतांना, विश्रांती घेतांना त्यांना सांगून सर्व काही करीत राहिले तर त्यांचे अस्तित्व जाणवू लागेल. त्यांचे अस्तित्व कसे जाणवेल याची नुसती चर्चा करून काही उपयोग होणार नाही. हा अभ्यास सतत करत राहिले पाहिजे.

**साधक प** : असे करतांना येणारी एक अडचण साधक ग नी सांगितली होती. श्रीमहाराजांना सांगून आपण घरातून बाहेर पडतो आणि ते सदैव आपल्या बरोबर आहेत असा भाव निर्माण व्हावा असे म्हणतो; यामधे विरोध नाही कां! पण येणारे हे विरोध प्रत्यक्ष करू लागल्यावर विराम पावतील हेच खरे!

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणत की आता हा जन्म नामाला दिला; फुकट गेला तरी चालेल - तो फुकट जात नाहीच - असे का म्हणू नये?

**साधक ड** : हे नुसते म्हणणे होते. प्रत्यक्षात देणे होत नाही.

**साधक प** : आज इतकी वर्षे नामस्मरण करतो आहोत, तेव्हां आता आपणांपैकी कोणाला श्रीमहाराजांच्या अस्तित्वाबद्दल आणि नामसाधनाबद्दल शंका असेल असे मला वाटत नाही. पण नाम घेतांना उत्साह - आणखी घ्यावे असा उत्साह वाटत नाही. तथापि नामसाधन करायचे नाही तर आता दुसरे काही करू असेही नाही.

चर्चेतील निराशेचा सूर पाहून पू. बाबा म्हणाले, आपण करीत राहावे. त्यांची प्रार्थना करावी आणि शरण जाण्याचा अभ्यास करावा. यासाठी सत्संगतीचा खूप उपयोग होईल.

## |१८२| (२८ डिसेंबर १९९०)

आज चर्चेला सुरुवात झाली तेव्हां मागच्या शुक्रवारचा निराशेचा सूर अद्यापि राहिला आहे असे वाटले. साधक ब आणि साधक ड म्हणाले, डोंगर चढतांना जसा एखादा सपाट प्रदेश किंवा पठार (plateau) येते तसे

साधनात झाले आहे. पाऊल पुढे पडते आहे असे वाटत नाही. मनासारखे साधन होत नाही.

**पू. बाबा** : साधनातील प्रगतीच्या बाबतीत तुमच्या काय अपेक्षा आहेत? काय झाले म्हणजे साधन मनासारखे झाले असे वाटेल?

**साधक ब** : जप करतांना उत्साह वाटला पाहिजे. आणखी जप करावा, आणखी जप करावा असे वाटले पाहिजे.

**साधक ड** : जप करतांना होणारी एकाग्रता वाढली पाहिजे. मनात येणारे इतर विचार कमी होत नाहीसे झाले पाहिजेत.

**पू. बाबा** : साधनात सपाट प्रदेश किंवा तुमच्या शब्दात plateau आला आहे असे तुम्हाला वाटते तो का आला आहे याचा तुम्ही विचार केला आहे का? आपल्या मनासारखे नामस्मरण होत नाही अशी सर्वांचीच तक्रार असते. आपणच आपल्या मनाचे विश्लेषण करून असे का होते याचे कारण शोधून काढले पाहिजे.

**साधक प** : सर्व समस्यांचे मूळ ध्येयनिश्चिती झालेली नाही हे आहे. व्यवहारात 'मी केले आणि यशस्वी झालो' असे साधक ब म्हणतात. तसेच साधनातही 'मी करतो' आणि साधन होत नाही म्हणून निराशा येते. खरी निराशा म्हणजे वैराग्य आले तर साधन होईल. व्यवहारात आपला 'मी' पुष्ट होतो आणि परमार्थात 'मी' नाहीसा करायचा आहे.

**पू. बाबा** : चार दिवसांपूर्वी एक बाई भेटायला आल्या होत्या. पुण्याला असतात. मुलामुलींची लग्ने झाली आहेत. सगळे ठीक आहे. त्यांनी स्वामी स्वरूपानंदाचा अनुग्रह घेतलेला आहे. तथापि ध्यान धारणा न करता त्या जप करतात. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांत सोऽहंचे भान टिकावे अशी ती साधना करणारांची अपेक्षा असते. ते घडत नाही म्हणून त्या माधवनाथांना भेटल्या तेव्हां त्यांनी त्यांना मला भेटायला सांगितले म्हणून त्या आल्या होत्या. त्यांनी त्यांची तीन अवस्थांत नाम टिकत नाही ही अडचण सांगितली तेव्हां मी त्यांना विचारले की जागेपणी तरी एकसारखे नामस्मरण होते का? ते होत नसेल तर ते झोपेत आणि स्वप्नात कसे होईल? त्या म्हणाल्या, मागे एकदा गोंदवल्याला मी शिबिरासाठी आले होते तेव्हां तुम्ही श्रीमहाराज काय म्हणत ते सांगितले होते. श्रीमहाराज म्हणत की जागेपणी तुम्ही शक्य तितके नामस्मरण करा, मग झोपेत आणि बेशुद्धीत नाम टिकवावयाची जबाबदारी माझी. श्रीमहाराजांच्या या सांगण्यावर विश्वास ठेवून रोज झोपतांना मी श्रीमहाराजांची

प्रार्थना करीत असे की झोपेत माझे नाम चालू दे. एक दिवस झोपण्यापूर्वी मी प्रार्थना करीत होते आणि आपले नाम टिकत नाही याचे दु:ख होऊन माझ्या डोळ्यांना पाणी आले. रात्री झोपेमध्येच मला शब्द ऐकू आले. मला हाक मारून श्रीमहाराज म्हणाले, बाई ऊठ आणि जप करत बैस! मी त्यांना विचारले की ते शब्द श्रीमहाराजांचेच कशावरून? त्या म्हणाल्या, माझी तशी खात्री आहे.

ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, हे सगळे सहज घडले असे समजू नका. हे सर्व, म्हणजे त्या बाईंनी कळवळून प्रार्थना करणे, श्रीमहाराजांनी त्यांना झोपेतून जागे करून जप करायला सांगणे आणि ही घटना त्या बाईंनी मला येऊन सांगणे हा वरवर पहाता योगायोग वाटला तरी साधक ब यांच्या निराशेला हे श्रीमहाराजांनी दिलेले उत्तर आहे. तळमळून प्रार्थना केली पाहिजे. आत्ताचे त्यांचे नैराश्य ही कदाचित त्या तळमळीची सुरुवात असेल. श्रीमहाराज म्हणत की तळमळ लागत नाही याची तळमळ लागावी. एकदा तात्यासाहेबांना आजाराची काळजी वाटली. श्रीमहाराजांना हे सांगितल्यावर त्यांनी विचारले, 'त्या काळजीत मी नाही कां?' सर्व घटनांत त्यांचा हात पाहू लागलो तर निराशेत देखील तेच आहेत हे समजून येईल. काही वेळा असे होते की व्यवहारात तुम्ही गुरफटून जाता आणि त्यातून थोडी सवड मिळाली की त्याचा साधनावर झालेला अनिष्ट परिणाम लक्षात येतो.

**साधक प** : गोंदवल्यास होतो तेव्हा मन उंचावर होते. येथे आल्यावर ते एकदम खाली येते आणि त्याचे वाईट वाटून निराशा येते. कदाचित ही निराशा cyclical (चक्राकार) असावी किंवा आभाळात झाकोळ येते तसे असावे. ही येऊन जाणारी स्थिती (passing phase) झटकलीच पाहिजे.

**पू. बाबा** : हे जास्त बरोबर वाटते. एक तर विचाराने, आत्मनिरीक्षण करून सावधानतेने साधन करावे नाहीतर भाऊसाहेबांसारखे श्रीमहाराजांना आवडते म्हणून अखंड नाम घ्यावे. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी.

**साधक ग** : गेल्या शुक्रवारीच साधक भ नी ही गोष्ट सुचविली होती.

**पू. बाबा** : होय; श्रीमहाराजांचे अस्तित्व आपण सहज विसरतो. त्यांच्या अस्तित्वाच्या जाणिवेचा अभ्यासच केला पाहिजे. (साधक ब ना उद्देशून) श्रीमहाराज म्हणत की रामाच्या पायाशी काळजीचे गाठोडे ठेवून जा. तसे मी तुम्हाला सांगतो की माझ्याजवळ तुमचे निराशेचे, दुश्चितपणाचे गाठोडे ठेवून जा.

नंतर श्री. भाऊसाहेबांच्या श्रीमहाराजांवरील निष्ठेसंबंधीच्या गोष्टींची उजळणी झाली. पूर्वी न ऐकलेली एक हकिगत पू. बाबांनी सांगितली. श्री.

भाऊसाहेबांच्या पत्नी वारल्या तेव्हांची गोष्ट. त्या वारल्या तेव्हां त्यांचा आणि भाऊसाहेबांचा साठ वर्षे सहवास झालेला होता. प्रेतयात्रेबरोबर दारापर्यंत जाऊन भाऊसाहेब परतले. नंतर स्नान करून त्यांनी श्रीमहाराजांची पूजा केली. त्यांचे सांत्वन कसे करावयाचे ते सौ. ताईंना (पू. तात्यासाहेबांच्या पत्नी) समजत नव्हते. पण भाऊसाहेब स्वयंपाकघरात गेले आणि अतिशय शांतपणाने त्यांनी 'माझे जेवण ठेवले आहे ना' म्हणून विचारले. श्रीमहाराज करतात ते बरोबरच अशी त्यांची धारणा होती.

**साधक प** : मृत्यूला कसे सामोरे जायचे हे त्यावेळी ताईंनी प्रत्यक्ष पाहिल्यामुळे त्यांची मृत्यूची भीती गेली. म्हणूनच पू. तात्यासाहेब गेल्यावर शोकात बुडून न जाता, सर्व काही पूर्वीसारखेच चालू ठेवा म्हणून त्यांनी सांगितले.

पू. बाबांनी गदगच्या श्री. शिवप्पा कुलकर्णींची हकिगत सांगितली. म्हातारपणी त्यांना स्मृतिभ्रंश झाला होता. श्रीमहाराज गदगला गेले तेव्हां शिवप्पांच्या मुलाने श्रीमहाराजांना हे सांगितले. नंतर श्रीमहाराज शिवप्पांना भेटायला गेले तेव्हां महाराज! अंतकाळी माझे नाम राहील ना असे शिवप्पांनी श्रीमहाराजांना विचारले. हे ऐकल्यावर तेथे असलेल्या मंडळींना श्रीमहाराज म्हणाले, यांना स्मृतिभ्रंश झाला आहे असे कोण म्हणेल? यांची स्थिती फार चांगली आहे. हे सांगून पू. बाबा म्हणाले, अंतकाळी नाम येण्यासाठी नामाखेरीज इतर गोष्टींचे विस्मरणच झाले पाहिजे.

## |१८३| (४ जानेवारी १९९१)

आज सुरुवातीला पू. बाबांनी स्वामी अमलानंदांनी (स्वामी स्वरूपानंदांचे शिष्य - पेणचे श्री. मामा फडके) स्वामी स्वरूपानंदांबरोबर वेळोवेळी झालेल्या चर्चेच्या आधारे पुस्तक लिहिले आहे त्यातील काही भाग वाचून दाखविला. एकदा स्वामी स्वरूपानंद घरातील काही झाडण्या-पुसण्याचे काम करीत होते. ते पाहून अमलानंदांचे चिरंजीव श्री. पुरुषोत्तम फडके यांच्या मनात विचार आला की हे एवढे मोठे सत्पुरुष आणि ही किरकोळ कामे करतात. स्वामींनी ते जाणले आणि म्हणाले, अरे, सत्पुरुष झाला म्हणून काय झाले? त्याने हसून खेळून चार लोकांसारखेच राहिले पाहिजे. मोठा गंभीर, लांब चेहेरा करून का त्याने बसावयाचे? नामाच्या संदर्भात स्वामींनी सांगितले की सामान्यत: जप वैखरीच्या पलीकडे गेला की तो मेंदूतून चालतो. तो हृदयात गेला की काम झाले.

त्यांनी श्री. पुरुषोत्तम यांना त्यांच्या छातीला कान लावावयास सांगितले. तसे करतांच त्यांना सोऽहं चा स्पष्ट ध्वनी ऐकू आला! श्रीमहाराजांच्या चरित्रातही अशी हकिगत आहे. (प्रकरण ९ हाट भरला परमार्थाचा मधील "नाम कसें घ्यावें तें पहा") पू. बाबांनी त्यांनाही आलेला अशाच प्रकारचा अनुभव पुन्हा सांगितला. (अध्यात्म संवाद भाग १ मधील संवाद १२)

नंतर पू. बाबांनी विचारले की हे अनुभव सांगितले. असे ऐकू येणे शक्य आहे काय? तुम्हाला काय वाटते?

**साधक प** : शारीरिक म्हणजे इंद्रियांच्या पातळीवरचे जे ऐकणे असते तसा हा जप होणे आणि ऐकू येणे शक्यच नाही. ध्वनियंत्राशिवाय शब्द निर्माण होत नाही आणि कानांशिवाय ऐकू येत नाही. कानांनाही तो ध्वनी विशिष्ट कंपनसंख्येच्या (डेसिबल्स) मर्यादेत असेल तरच ऐकू येतो. तेव्हां हा जप होणे आणि तो ऐकू येणे काही तरी वेगळेच असले पाहिजे.

**पू. बाबा** : होय. ही अनाहत नादाच्या अलीकडची अवस्था आहे.

**साधक ग** : हृदयात जप होतो म्हटले तरी त्याचा आपले जे हृदय (heart) आहे त्याच्याशी काही संबंध नसावा. रमणमहर्षींनी त्याचे स्थान छातीत उजव्या बाजूस सांगितले आहे. तसेच हे ऐकणे देखील तादात्म्याने होत असावे. सत्पुरुष झाले तरी कोणाला हा जप 'ऐकवावयाचा' हे ते ठरवतात. ज्याचे तादात्म्य होणे शक्य आहे अशा अधिकारी व्यक्तीलाच ते ऐकायला सांगत असावेत. मागे एकदा आपणच श्रीधरस्वामींनी एक गाय मेली तेव्हां तिच्या वासराला पाजायला दुसऱ्या एका गाईला सांगितले अशी हकिगत सांगितली होती. त्यावरून ही हृदयाची भाषा कोणत्याही ध्वनियंत्रावर आणि श्रवणेंद्रियावर आधारलेली नाही असे दिसते.

**पू. बाबा** : हृदयात जप होतो म्हणजे काय होत असावे?

**साधक प** : जप करताना चित्ताला काहीतरी आलंबन लागते. ते बाहेरील असेल, उदाहरणार्थ मूर्ती, पादुका, तसबीर इत्यादी किंवा आतलेही असू शकेल, उदाहरणार्थ, बेंबी, हृदय इत्यादी.

**साधक ज** : श्रीमहाराजांनी बेंबीपासून नाम घ्यावे असे म्हटले आहे.

**पू. बाबा** : त्याचा अर्थ अतिशय तळमळीने घ्यावे असा करता येईल.

**साधक प** : मूलाधारचक्र हे शक्तिस्थान आहे. तेथे चित्त केंद्रित करण्यापेक्षा ते हृदयात केंद्रित करणे जास्त सुरक्षित वाटते. कारण शक्ती जागृत झाली आणि पुरेसे वैराग्य आलेले नसेल तर धोका आहे.

**साधक ग :** बेंबी हे वासनांचे केंद्र आहे.

**साधक प :** वासना जागृत झाल्या आणि त्या आवरता आल्या नाहीत तर उत्पात घडवून आणतील. त्यापेक्षा हृदयावर चित्त केंद्रित करून जप केला तर तो हृदयात उतरेल.

**साधक ग :** ज्यांना विचार करण्याची सवय आहे त्यांच्या हृदयात नाम उतरणे अवघड जात असावे.

**साधक प :** एका अर्थी भोळ्याभाबड्या लोकांना हे सोपे जाईल; पण समजून केले पाहिजे. "राम हमारा जप करे, हम बैठे आराम" अशी ती स्थिती आहे.

**पू. बाबा :** अशी स्थिती आली तर काय होईल!

**साधक ब आणि साधक क एकदम :** वा! ते झाले तर आणखी काय पाहिजे?

**पू. बाबा :** ही स्थिती यावी म्हणून काय करावे?

**साधक ब :** त्यासाठी सद्गुरूंच्या अस्तित्वाची जाणीव राहिली पाहिजे.

**पू. बाबा :** नामाची संगत झाली पाहिजे.

**साधक ग :** नाम सूक्ष्म आहे. त्यापेक्षा श्रीमहाराजांच्या अस्तित्वाच्या भावाचा प्रयत्न करणे सोपे आहे.

**साधक प :** तेही सोपे नाही. कारण आपला सगळा विचार श्रीमहाराज 'होते' म्हणजे आता नाहीत असाच होतो.

**साधक ज़ :** मी असा भाव मनात आणतो की श्रीमहाराजांची पाउले माझ्या हृदयात आहेत, आणि त्यांवर मी नामाची फुले वाहतो आहे. ह्या भावाची मला फार मदत होते.

**साधक ड :** ते आहेत, ते आहेत अशीच मनाला एकसारखी शिकवण दिली पाहिजे.

**साधक क :** मला असे वाटते की माझी प्रत्येक कृती श्रीमहाराज पहात आहेत अशी शिकवण मनाला एकसारखे देत राहिलो तर आपल्या हातून वाईट कृत्य होणार नाही आणि त्याचा चित्तशुद्धीला फार उपयोग होईल.

**साधक ग :** काय केले असतां श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचा भाव जागृत होईल हे ज्याच्या त्याच्या मनोरचनेवर अवलंबून राहील.

**पू. बाबा :** म्हणजे काय ते स्पष्ट करा.

**साधक ग :** कोणाला श्रीमहाराजांची पाउले हृदयात आहेत असे वाटेल, कोणाला ते पहात आहेत असे वाटेल तर कोणाला ते आपल्या घरातले 'कर्ते' आहेत असे वाटेल.

**पू. बाबा :** होय; पण भावांचे हे प्रकार तसे मर्यादितच राहतील. ह्या भावांपेक्षा श्री. भाऊसाहेबांचा भाव फार चांगला होता. हे घर श्रीमहाराजांचे आहे आणि त्यात मी राहतो असे वाटले पाहिजे.

**साधक म :** खरे तर ही शरणागतीची सुरुवातच म्हटली पाहिजे.

**साधक प :** 'मी शरण जाईन' असे वाटते तोपर्यंत खरी शरणागती होणारच नाही. शरणागती ही कृती नसून अवस्था आहे.

समारोपादाखल पू. बाबा म्हणाले, मग काय ठरले? बाकी सगळे विचार सोडून जास्तीत जास्त नामस्मरण करत राहणे चांगले!

## |१८४| (११ जानेवारी १९९१)

**पू. बाबा :** आपल्या येथे येणाऱ्या एका साधकांनी स्वामी स्वरूपानंदांकडून अनुग्रह घेतलेला आहे. एकदा ते स्वामींच्या वाढदिवसाच्या निमित्ताने पावसला गेले होते तेव्हां त्यांनी स्वामींना विचारले की चांगला जप कोणता? स्वामी म्हणाले, अजपा जप हा सर्वोत्कृष्ट.

एकदा मी श्रीमहाराजांबरोबर हुबळीला व तेथून पुढे दावणगेरीला गेलो होतो. तेथे करी नांवाच्या श्रीमहाराजांच्या भक्तांनी महाराजांना अजपा जपाचा अर्थ विचारला होता. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, जप करतांना अशी एक स्थिती येते की जप 'करावा' लागत नाही, तो 'होऊ' लागतो. तो तीनही अवस्थांत (जागेपण, झोप आणि स्वप्न) टिकतो. ती 'करण्याची' गोष्ट राहात नाही.

पुढे मुंबईला परत आल्यानंतर मी श्रीमहाराजांना अजपा जप म्हणजे काय ते अधिक स्पष्ट करून सांगा अशी विनंती केली. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, ज्ञानमार्ग, योगमार्ग आणि भक्तिमार्ग या तीन्हीतही अजपा जप आहे. तीनही अवस्थांत भगवंताचा विचार सतत टिकून राहणे हा ज्ञानमार्गाचा अजपा जप. तीनही अवस्थात वृत्तींवर ताबा आणून एकच वृत्ती सतत टिकवून धरणे हा योगमार्गाचा अजपा जप. स्वप्न पडेल तेही त्या एकाच वृत्तीचे! याचाच अर्थ जागेपणीच नव्हे तर स्वप्नात देखील वृत्तींवर ताबा टिकून राहील. अशा माणसाला हुकमी स्वप्न पडू शकेल. झोप ही वृत्तिशून्य अवस्था नसते. पतंजलींनी झोप ही वृत्ती आहे आणि तिला अभावाचे आलंबन असते असे

म्हटले आहे (अभाव प्रत्ययालंबना वृत्तिर्निद्रा ।१.१०।) योगनिद्रा ही सामान्य निद्रेसारखी नसते. तिच्यातही एकच वृत्ती टिकून राहते व आनंदाचा उत्कर्ष होतो. भक्तीमधें नाम वृत्तीची जागा घेईल. म्हणजे वृत्ती राहणारच नाहीत. तीनही अवस्थांत नाम टिकून राहील. हीच निर्वृत्ति अवस्था.

विचार आणि अनुसंधान यातील फरक स्पष्ट करताना पू. बाबा म्हणाले, अनुसंधान हे पार्श्वभूमीसारखे (Background) आणि काहीसे संकुचित आणि अस्पष्ट - vague म्हणा - असते. विचार हा व्यापक आणि ठसठशीत असतो. तो पार्श्वभूमीसारखा नसतो; ती मुख्य अवस्था असते. हिप्नॉटिझमच्या (संमोहन) संदर्भात ते म्हणाले, आपली अशी समजूत असते की दुबळ्या मनाची माणसे सहज हिप्नोटाइज होतात. हे खरे नाही. ज्यांना आपले मन वळविण्याची शक्ती असते तेच हिप्नोटाइज होऊ शकतात. वृत्तींच्या ठायी भगवंताचे नाम ठेवणे हे सुरुवातीला तरी हिप्नोटाइज होण्यासारखे आहे.

नंतर पू. बाबांनी विचारले की आपल्याला स्वप्नांवर हुकुमत गाजवणे शक्य आहे का?

**साधक प :** फाइनमॅन (Feynman) नांवाच्या नोबेल प्राइझ /म मिळालेल्या फिजिसिस्टने सिद्ध केले की त्याला पाहिजे असेल ते स्वप्न तो स्वत:ला पाडू शकतो. स्वप्न हे स्मृतींवर आधारित असते. आपल्याला पाहिजे त्या मेंदूतील स्मृतींना आपण जसे जागेपणी चेतना देऊ शकतो तसे स्वप्नात पण करणे शक्य आहे. अर्थात याला अतिशय बळकट धारणा पाहिजे. परमेश्वरावर विश्वास नसणाराला यासाठी चित्तशुद्धीची आवश्यकता आहे असे वाटणार नाही.

यानंतर पू. बाबांनी दासबोधातील अजपाजपाचे समर्थांनी केलेले विवरण वाचून दाखविले. (दासबोध १७.५. १ ते १३) पू. बाबा म्हणाले, तार, मंद्र आणि घोर ह्या संगीतातील संज्ञा आहेत. पुढे, सा, रे, ग, म इत्यादी सात स्वर आणि त्यांपैकी सा हा प्रधान हे सांगितले आहे. स्वराचे स्थान परेच्या वर आणि पश्यंतीच्या खाली आहे. शब्दाचे स्थान मुख, नादाचे स्थान हृदय आणि त्याखाली ध्वनीचे स्थान आहे. एकांतात स्वस्थ बसले असतांना काहीही उच्चार केलेला नसतांनाही सोहं सोहं असा शब्द होतो पण नाद मात्र काहीच नसतो. हे शब्दब्रह्म नादब्रह्माच्याही पलीकडे आहे. या शब्दाच्याही पलीकडे जाण्याची खटपट योगमार्गी करीत असतात. श्वास आत घेतांना सो

आणि बाहेर सोडतांना हं असा शब्दाशिवाय उच्चार होतो. जीवमात्र हा जप करत असतो. समर्थ म्हणतात की हाच अजपाजप. इतर प्राण्यांना याची जाणीव नसते पण जाणण्याचा प्रयत्न करणाऱ्या माणसास याची जाणीव होते आणि मग या अजपाजपाच्या सहाय्याने तो आत्मस्वरूप पाहतो.

पू. बाबांनी हे बरेच विस्ताराने सांगितले. ते म्हणाले, जागृती, स्वप्न आणि झोप या तीनही अवस्थांत ज्याप्रमाणे अजपाजप चालू असतो त्याप्रमाणे तीनही अवस्थांत नाम कसे टिकविता येईल? त्यासाठी प्रथम जागेपणी तरी एकसारखे नामस्मरण झाले पाहिजे. खातांना, चालतांना, इतर काही काम करतांना नामस्मरण झाले पाहिजे.

**साधक ग :** चालतांना वगैरे नामस्मरण होऊ शकते. कारण ते अगदी वरवरचे superficial असते. नाम घ्यायला म्हणून बसलेले असतांना नाम टिकणे अवघड असते. सर्व वृत्ती नामाने भरून जाणे ही फार मोठी अवस्था आहे.

**साधक प :** आपले नामस्मरण चालते ते केवळ तोंड आणि घसा येथपर्यंतच मर्यादित असते. त्याच्या खाली ते जातच नाही. खरे म्हणजे हातांनी देखील नामस्मरण झाले पाहिजे. का होऊ नये? नाम जर व्यापक आहे तर माझा सर्व देह त्याने भरून गेला पाहिजे. असे झाले तरच तीनही अवस्थांत नाम टिकेल.

**साधक ब :** नाम म्हणजे श्रीमहाराजांचा प्राण आहे. नाम आणि श्रीमहाराज यात भेद नाही. नामस्मरण म्हणजे श्रीमहाराजांचेच स्मरण आहे.

**पू. बाबा :** पण आपल्याला तसे वाटते का? श्रीमहाराज म्हणजे आपण त्यांचा देह, त्यांचे रूप समजतो. लो. टिळक म्हटल्यावर जशी विशिष्ट व्यक्ती डोळ्यांसमोर येते, तसे हे आहे. देहापलीकडचे अस्तित्व आपण जाणतच नाही.

**साधक ग:** आपण व्यक्तीला त्याची ओळख पटण्यासाठी - आयडेंटिफिकेशनसाठी - देतो ते नांव आणि नामस्मरणातील नाम यात फरक आहे. अव्यक्ताचे नांव व्यक्ताच्या नांवासारखे सीमित नाही.

**पू. बाबा :** पण नाम घेतांना आपल्याला तसे वाटते का?

**साधक ड :** मला वाटते की समाधीचे दर्शन घेतांना, रामाचे दर्शन घेतांना, प्रदक्षिणा करतांना किंवा श्रीमहाराजांचे शेजघरात जातांना, ते आहेत असा एकसारखा भाव ठेवला तर नामस्मरण चांगले होते.

**साधक** : तो भाव आणणे आणि टिकविणे देखील आपल्या हातात नाही. माझा अनुभव सांगतो. एकदा गोंदवल्यास समाधीचे दर्शन घ्यावयाला गेलो त्यावेळी तेथे आणखी कोणी नव्हते आणि एकाएकी मला काय झाले कोणास ठाऊक, पण अगदी मोठ्याने रडू आले. समाधीकडे पाहून हेच माझे आईबाप असे वाटले. त्या रडण्यात देखील आनंद होता. तो भाव परत यावा असे वाटते पण येत नाही. म्हणून म्हणतो की भाव आणणे देखील त्यांच्याच हातात आहे.

**पू. बाबा** : ज्ञानाचा अजपाजप, योगाचा अजपाजप आणि भक्तीचा अजपाजप यांचा आपल्याला समन्वय करता येईल. देहावर, हा देह त्याचा म्हणून नियंत्रण ठेवायचे, विचार त्याचाच करायचा, नाम त्याचेच घ्यायचे असे करता येईल.

**साधक प** : मला विचार टिकविणे जास्त सोपे वाटते. माझा अनुभव असा आहे की गोंदवल्याला असतांना नामस्मरण चांगले होते. एक प्रकारचा हलकेपणा वाटतो. तो येथे आल्यावर टिकत नाही; शक्तिपात होतो. अनुभवांच्या मागे लागण्यात देखील शक्तिपात होतो.

**|१८५|** (१८ जानेवारी १९९१)

साधक ब यांनी दिलीपकुमार रॉय यांनी लिहिलेल्या 'योगी श्रीकृष्णप्रेम' यांच्या चरित्रातील एक शंका पू. बाबांना विचारली. दिलीपकुमारना लिहिलेल्या एका पत्रात कृष्णप्रेम म्हणतात :

The more one goes on in this path, the more one feels the limitations not only of speech, but of thought. The mind is too heavy, too coarse. It will not respond, or responds but imperfectly, to the subtle vibrations that as it were come to it from above. The highest truth must needs be presented in symbols... Symbols are born not made. They descend from above and cannot be artificially manufactured... From below one can compile only allegories : real symbols are given from above. But, when given, one can learn far more from them than from words, (Yogi Shri Krishnaprem by Dilip Kumar Roy. Bharatiya Vidya Bhavan 1975. Page 19)

(कोणीही या मार्गात जसजसा पुढे जातो तसतशा केवळ भाषेच्याच नव्हे तर विचारांच्या मर्यादाही त्याला जाणवू लागतात. मन जड व स्थूल आहे. जणू काही वरून येणाऱ्या, सूक्ष्म स्पंदनांना ते प्रतिसाद देऊ शकत नाही आणि दिलाच तर हा प्रतिसाद अपूर्ण असतो. सर्वोच्च सत्य चिन्हांनीच सांगावे लागते. चिन्हे जन्मतात; ती कोणी तयार करीत नाही. ती वरून येतात; ती कृत्रिम रीतीने निर्मिता येत नाहीत. खालच्या पातळीवर रूपके किंवा दृष्टांत मांडता येतात. खरी चिन्हे वरून दिली जातात. पण ती मिळाली की त्यांपासून शब्दांपेक्षा कितीतरी जास्त शिकावयाला मिळते.)

पत्रातील भाग मोठ्याने वाचून दाखवून पू. बाबा म्हणाले, संकेत - इंग्रजीत त्यांना signs म्हणतात - हे मानवनिर्मित असतात. उदाहरणार्थ लाल दिवा दिसला की, गाडी थांबवावयाची. सुवासिनीने हिरवी साडी, हिरवे चुडे घालावयाचे इत्यादी. याच्या उलट symbols ईश्वरनिर्मित आहेत. ॐकार ही असी symbol आहे. जे शब्दांनी सांगता येत नाही ते symbols - चिन्हांनी सांगितले जाते. नाम हे एका बाजूला जडाला धरून आहे तर दुसऱ्या बाजूला परमात्मस्वरूप आहे. भगवंताने किंवा गुरूने दिलेले नाम हे पूर्ण आहे. तो माणसाने निर्माण केलेला संकेत नाही. नाम सर्वशक्तिमान आहे, नाम सर्वव्यापक आहे, नाम शाश्वत आहे, नाम सूक्ष्म आहे. म्हणून नाम हेच सर्वस्व आहे.

नाम शक्तिरूप आहे याचा आपल्याला अनुभव आहे का? तुकाराम महाराजांनी 'नामाचिया बळें। अवघियांचें तोंड काळें केलें।' म्हटले आहे. म्हणजे नामात शक्ती आहे. तिची प्रचीति आली असे केव्हां म्हणता येईल? माझा अनुभव सांगतो. एकदा मला खूप राग आला तेव्हां नामस्मरण सुरू करताच तो नाहीसा झाला. नामाच्या शक्तीची प्रचीति केव्हां येईल?

**साधक प** : 'मी' नामाच्या शक्तीची प्रचीति पहाणार आहे ह्या संकल्पातच शक्तिपात आहे. सद्गुरूंनी दिलेले नाम शक्तिस्वरूप आहे आणि ते आपले काम करीलच. जर भगवंत हृदयात आला तरच नामाच्या शक्तीची कल्पना येईल.

**साधक ब** : आमच्या हृदयात घाण आहे. वासना आहेत, विकार आहेत. ते सगळे साफ नाहीसे करायचे काम देखील नामच करील. म्हणून श्रद्धेने नाम घेत राहावे. त्याच्या शक्तीचा विचार करू नये.

**पू. बाबा (साधक क ना)** : नाम हे व्यापक आहे. ते जडात किंवा दृश्यात आले की मर्यादा आल्या. तुलसीदासांनी म्हटले आहे की, श्रीरामाने त्याच्या काळातील पुष्कळांचा उद्धार केला पण नाम अनंत काळ हे कार्य करीत आले आहे.

"रामु एक तापस तिय तारी। नामु कोटि खल कुमति सुधारी॥२३.२॥
ब्रह्म राम तें नामु बड बर दायक बर दानि।
रामचरित सत कोटि महँ लिय महेस जियँ जानि॥२५॥ रामचरित मानस प्रथम सोपान

ही चर्चा चालू असतानाच पू. बाबांनी Force (बल) म्हणजे काय असे विचारले.

**साधक प** : न्यूटनचा दुसरा सिद्धान्त Force (बल) चे कार्य सांगतो. गतिमान पदार्थ, उदाहरणार्थ फेकलेला चेंडू बाह्य प्रतिबंध आल्याखेरीज थांबणार नाही किंवा स्थिर चेंडू बाहेरून बल किंवा जोर लावल्याखेरीज आपले स्थान सोडणार नाही.

**पू. बाबा** : दृश्यात आपल्याला कार्यावरून बल किंवा शक्ती समजते. उदाहरणार्थ, व्यायामाने शरीराची शक्ती वाढते किंवा अशक्त झाल्यास व्हिटॅमिन्स घेऊन शक्ती वाढवता येते. पण नामाने आपली शक्ती वाढते हे कसे ओळखायचे?

**साधक प** : नामाने शक्ती वाढतेच; पण ती लगेच खर्चही होते. नामाने शक्ती वाढली आणि विकार कमी झाले नाहीत तर त्या शक्तीचा दुरुपयोग होईल. म्हणून सर्व बाजूंनी वाढ होईल तेव्हांच शक्ती वाढली आहे हे समजेल.

**साधक ब** : विकार कमी करावयाचे काम देखील नामच करील. आज अशी स्थिती आहे की बाकी सगळ्या गोष्टी मी करतो आणि नाम मात्र गुरूंनी करवून घ्यावे म्हणतो.

**साधक प** : आत्तापर्यंतच्या जीवनात 'मी'चा कर्तेपणा पोसलेला आहे. म्हणून आज माझ्या हाती तासभर, दोन तास, तीन तास असे क्रमाक्रमाने जास्त नाम घेण्याची खटपट करणे हेच आहे. तेच नाम माझी शक्ती वाढवील. तथापि वाढ़त असलेली शक्ती मला समजली पाहिजे हा अट्टाहास कशाला? माझे शरीर कसे कार्य करते हे कोठे मला माहीत आहे? शरीर चालण्यासाठी ते माहीत होण्याची जशी आवश्यकता नाही तशी नामाची शक्तीही माहीत होण्याची आवश्यकता मला वाटत नाही.

**पू. बाबा** : गोंदवल्याला आपण तुकाराम महाराजांच्या "जाणोनि नेणतें करीं माझें मन। तुझी प्रेमखूण दावूनिया॥" या अभंगाचा अर्थ लावला होता. वाढत असलेली शक्ती समजणे ही प्रेमखूण आहे असे नाही का म्हणता येणार?

**साधक ड :** ही शक्ती वाढायला आपला होणारा शक्तिपात थांबला पाहिजे.

**साधक ग :** नामाच्या शक्तीची आम्हाला कल्पना येत नाही. नाम पूर्ण आहे असे वाटत नाही आणि म्हणून वाचन लेखन इत्यादींमागे आम्ही लागतो. ज्याला नामाची शक्ती कळली आहे तो नामस्मरणाशिवाय दुसरे काही करणारच नाही.

**साधक क :** नामाची शक्ती कळणे म्हणजे नामाच्या ताब्यात जाणे आहे.

**पू. बाबा :** नामामुळे शक्ती वाढू लागली की, मला वाटते, अशा माणसाच्या प्रतिक्रिया तीव्र राहणार नाहीत. तो शांत होईल, स्वस्थ होईल. 'असू दे' असे त्याला वाटू लागेल. म्हणून आपण चिकाटीने नामाच्या मागे लागले पाहिजे.

## |१८६| (२५ जानेवारी १९९१)

**पू. बाबा :** ह्या आठवड्यात एक गृहस्थ भेटायला आले होते. १९५७ ते ७४ पर्यंत ते पावसला स्वामी स्वरूपानंदांकडे जात असत. ते 'नासा'त (NASA) काम करणाऱ्या त्यांच्या एका नातेवाइकांकडे अमेरिकेत गेले होते. तेथे त्यांची प्रो. कार्टर नावाच्या एका शास्त्रज्ञाशी भेट झाली. प्रो. कार्टर Gnome Institute of Genetics मधे DNA वर काम करीत आहेत. त्यांनी संशोधन करून असे दाखवून दिले आहे की आपण जो विचार करतो त्याने आपल्या पेशींमधील DNA मध्ये तात्पुरता बदल घडतो. प्रो. कार्टर यांच्याकडे एक मिस्टिक (Mystic) आलेला होता. त्याला ह्या गृहस्थांनी त्यांच्याजवळचा स्वामींच्या फोटोंचा आल्बम दाखवला. आल्बममधील फोटो पाहून तो म्हणाला की, पूर्वायुष्यापासून उत्तरायुष्यापर्यंत ह्यांच्या शरीरात जेनेटिक (Genetic) फरक झालेले मला दिसत आहेत. हे शरीराने बारीक आणि अशक्त दिसत असले तरी त्यांची आत्मशक्ती विलक्षण आहे. मला त्यांच्याभोवती बोम-बोम असा आवाज (स्वामींचे सोऽहम्) ऐकू येतो आहे. पू. बाबा म्हणाले, प्रो. कार्टर यांच्या मते DNA च्या प्रोग्रॅममध्ये तात्पुरता बदल होणे शक्य आहे. पण मला वाटते की साधनाने तो मुळापासून बदलत असावा. पाँडिचरीच्या मदरनी cells - पेशी बदलतात म्हटले आहे किंवा तुकाराम महाराजांनी 'मनेसहित पालटे काया।' म्हटले आहे ते हेच असावे.

विचाराने DNA मध्ये फरक होत असेल तर तो टिकाऊ होण्यासाठी काय करावे ?

**साधक प** : एकच विचार पुन्हा पुन्हा केल्याने तो स्मृतीत जाऊन 'आपला आत्मसात' म्हणजे इंटर्नलाइझ (Internalise) होईल. माणसाचे सर्व वागणे त्याच्या स्मृती, भावना, वासना, विचारांचा घाट इत्यादींना धरून चालते. आज आपली जीवनपद्धती प्रपंचाच्या बाजूला आहे. ती भगवंताकडे वळविण्यासाठीच साधन असावे. विचाराने हे पटले तरी हा विचार Genes मध्ये उतरून 'आपला' होत नाही तोपर्यंत साधन आवश्यक आहे. प्रतिकूल परिस्थितीचा आघात होऊन मन अस्वस्थ होते पण साधनानेच मनाची हळूहळू तयारी होत जाईल आणि परिस्थितीचा मनावर होणार परिणाम क्रमाक्रमाने कमी होत जाईल. त्याचप्रमाणे प्रतिकूल परिस्थितीही कायम टिकणारी नसते हे लक्षात ठेवले तर मनाला थोडासा दिलासा मिळेल. सर्वच क्षणभंगूर आहे तशी परिस्थितीही क्षणभंगूर आहे! ही प्रक्रिया (process) आहे, एकदम होणारी गोष्ट नव्हे. दुःख करणे बरोबर नाही असे एकदा मनाला कळले तरी त्याची तीव्रता हळूहळू कमी होत जाईल. जेव्हां ती शिकवण Genes मध्ये खोल उतरेल तेव्हां मन खऱ्या अर्थाने शांत होईल. एका साधकांनी त्यांचा अनुभव सांगितला. त्यांच्या पत्नीला मधुमेह झालेला आहे. सुरुवातीला रक्तातील साखरेचे प्रमाण कमीजास्त झाले की ते दोघेही अस्वस्थ होत. हळूहळू त्यांनी मनाला शिकविले की श्रीमहाराज पहातील. त्यामुळे आता पूर्वीसारखा त्रास होत नाही.

**साधक ब** : परिस्थितीचा आघात होतो तेव्हा प्रार्थनाच उपयोगी पडते. अशा वेळी प्रार्थना मनापासून होते.

**पू. बाबा** : सर्व परिस्थिती श्रीमहाराजांच्या इच्छेने आली आहे हे पटले तर परिस्थितीचा मनावर फार कमी परिणाम होतो. पू. तात्यासाहेबांचा मुलगा वारला तेव्हा त्यांनी श्रीमहाराजांना विचारले की सौभाग्यवतींना काय सांगू? श्रीमहाराज म्हणाले, त्यांना सांगावे की ज्याने दिला त्याने नेला. श्रीमहाराजांचे हे सांगणे ताईंच्या कायम लक्षात राहिले. पुढे श्री. दिनकरराव खूप आजारी झाले त्यावेळी त्या शांत राहिल्या. कारण ज्याने दिला त्याला ठेवावयाचा असला तर तो राहणारच आणि न्यावयाचा असला तर तो जाणारच हा विचार आत्मसात झालेला होता. प्रतिकूल परिस्थितीत आपल्या कर्तृत्वाच्या मर्यादा लक्षात ठेवल्या पाहिजेत.

एकदा पू. तात्यासाहेबांच्या मुलीचे पत्र आले की सासरी फार त्रास आहे. काही वेळा आत्महत्येचे विचार मनात येतात. सासूची बुद्धी बदलली तर बरे. हे

श्रीमहाराजांना सांगितल्यावर ते म्हणाले, हा परोपकार कशाला? सासू कशाला सुधारायला पाहिजे? त्यापेक्षा आपण कां सुधारू नये? सौ. ताई म्हणाल्या, सासू-सुनांचे इतके नमुने पाहिले, त्यात हा एक! श्रीमहाराजांची इच्छा!

आपल्या नातेवाइकांबद्दल आपण हाच विचार, हीच भावना ठेवली पाहिजे. त्यांचे जे व्हावयाचे आहे तेही श्रीमहाराजांच्या इच्छेने होणार आहे. मग काळजीचे कारण काय?

**साधक प** : आपल्यालाही तेच लागू आहे. इतरांच्या बाबतीत श्रीमहाराजांची इच्छा म्हणणे सोपे आहे. पण आपल्यालाही तेच लागू आहे ही आठवण ठेवावी. जीवनात प्रतिकूल परिस्थिती येऊन संकट वाटल्यास प्रार्थना होते हे खरेच, पण रोजच्या जीवनात सर्वच बाबतीत प्रार्थनेची गरज वाटली पाहिजे. रोजचे जीवनच संकट वाटावे कारण सुखात आपण भगवंताला विसरतो.

**पू. बाबा** : प्रतिकूल परिस्थितीचा जर मनावर फारच परिणाम झाला आणि प्रार्थना करूनही स्वस्थता वाटली नाही तर सत्संगती उपयोगी पडते. अशा वेळी निदान चांगल्या साधकाकडे जावे. परिस्थिती कशीही असो, आपल्या वाट्याला आलेले कर्म उत्तम करावे.

**साधक क** : उत्तम म्हणजे मनापासून करावे असेच ना?

**पू. बाबा** : उत्तम म्हणजे मनापासून नव्हे.

**साधक क** : मग कसे?

**साधक प** : नाटकात काम उत्तम झाले तरी आत मी तो नाही ही जाणीव जसा नट ठेवतो तसे हे कर्म आहे. कर्म हे एक प्रकारे सोंग आहे. हे सोंग करताना मनाच्या दोन स्तरांवर आपल्याला राहावे लागेल. आपण कर्मात स्वत:ला झोकून देतो आणि भगवंताला विसरतो. तसे करू नये.

**पू. बाबा** : विविध आणि परस्परविरोधी इच्छांमुळे (varied and conflicting desires) आपल्या शक्तीचे विभाजन होते आणि त्यामुळे नामस्मरणाला शक्ती कमी पडते. परस्पर विरोधी इच्छा पूर्ण होणार नाहीत हे आपण विचाराने स्पष्ट समजून घेतले पाहिजे.

मन शांत राहिले पाहिजे. त्यासाठी अभ्यास पाहिजे हे खरे, पण या सर्वाचा हेतू काय असा मुद्दा निघाला. हे सर्व करणाऱ्या 'मी'ला कोठेतरी बाजूला ठेवता आले पाहिजे. हे व्हावयाला विचार थांबून काही वेगळीच प्रक्रिया होत असावी. विचार थांबले तर व्यवहार होईल का?

**साधक क :** काही काळ तरी त्या अवस्थेत व्यवहार होणार नाही. योगी त्या अवस्थेत गेला की एकवीस दिवसांत देह सोडतो असे श्रीरामकृष्ण म्हणत. त्या देहाकडून जगातील काही कार्य व्हावयाचे असेल तर ईश्वर त्याला जिवंत ठेवावयाची व्यवस्था करतो.

**पू. बाबा :** आतून तयारी झाली की गुरुकृपा होते.

**साधक प :** ज्याप्रमाणे विवेकानंद रस्त्यातून धावत सुटले तशी तळमळ लागावी. सद्गुरु त्याची वाटच पहात असतात. श्रीमहाराज म्हणाले की, शरीर आणि मन तयार नसेल तर मृत्यू किंवा वेड लागावयाचा संभव असतो. भगवंताचे ज्ञान व्हावयाला शरीर व मन शुद्ध आणि पवित्र असणे जरूर आहे. साधनाने सत्त्वगुण वाढीला लागतो.

## |१८७| (१ फेब्रुवारी १९९१)

**पू. बाबा :** आज एक बाई भेटायला आल्या होत्या. त्यांनी त्यांच्या गुरूंना विचारले की, परमार्थासाठी काय केले पाहिजे? ते म्हणाले की, काळाच्या पलीकडे गेले पाहिजे. बाईंनी काळ म्हणजे काय म्हणून विचारले. ते म्हणाले की जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांच्या पलीकडे काळ आहे; या उत्तराने बाईंचे समाधान झाले नाही म्हणून त्यांच्या गुरूंनीच त्यांना माझ्याकडे पाठविले होते. मी त्यांना सांगितले की माणूस, परमेश्वर यांच्या जशा निश्चित व्याख्या करता येत नाहीत, केवळ वर्णन करता येते तशी काळाचीही व्याख्या करता येणार नाही, वर्णन करता येईल. सकारात्मक **(Affirmative)** वर्णन करायचे झाले तर, आपल्याला घडणाऱ्या घटनांचे भान असते. त्यांचा आपण आधी, नंतर असा क्रम लावतो. ते भान गेले की आपण काळापलीकडे जाऊ. ते भान जाण्यासाठी जाणिवेत बदल झाला पाहिजे. ध्यानामधे, ध्यान लागते तेवढा वेळ काळाचे भान नाहीसे होईल. श्रीमहाराज म्हणाले, मोटार उतरणीला लागली की इंजिन बंद करतात तरी ती आपोआप वेगाने खाली उतरते. तसे नाम घेता घेता, घेणारा थांबला तरी नाम प्रयत्नरहित चालू राहते. असे नाम होऊ लागले की समजावे की काळाच्या पलीकडे जाण्यासाठी आवश्यक तो परवाना आपल्या हाती आला आहे. त्यासाठी अखंड नामस्मरणाची गरज आहे, कारण नामस्मरणात 'मी'चा विसर आहे. सुरुवातीला 'मी नाम घेतो' असा भाव राहील पण शेवटी नामस्मरण होत राहील. कबीराच्या नांवावर एक दोहा सांगितला जातो. त्या दोह्यात ध्रुव,

प्रल्हाद, नारद ज्या नामाने तरले 'वह नाम कुछ और' असे म्हटले आहे. खरे म्हणजे नाम तेच राहते. साधनाचा परिणाम होऊन नाम घेणारा 'कुछ और' होतो. एकदा एक साधक श्रीमहाराजांना म्हणाले, आपण भेटलात; आता नामस्मरण कशाला पाहिजे? श्रीमहाराज म्हणाले, पण मी तुम्हाला जिवंत पाहिजे ना? नाम हा माझा प्राण आहे.

काळाचा नकारात्मक (Negative) विचार करायचा म्हणजे आता फार थोडे दिवस राहिले, केव्हा जावे लागेल कोणास ठाऊक असे वाटून वेळ फुकट न घालवण्याची तळमळ लागली आणि नामस्मरण वाढले तरी माणूस काळाच्या पलीकडे जाईल.

**साधक प** : 'मी नामस्मरण करतो' असे जोपर्यंत वाटते तोपर्यंत काळाच्या पलीकडे जाता येणार नाही. नामस्मरण 'झाले' पाहिजे.

**साधक ज** : नाम घेण्यापेक्षा आत नाम चालू आहे आणि मी ते ऐकतो आहे असा भाव ठेवला तर नाम हे कर्म होणार नाही.

**पू. बाबा** : कर्म जड आहे. जोपर्यंत नामस्मरण हे कर्म आहे तोपर्यंत ते जडच राहणार. त्यात भगवंताच्या अस्तित्वभावाचा प्राण आला की नाम 'जिवंत' होते. मग ते कर्म राहात नाही. तुलसीदासांनी नामाला 'चारु चिंतामणि' सुंदर रत्न म्हटले आहे. मीराबाईही 'रामरतन धन' म्हणते. नाम मूल्यवान आहे. तो चिंतामणि आहे. मी ज्याची इच्छा करेन ते सगळे मला नामातच मिळेल अशी खात्री झाली पाहिजे. केवळ, आता माझ्याजवळ आहे ते पुरे येवढ्यापुरतीच विरक्ती न राहता, सगळे गेले तरी चालेल पण नाम राहिले पाहिजे इतके ते मूल्यवान वाटू लागले म्हणजे काळाच्या पलीकडे जाता येईल.

**साधक प** : नाम 'चिंतामणि' आहे; त्याच्यापासून पाहिजे ते मिळेल ही खात्री झाली की साधक नामाजवळ दुसरे काही मागणारच नाही.

**साधक क** : आपली जाणीव खोल आहे. तेथपर्यंत नाम गेले की आपण काळापलीकडे जाऊ.

पू. बाबांनी नंतर ब्रदर लॉरेन्सच्या The Practice of the Presence of God या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. तो म्हणतो की, स्वयंपाक घरात काम करतांनाही माझे प्रभूचे स्मरण प्रार्थना करताना जेवढ्या तन्मयतेने होते तेवढ्याच तन्मयतेने होते. पू. बाबा म्हणाले, आपण तत्त्व म्हणून याचा स्वीकार केला पाहिजे. दिवसाचा सर्व वेळ कोणतेही काम करत असलो तरी आत नामस्मरण चालू राहिले पाहिजे. श्रीमहाराज

म्हणत की दररोज रिकामा जाणारा वेळ नामस्मरणात घालवलात तरी नामाच्या राशी पडतील.

## |१८८| (८ फेब्रुवारी १९९१)

पू. बाबांचा आज वाढदिवस. आज त्यांना ~~त्यांना~~ ८३ वे वर्ष लागले. आज तिथीनुसार दासनवमी आहे. आज खूप गर्दी होती - म्हणून आम्ही मागेच थांबलो होतो. तथापि साडेसहा वाजता दर शुक्रवारी जाणाऱ्या आम्हाला पू. बाबांनी पुढे बोलावले. नमस्कार करून आम्ही खाली बसलो.

**पू. बाबा :** पू. तात्यासाहेबांचा शहात्तरावा वाढदिवस होता. बुधवार होता असे वाटते. काही कारणाने मी कॉलेजात गेलो नव्हतो. श्रीमहाराजांनी केशवराव आहेत का म्हणून चौकशी करून मला बोलावून घेतले आणि विचारले की आज हा (पू. तात्यासाहेब) शहात्तर वर्षांचा झाला; म्हणजे काय झाले? मी गप्प राहिलो. श्रीमहाराज पुढे म्हणाले, जे वाढायचे (शरीर) ते वाढते आणि त्याबरोबर देहबुद्धीही वाढते. ज्याला कधी वाढ नाही आणि घट नाही त्याचा (आत्मस्वरूप) वाढदिवस कसला करणार? वास्तविक वाढदिवस म्हणजे आपला पारमार्थिक अनुभव वाढतो आहे ना ते पाहिले पाहिजे. शरीर वाढते त्याचे काय महत्त्व? ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे प्रत्येक वाढदिवसाला आपण मृत्यूच्या जास्त जास्त जवळ जातो. (जन्मलिया दिवसदिवसें। हों लागे काळाचेयाचि ऐसें। कीं वाढती करिती उल्हासें। उभविती गुढिया॥ ज्ञानेश्वरी ९.५१२॥)

ज्यांची देहबुद्धि गेली असे तुकाराम महाराजांसारखे संत म्हणतात की 'प्रेतरूप झाला शरीराचा भाव। लक्षीयेला ठाव स्मशानीचा'॥ पूर्ण अभंग सांगून पू. बाबा म्हणाले, काय अवस्था असेल त्या सत्पुरुषांची! जे जन्माला आले त्याचा नाश ठरलेलाच आहे. वाढदिवसाप्रमाणे सत्पुरुषांची पुण्यतिथी देखील ते ज्या दिवशी या जगातून देहाने गेले त्या दिवशी साजरी करतो. यासंबंधी श्रीमहाराज एकदा म्हणाले की ही त्याची (सत्पुरुषाची) खरी पुण्यतिथी नव्हे. ज्या दिवशी तो देहबुद्धीने मेला (त्याची देहबुद्धि नाहीशी झाली) ती त्याची खरी पुण्यतिथी. ती आपणाला ठाऊक नसते म्हणून त्याच्या देहाच्या मृत्युतिथीला आपण पुण्यतिथी मानतो.

पू. बाबा पुढे म्हणाले, तुकाराम महाराज किंवा ज्ञानेश्वर महाराज यांचे ग्रंथ वाचतांना आपली मनाची पातळी वर जाते. ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरी कां

लिहिली असावी? मला वाटते - नाही, माझी खात्री आहे की त्यांनी, ego (अहम्) नाहीसा करण्याकरिता इतका व्यापक करायला सांगितला आहे की फुगा जास्ती फुगवला की जसा फाटून जातो तसा 'मी' चा संकुचितपणा नाहीसा होऊन 'हे विश्वची माझें घर' अशी अवस्था झाली पाहिजे. अमृतानुभवाच्या शेवटी त्यांनी म्हटले आहे की सूर्य जसा केवळ स्वत:साठी प्रकाशत नाही तर सर्व जगाला प्रकाश देतो तसा मला झालेला आनंद सर्व जगाला व्हावा म्हणून मी हे सांगितले आहे.

परि गा श्रीनिवृत्तिराया। हातातळीं सुखविलें तुयां।
तऱ्हि निवांतचि मिया। भोगावें कीं तें॥
परि महेशें सूर्याहातीं। दिऱ्हली तेजाची सुती।
तियें भासें अन्तर्वर्ती। जग केलें कीं॥ अमृतानुभव १०.१-२॥

**साधक क :** दासबोधानंतर आत्माराम लिहितांनाही शिष्याचे निमित्त करून समर्थांनीही अशा स्वरूपाचेच उद्‌गार काढले आहेत. ते म्हणतात :

तुवां आशंका नाहीं घेतली। परंतु मज तुझी चिंता लागली।
कां जें तुझी भ्रांति फिटली। नाहींच अद्यापि॥१९॥
दासबोधींचे समासीं। निर्मूळ केलें मीपणासी।
तया निरूपणें ही वृत्तीसी। पालट दिसेना॥२०॥
म्हणोनी न पुसतां सांगणें। पडलें शिष्या तुजकारणें।
आतां तरी सोय धरणें। श्रवण मननाची॥२१॥

**पू. बाबा :** एखादेवेळी आपल्याला साधले असे वाटेल पण साधलेले टिकवणे फार अवघड आहे. मोठमोठ्यांनाही ते जमत नाही. येथे त्याचा तसा संबंध नाही, पण डॉ. राधाकृष्णननी येशू ख्रिस्ताचे उदाहरण दिले आहे. त्याला जेव्हां क्रुसावर चढवून खिळे ठोकले तेव्हां दु:खाने कळवळून तो एकदम म्हणाला, 'भगवंता! हा विषाचा पेला मला कां?' पण लगेच सावरला आणि म्हणाला, 'भगवंता! तुझ्या इच्छेप्रमाणे होऊ दे.' Thy will be done! साधन करताना असे सद्गुरूंवर सोपवून दिले पाहिजे. परमात्मा हृदयात कोंदला आहे. तो बाहेर पडायला पहातो पण देहबुद्धि त्याला आत दडपते.

काहीही करून साधन वाढविले पाहिजे. साधनात तळमळ पाहिजे. आचार्य अत्र्यांनी लोकमान्य टिळकांवरील लेखाची सुरुवातच अशी केली आहे की लोकमान्य म्हणजे तळमळ, प्रचंड तळमळ! साधनात तळमळ आली की मग

आणखी कर म्हणून सांगावे लागणार नाही. पुष्कळ माणसे असलेल्या घरात, पूर्वीच्या काळी नवीनच लग्न झालेल्या मुलीला रात्र केव्हां होते आणि पति केव्हां भेटतो असे होत असे कारण चारचौघात त्याच्यासमोर उभे राहण्याचीही चोरी असे; त्याप्रमाणे केव्हां वेळ मिळतो आणि नामस्मरणाला बसतो असे साधकाला झाले पाहिजे. आपले साधन रटाळ होते. तसे ते होता कामा नये. साधनात उत्कटता पाहिजे. उत्कटता हा श्रीमहाराजांचा मोठा गुण म्हणून पू. तात्यासाहेब सांगत. त्यांच्याकडे येणाऱ्याची काहीही शंका किंवा अडचण असो, श्रीमहाराज त्याला अति उत्कटतेने, परोपरीने सांगत असत. इकडे पू. तात्यासाहेबांना ऑफिसला जायचे असे पण श्रीमहाराज कंटाळत नसत.

**साधक ग** : मागे गोंदवल्याला आपण साधन वाढावयाला कृतज्ञता भावाचा उपयोग होईल असे म्हटले होते. मला वाटते, या भावाचा साधन वाढावयाला खूप उपयोग होतो.

**पू. बाबा** : होय. माझी लायकी काय, आणि श्रीमहाराजांनी मला किती दिले! मान, पैसा, घरदार, मुलेबाळे, सगळे माझ्या लायकीपलीकडे दिले. इतकेच नव्हे तर अनुग्रह देऊन मला मार्गाला लावले असे वाटले पाहिजे.

**साधक ब** : खरोखर कृतज्ञतेतून साधनाला जोर येईल.

**पू. बाबा** : असो. ही आपली गांजेकसांचीच बैठक आहे! आपला वेळ घालवून भगवंतासंबंधी कोण बोलतो? जुनी गोष्ट आहे. येथे येणारे एक गृहस्थ चिपळूणला होते तेव्हां तेथील एका देवळात जात असत. त्या देवळात एक बैरागी होता. तो गांजा ओढीत असे. त्या बैराग्याबरोबरच एक गुजराथी माणूस झुरका मारीत असे व त्यानंतर मोठे अनुप्रासयुक्त बोलत असे. ह्या गृहस्थांना वाटे की आपल्याला तसे बोलता यावे आणि त्या हेतूने ते गांजा ओढू लागले. तथापि या गोष्टीचे त्यांना वाईट वाटे आणि कधीही ते श्रीमहाराजांसमोर बसत नसत. बाहेर पायरीवर त्यांची बैठक असे. आपले त्या गांजेकसांप्रमाणेच आहे. भेटलो की आनंद होतो. वेळेचे भान राहात नाही.

## ।१८९। (१५ फेब्रुवारी १९९१)

**पू. बाबा** : एकदा श्रीमहाराजांनी परमार्थपर काही गोष्टी सांगून झाल्यावर 'आणखी काय' म्हणून विचारले तेव्हां मी म्हणालो, साधन व्हावेसे वाटते तितके होत नाही, याला काय करावे? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, एकदम

झपाट्याने वाढ झाली तर ती सहन होणार नाही; म्हणून होईल तेवढेच गुरु करून घेतात. त्यात समाधान मानावे. नाहीतर दुसरा मार्ग म्हणजे घर सोडून एकदम बाहेर पडावे आणि 'त्याच्यावर' सोपवावे. काय होईल याची चिंता करू नये. श्री. बाबा काशीकर बाजूला बसलेले होते, त्यांच्याकडे वळून श्रीमहाराज म्हणाले, मग सकाळी उठल्याबरोबर चहा मिळणार नाही. श्री. काशीकर म्हणाले, ती कल्पनाही सहन होत नाही. श्रीमहाराज म्हणाले, खरी अडचण अशी आहे की शिष्यच गुरूला शिकवू लागले आहेत. आम्ही गप्प बसलो. श्रीमहाराज पुढे म्हणाले, आपण मेणासारखे व्हावे. गुरु देतील तो आकार बिनतक्रार घ्यावा. जणु काही गुरु प्रयोगासाठी आपल्याला हाताशी धरत आहेत असे समजावे. स्वामी रामदासांनीही In the Vision of God मधे असेच म्हटले आहे असे पू. बाबा म्हणाले आणि त्यांनी त्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. स्वामी रामदासांनी म्हटले आहे की एका रात्री निश्चय करून ते बायकोमुले, घरदार सोडून बाहेर पडले. अष्टौप्रहर एखाद्या यंत्राप्रमाणे त्यांचा रामनामाचा जप चालू होता. त्या मंत्रामुळे निर्भय बनून मेणासारखे ते भगवंताला शरण गेले आणि कधीही पुसता येणार नाही असा राममंत्र त्यांच्या जिभेवर राहिला.

(A feeling of perfect assurance, security and protection was ever with him. The powerful Ram-mantram never left his lips. "He was uttering it like a machine." It has been revealed in "In the Quest of God," how miraculously he was more than once saved from terrible situations." It seemed as if God had taken him up for His experiments - to mould, transform and manipulate him as He willed - a wax lump in His dexterous hands." - In the Vision of God by Swami Ramdas. From preamble page 3, 6th edition 1985.)

पू. बाबा पुढे सांगू लागले, श्रीमहाराजांबरोबर एकदा कर्नाटकात गेलो होतो तेव्हां एका शिल्पकाराचा कारखाना पहावयास गेलो होतो. तेथून परत आल्यानंतर श्रीमहाराजांनी विचारले, तेथे काय पाहिले? मी पूर्ण झालेल्या, अर्ध्या झालेल्या आणि नुकतीच सुरुवात केलेल्या काही मूर्तींचे वर्णन केले. ते ऐकून श्रीमहाराज म्हणाले, ज्या दगडातून ह्या मूर्ती बनवतात तो दगड जसा

शिल्पकाराच्या आधीन असतो तसे सद्गुरूंच्या आधीन व्हावे म्हणजे ते त्यांना वाटेल तसा तुम्हाला आकार देतात. आपल्यामधून कोणती मूर्ती बनवावी हे जसे दगड ठरवीत नाही त्याप्रमाणे आपली प्रगती कशी व्हावी हे आपण ठरवू नये. ते सर्वस्वी सद्गुरूंवर सोपवावे. त्यांना पूर्ण शरण जावे.

**साधक ग** : शरण आहे असे नुसते म्हणून शरण जाता येत नाही हीच खरी अडचण आहे.

**पू. बाबा** : या बाबतीत ब्रदर लॉरेन्सने काय म्हटले आहे पहा. तो म्हणतो:

**"My most usual method is simple attentiveness and a loving gaze upon God--- My regular hours of prayer are a continuation of the same exercise. I then sometimes picture myself as a piece of stone, of which a mason is to make a statue; presenting myself thus before God, I ask Him to make His image perfect in my soul, and to render me entirely like to Himself." Practice of the presence of God. Page 43.**

भगवंताकडे जातांना आपले विचार, भावना, कल्पना, पूर्वग्रह इत्यादी बाजूला ठेवून शुद्ध अंत:करणानेच जावे लागेल.

ह्या आठवड्यात भेटायला आलेल्या काहीजणांनी जप करतांना चित्त एकाग्र होत नाही; काय करावे, असे विचारले होते. ब्रदर लॉरेन्सने याचे उत्तर दिले आहे की आपल्या मनाला भटकण्याची सवय लागलेली असते. त्याला वळण लावण्यासाठी निश्चय पाहिजे. त्याचबरोबर शरणागती व प्रार्थना पाहिजेत. एखाद्या श्रीमंत माणसाच्या दारात एखादा मुका भिकारी जसा लाचार होऊन उभा असतो तसा भाव हवा. मन भरकटले तरी त्यावर फार विचार न करता अभ्यास चालू ठेवावा म्हणजे भगवंताला तुमची दया येईल.

**साधक प** : माझ्या इच्छाशक्तीने मी मनात येणारे विचार थांबवू शकेन असे म्हणणे कठीण आहे. मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार यांमधील चित्तामुळे कदाचित मनावर ताबा येत असावा. मनापेक्षाही अहंकाराचा जास्त त्रास होतो.

**पू. बाबा** : अहंकार ठेवायचाच झाला तर तो साधनाचा ठेवावा.

**साधक क** : चित्तशुद्धीसाठी साधन आहे.

**साधक ब** : शिल्पकाराच्या छिन्नीखालील दगडासारखे होणे कठीण आहे. कपच्या उडतील, रक्त निघेल पण ते अटळ आहे. त्याखेरीज दुसरा मार्ग नाही.

मनासारखे साधन का होत नाही यासंबंधी चर्चेच्या ओघात पू. बाबा म्हणाले की साधनासाठी सत्संगती, सद्विचारांची संगत किंवा नामाची संगत उपयोगी पडेल. यांपैकी पहिली म्हणजे सत्संगती मिळणे ही भाग्याची गोष्ट. सद्विचार करावयाचा तर एक विचार एकसारखा टिकविणे फार कठीण आहे. त्यासाठी जबरदस्त धारणा पाहिजे. ती आपल्याजवळ नाही हे उघडच आहे. म्हणून नामाच्या संगतीचा अभ्यास करावा. श्रीमहाराज म्हणत की आगगाडीच्या प्रवासात ड्रायव्हरवर जेवढा विश्वास ठेवता तेवढा तरी गुरूच्या सांगण्यावर ठेवावा!

**साधक ग :** श्रीमहाराज म्हणतात ते बरोबर आहे. तथापि प्रवासाच्या उदाहरणात आम्हाला कोठे जावयाचे ते माहीत असते आणि आगगाडी हे त्याचे साधन आहे हेही माहीत असते. परमार्थात काय मिळवायचे त्याची स्पष्ट कल्पना नाही आणि त्यासाठी नामस्मरण हे एकमेव साधन आहे यावरही पूर्ण श्रद्धा नाही ही खरी अडचण आहे.

**पू. बाबा :** मग श्री. भाऊसाहेबांसारखी वृत्ती ठेवावी. श्रीमहाराजांनी आज शौचाला होईल म्हणून सांगितले की ते निर्धास्त होत आणि त्यांना त्या दिवशी शौचाला होत असे!

**साधक क :** आम्हाला श्रीमहाराजांची आणि नामाची खरी किंमतच कळलेली नाही. वास्तविक श्रीमहाराजांचा अनुग्रह म्हणजे केवढे भाग्य आहे. तुलसीरामायणात भरत रामाला परत आणण्यासाठी वनात जातो तेव्हां म्हणतो की मी अधम आहे पण वसिष्ठ गुरु आणि श्रीराम यांनी मला जवळ केले आहे त्यामुळे माझे कल्याणच होईल. त्याप्रमाणे श्रीमहाराज करतात ते योग्यच. मला राहवत नाही म्हणून मी माझी इच्छा बोलून दाखवितो. तथापि ते करतील ते मी विनातक्रार मान्य करीन असा मधला मार्ग आपल्याला स्वीकारावा लागेल.

**साधक ड :** प्रत्येक गोष्ट गुरूंना सांगून करावयाची हे खरे. पण मनात विचार येतो की आपल्या मनात काय आहे ते आपल्यापेक्षाही त्यांना जास्त समजते, मग सांगावयाची काय जरूरी आहे?

**पू. बाबा :** सांगणे हा माणसाचा स्वभाव आहे. ती आपली बाजू आहे.

**साधक ग :** समजा तुमच्या मुलाच्या परीक्षेचा निकाल तुम्ही वर्तमानपत्रात वाचलात. त्याला फर्स्टक्लास मिळाला आहे. पण मुलगा भेटल्यावर त्याने तुम्हाला काहीच सांगितले नाही तर तुम्हाला ते आवडणार नाही. तसेच हे आहे.

नामाच्या मूल्याबद्दल श्रीरामकृष्णांनी सांगितलेली एक गोष्ट साधक क यांनी सांगितली. एका माणसाला एक हिरा सापडला. तो घेऊन तो एका भाजी विकणाऱ्याकडे गेला. हिऱ्याच्या बदल्यात त्याने दोन शेर वांगी देतो म्हणून सांगितले. धान्य विकणाऱ्या व्यापाऱ्याने एक पोते तांदूळ देतो म्हणून सांगितले पण त्याने जेव्हां जवाहिऱ्याला तो हिरा दाखवला तेव्हां त्याने काही न बोलता एक लाख रुपये देऊ केले. तसे केवळ सत्पुरुषांनाच नामाची खरी किंमत कळते.

समारोप म्हणून पू. बाबा म्हणाले की आता नामस्मरणावरच सर्व लक्ष केंद्रित केले पाहिजे. श्रीमहाराजांची प्रार्थना करून जास्तीत जास्त नाम घ्यावे. ते नामच पुढचा मार्ग दाखवेल.

## |१९०| (२२ फेब्रुवारी १९९१)

**पू. बाबा** : आपले साधन मनासारखे कां होत नाही यावर मी विचार केला. जे. कृष्णमूर्ती म्हणतात त्याप्रमाणे Life has not become a problem जीवन हे समस्या बनलेले नाही; समस्या - प्रश्न नव्हे, प्रश्न अनुत्तरित राहू शकतो. पण समस्येला उत्तर मिळाल्याशिवाय चैन पडत नाही. श्रीमहाराज म्हणत की अंगातल्या सदऱ्यात शिरलेली पिसू जशी सापडत नाही आणि सापडेपर्यंत चैन पडू देत नाही तशी समस्या असते. भगवद्गीतेवर मी जे पुस्तक लिहिले त्यातील निबंधाचा शेवटचा मसुदा (ड्राफ्ट) तयार होण्यापूर्वी त्यात अनेकदा बदल केला. कारण गीतेत नेमके काय सांगावयाचे आहे ते लक्षात येत नव्हते. युद्ध करू की नको ही अर्जुनाची समस्या होती. ही लढाई बाहेरची होतीच पण मुख्यत: ती आतली होती. श्रीमहाराज म्हणाले की ही देहबुद्धि आणि आत्मबुद्धि यांमधील लढाई होती. जीवनात अशी लढाई प्रत्येकाला लढावी लागते. त्यासाठी बाहेरच्या कुरुक्षेत्राची आवश्यकता नाही. बाहेरची लढाई जेव्हां आत जाते तेव्हां ती खरी समस्या बनते. Existentialists (अस्तित्ववादी) जीवन हीच एक समस्या आहे असे म्हणतात ते खरे आहे. आपल्याला साधन व्हावे असे वाटते पण ते कां होत नाही? आपली शक्ती कमी पडते का?

**साधक ब** : आपल्या शक्तीने मी साधन करू शकत नाही. नामस्मरण चांगले होणे माझ्या हातात नाही.

**साधक प** : हे लक्षात येऊन देखील जोपर्यंत 'माझे' साधन चांगले झाले पाहिजे असे वाटते तोपर्यंत नाम चांगले होणार नाही.

**पू. बाबा :** नुकतेच ISKCON मधील एक गृहस्थ भेटायला आले होते, ते म्हणाले, श्रीकृष्णांनी अर्जुनाला युद्धस्व, हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम् इत्यादी सांगितले आहे आणि परत मयैवेते निहता: पूर्वमेव म्हणूनही सांगितले आहे. तर मग अर्जुनाचे निमित्त तरी कशाला पाहिजे होते? मी त्यांना सांगितले की यामधे विरोध नाही. अर्जुन कर्माशिवाय राहूच शकला नसता. शेवटी तो लढलाच असता आणि त्याच्या पापपुण्याचा त्याला भोक्ता व्हावे लागले असते. पण त्याचे कर्तेपण गेले आणि त्याबरोबर भोक्तेपणही गेले. पण ते असू दे! आपले घोडे कुठे पेंड खाते?

**साधक ग :** आम्ही अद्यापिही आतून खरे अस्वस्थ झालेलो नाही.

**पू. बाबा :** होय, काही अंशी ते खरे आहे. चालले आहे ते ठीक चालले आहे असे वाटते. प्रत्येक दिवशी काळाच्या जवळ जात असूनही आपली प्रकृती पैसा इत्यादींबद्दल निश्चिंती वाटते. पण तसे म्हणावे तर त्या बाबतीतही आपण पूर्ण निश्चिंत झालेलो नाही. जपाला बसलो की त्यासंबंधीचे विचार मनात येतात. म्हणजेच देहबुद्धि आड येते. देहबुद्धि कोणाची गेली म्हणावयाचे? श्रीमहाराज म्हणत, ज्याच्या सर्व वासना नाहीशा झाल्या तोच देहबुद्धीच्या पलीकडे गेला म्हणता येईल. समर्थांनी म्हटले आहे की, ''नि:शेष वासनारहित। ऐसा तो विरळा संत॥''

**साधक प :** संतात देखील विरळा म्हटले आहे तर सामान्य माणसाची गोष्टच नको.

**साधक क :** माझे सर्व जीवन त्या शक्तीच्या हाती आहे. मी नाम घेतो ते देखील त्या शक्तीच्या कृपेमुळे घेतो अशी जाणीव राहिली तर साधन चांगले होईल. पण हा भाव येणे कठीण आहे. तो देखील झेपला पाहिजे. एकदा मथुरबाबू श्रीरामकृष्णांना म्हणाले की, मला तो भाव द्या. प्रथम रामकृष्ण नाही म्हणाले; तुझा व्यवहार होणार नाही म्हणाले. पण ते फारच मागे लागल्यावर त्यांनी आईकडे प्रार्थना केली. ती शक्ती मला चालविते आहे हा भाव मथुरबाबूंना सहन झाला नाही. शेवटी ते श्रीरामकृष्णांकडे गेले आणि त्यांच्या पाठीवर हात फिरवून श्रीरामकृष्णांनी त्यांना सामान्य भूमिकेवर आणले. स्वत: श्रीरामकृष्ण सुमारे बारा वर्षे या भावात राहिले होते! त्या शक्तीची थोडी जरी प्रचीति आली तरी नाम चांगले होईल.

**साधक ब :** मला वाटते की मी भोंदू आहे. एकीकडे आत्तापर्यंत जीवनात मी जे जे केले त्यात मी काहीतरी मिळविले, ते माझे कर्तृत्व आहे असे वाटते

आणि साधन करताना मात्र मी कोणीच नाही असा भाव आणावयाचा मी प्रयत्न करतो.

**पू. बाबा** : याचा अर्थ आपण dishonest (अप्रामाणिक) आहोत कां?

**साधक ब** : तसे नव्हे; पण एकीकडे मी फुसका आहे असे वाटते आणि त्याचवेळी जीवनात मी माझ्या कर्तृत्वाने काहीतरी मिळविले आहे असे वाटते. असे असूनही जर सर्व आयुष्य पुन्हा जगावयाला मिळाले तर हेच जीवन परत नको असेही वाटते!

**साधक प** : केवळ पुनर्जन्माचा विचार केला तरी लहान मुलांकडे पाहिले की ह्या सर्व अवस्थांमधून परत जावे लागणार काय असे वाटून अंगावर भीतीचा काटा येतो.

**साधक ग** : आपण अप्रामाणिक आहोत असे नाही पण आपणच आपल्याला खूप सवलती देतो. साधनासाठी लागणारा मनाचा कठोर निश्चय आमच्या जवळ नाही आणि याचे कारण आता केवळ नामासाठीच जगावयाचे असा मनाचा निश्चय झालेला नाही.

**पू. बाबा** : हे खरे आहे. प्रपंचात दुसऱ्यांशी कठोर व्हावे लागते; परमार्थात स्वत:शी कठोर व्हावे लागते.

**साधक ज** : मागच्या वेळी आपण म्हणालात तेच खरे आहे. **Machinelike repetition of the Nam** पाहिजे. **Quantity will generate quality** (संख्येतूनच दर्जा निर्माण होईल) आज त्याचा विचार करू नये.

**पू बाबा** : श्रीमहाराजांकडे एक गृहस्थ येत असत. ते विशेष श्रद्धाळू नव्हते पण तरीही श्रीमहाराजांवर त्यांची श्रद्धा होती. त्यामुळे सुमारे वीस वर्षे त्यांनी अखंड नामस्मरण केले. एकदा ते मला म्हणाले की हा नामाचा परिणाम आहे की काय ते मला माहीत नाही, पण मी पूर्ण समाधानी आहे.

शेवटी पू. बाबांनी विचारले, आज आपले काय ठरले? उत्तरादाखल तेच पुढे म्हणाले की जेवढा रिकामा वेळ मिळेल तेवढा नामस्मरणात घालवावा. मी नाम घेतो तेव्हां पुष्कळ नामस्मरण झाले की मला वाटते श्रीमहाराजांना आनंद झाला आहे. ते प्रसन्न आहेत. मिळेल तितका रिकामा वेळ नामस्मरणात घालवावा. याचा अर्थ रिकामा वेळच मिळणार नाही इतके कोणत्या ना कोणत्या व्यापात स्वत:ला गुंतवावे असे मात्र नाही.

## ।१९१। (१ मार्च १९९१)

आज होळीचा दुसरा दिवस. धुळवडीची सुट्टी असल्याने डॉ. देशपांडे आणि डॉ. राजगुरू आले आहेत.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांकडे येणारे एक साधक खूप जप करीत असत. एकदा होळीच्या दिवशी ते श्रीमहाराजांना भेटायला आले होते. ते श्रीमहाराजांना म्हणाले की आठ-दहा वर्षे नामस्मरण सुरू आहे पण फार काही साधल्यासारखे वाटत नाही. श्रीमहाराज म्हणाले, तुम्हाला काय म्हणायचे आहे? सर्व होळी करायची तयारी आहे का? मग पोळी मिळेल. यावर ते म्हणाले, मला ती होळी नको आणि पोळीही नको. परमार्थात आपल्या भलत्या अपेक्षा असतात पण त्यासाठी आपली तितकी तयारी झालेली नसते.

श्रीब्रह्मानंद महाराज श्रीमहाराजांना भेटल्यावर 'आपण माझी विद्या घेतली म्हणा त्याशिवाय मी पायावरून डोके उचलणार नाही' असे म्हणाले होते. आणि त्या वेळी श्रीमहाराजांनी त्यांनी दिलेली विद्या घेतली. पू. बाबा म्हणाले की हे करण्यामागे श्रीब्रह्मानंदांच्या मनाची भूमिका काय असेल? हे विद्येचे देणे आतल्या पातळीवर असले पाहिजे. या बाबतीत श्रीमहाराज एक दृष्टान्त देत असत. एका माणसाला त्याचे घर दुसऱ्या माणसाला द्यावयाचे होते. त्यासाठी घर डोक्यावर घेऊन का तो दुसऱ्याकडे गेला? नाही, कचेरीत जाऊन त्याने फक्त नोंद बदलली.

**साधक प** : त्यांनी भगवंताच्या प्राप्तीसाठी विद्या मिळविली होती. त्या विद्येची व्यर्थता समजल्यावर त्यांनी श्रीमहाराजांना हे म्हटले असावे. इतर व्यवहारी विद्या भगवंताच्या आड येत नसावी आणि ती सोडणे त्या मानाने सोपे असावे.

**पू. बाबा** : अशा विद्येला समर्थांनी पोट भरावयाची विद्या म्हटले आहे. मला वाटते, श्रीब्रह्मानंद महाराजांना आणखी दोन गोष्टी पटलेल्या असल्या पाहिजेत. एक म्हणजे माझी विद्या मला टाकून देता येत नाही आणि दुसरे म्हणजे श्रीमहाराज ही विद्या घेऊ शकतील.

**साधक ब** : विद्या विसरण्यात स्वत:ला पुसून टाकण्याचा भाव असू शकतो. स्वत:ची प्रतिमा भंग करण्याचा हा प्रकार असावा. उदाहरणार्थ, कृष्णप्रेम त्यांच्या पूर्वायुष्याला मृतवत् होते. माझ्यापुरते म्हणायचे झाले तर एका बहुराष्ट्रीय कंपनीत मी मोठ्या हुद्द्यावर होतो हे माझ्या आठवणीत आहे. ते मी विसरू शकत नाही.

**पू. बाबा :** स्वत:ची विद्या विसरण्याच्या बाबतीत मला एक उदाहरण आठवते. श्रीमहाराजांचे एक भक्त अहमदाबादला वीव्हिंग मास्टर होते. निवृत्त झाल्यानंतर ते त्यांच्या पत्नीसह तीर्थयात्रेला गेले होते. त्यांच्या पत्नीने हरिद्वारला एक पातळ विकत घेतले. त्यांना दाखवल्यावर ते चांगले आहे म्हणाले. पूर्वी वीव्हिंग मास्टर असूनही त्याबाबतीतला त्यांचा रस गेला होता. विद्येपेक्षाही तिचा अहंकार जास्त घातक असतो.

**साधक प :** विद्या आणि अहंकार यात फरक आहे. विद्या दिल्यानंतर अहंकार जाण्यासाठी ब्रह्मानंद महाराजांना साधना करावीच लागली. ते विद्या घ्या म्हणाले; अहंकार घ्या म्हणाले नाहीत.

**साधक ब :** त्यांनी विद्या दिली आणि श्रीमहाराजांनी ती घेतली यात नक्कीच काहीतरी प्रत्यक्ष घडले असले पाहिजे. It was a deal !

**पू. बाबा :** जे घडले ते मानसिक पातळीवर असणार आणि ते झाल्यानंतर ब्रह्मानंद महाराजांना हलके वाटले असेल. त्यानंतर साधन करताना विचारांचा अडथळा आला नसेल व त्यामुळे सर्व लक्ष नामावर केंद्रित झाले असेल. त्यानंतर त्यांनी त्या विद्येचा कधी वापर केला नाही इतकेच नव्हे तर काही पंडितांनी त्यांना काही शंका विचारली तेव्हा मी माझी जिव्हा नामाला विकली आहे असे ते म्हणाले.

**पू. बाबा :** स्वामी रामदासांनी The Pathless Path मध्ये म्हटले आहे "Fixing the mind on the sound of His Name is the easiest way for concentration." श्रीमहाराजांनीही असेच म्हटले आहे. ते म्हणतात "नामस्मरण करीत असतांना ते नाम आपल्या कानांनीं ऐकावें, म्हणजे एकाग्रता व्हायला मदत होईल." स्वामी रामदास पुढे म्हणतात : "Take it that the sound of the Name is itself a symbol of God." नामाचा ध्वनी हे भगवंताचे चिन्हच आहे.

**साधक ब :** नामाच्या उच्चाराच्या मागे आत भगवंताची प्रेरणा असते. त्या प्रेरणेशिवाय नामस्मरण शक्यच नाही.

**साधक प :** संतांना कोणत्याही शब्दाचा उच्चार हा नामाचाच उच्चार वाटतो.

**पू. बाबा :** आपल्याला नाम हे नुसते शब्द वाटतात, पण त्याचे खरे महत्त्व, व्यापकत्व आणि खोली आपल्या लक्षात राहात नाही. नाम आणि ईश्वर एकच वाटावे, हे कसे लक्षात राहील ? तुकाराम महाराजांच्या अभंगात त्यांनी

तुझी प्रेमखूण दाखव असे देवाजवळ मागितले आहे. श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची तशी कोणती खूण सांगता येईल?

**साधक प** : ज्यावेळी नामस्मरण छान होते त्यावेळी त्यांचे अस्तित्व आहे असे म्हणता येईल.

**साधक ब** : नाम एकसारखे घ्यावेसे वाटणे ही त्यांच्या अस्तित्वाची खूण आहे.

**साधक प** : ही जास्त व्यापक खूण आहे; कारण आज मला सारखे नाम घ्यावेसे वाटत नाही.

**साधक ब** : नाम हा श्रीमहाराजांचा प्राण आहे.

**पू. बाबा** : नामस्मरण एकसारखे होऊ लागले की कोणत्याही कारणाने ते थांबले तर साधकाला ते सहन होणार नाही. तो बेचैन होईल. थोडा वेळ मिळाला की तो नामच घेईल. नामाशिवाय त्याला करमणार नाही. याच्या पुढची अवस्था म्हणजे तो श्रीमहाराजांशी संभाषण करू लागेल. आठ-दहा वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. नेहमी गोंदवल्याला जाणाऱ्या एका साधकांना मेंदूची अपुरी वाढ झालेला मुलगा झाला. एक दिवस मुलाची अवस्था पाहून त्यांना रडू आले आणि ते श्रीमहाराजांना म्हणाले, आतां कसे होईल? एकाएकी श्रीमहाराज त्यांच्यासमोर आले आणि त्यांना म्हणाले, काळजी करू नये; तो सुधारेल व सर्व काही आपले आपण करू लागेल. हे ऐकताच त्यांचे मन एकदम शांत झाले. अशा तऱ्हेने संभाषण होणे ही सगुण भक्तीची सुरेख अवस्था आहे. श्रीमहाराजांचे अस्तित्व सतत जवळ भासणे ही फार पुढची पायरी आहे.

मला इतके लोक भेटतात, अमुक अमुक गोष्टी श्रीमहाराजांच्या कृपेने झाल्या म्हणतात पण त्यांची काळजी काही सुटत नाही. अडचणी दूर होऊन काम झाल्याचे ज्यांना पदोपदी अनुभव आले आहेत त्यांची पण काळजी सुटत नाही. काय करावे! मला वाटते, ही काळजी सुटण्यासाठी आतमध्ये वेगळ्या पातळीवरच काही तरी घडत असावे. चांगले किंवा वाईट सर्वच श्रीमहाराजांच्या इच्छेने होणार आहे असे वाटले पाहिजे.

पूर्वी ज्या विकारांना आपण बळी पडत होतो त्या विकारांवर ताबा येणे ही देखील श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची, त्यांच्या सत्तेची खूण आहे. विकार ताब्यात आल्यावर सूक्ष्म देहाचा आकार बदलतो. उदाहरणार्थ, बोलण्याची ऊर्मि आतूनच कमी होते.

गोंदवल्यास उत्सवानंतर एकदा श्रीमहाराज म्हणाले होते की इथे तुम्ही श्रीरामरायाकडे आला आहात. श्रीरामाचे पाहुणे आहात. मी तुम्हांला रामरूप समजून नमस्कार करतो. हे ऐकून काही लोक रडायला लागले! श्रीमहाराज म्हणत, येथे येणारी माणसे लहान, कमी असूनही मी त्यांना रामरूप पाहिले. ज्ञानेश्वर महाराजांनी 'कवणेंसीं हीनबुद्धी राहाटिजे ना॥ १३.३६४॥' म्हटले आहे; तसे आपण वागावे. निंदक तर, श्रीमहाराजांनी शिकवणीसाठी ठेवला आहे असे समजावे. सामान्य माणसाचा लहानसा गुणही पाहून श्रीमहाराज त्याचा गौरव करीत. आपणही दुसऱ्यांचे दोष न पहाता गुणच पहावेत. यामुळे अंत:करण शुद्ध होईल. अशा शुद्ध अंत:करणाने नाम घ्यावे. ज्ञानेश्वर महाराजांनी याला सोन्याच्या घड्यातील गंगाजलाची उपमी दिली आहे. असा शुद्ध अंत:करणाचा माणूस कसा असेल! त्याला पहावेसे वाटते. अखंड प्रसन्नता हा श्रीमहाराजांचा विशेष होता. आपण त्यासाठी प्रयत्न करावा. आपण जेथे जाऊ तेथे श्रीमहाराजांना घेऊन जावे. असे नाही का करता येणार?

**साधक प :** त्यापेक्षा नाम बरोबर घेऊन जाणे मला सोपे वाटते.

## |१९२| (८ मार्च १९९१)

**पू. बाबा :** पूर्वी पू. तात्यासाहेब होते तेव्हां एक बाई येथे श्रीमहाराजांकडे येत असत. त्यांच्याशी बोलतांना श्रीमहाराज म्हणाले होते की 'वृत्तीच्या तोंडी नाम द्यावें. नाम वृत्तीपर्यंत पोचले पाहिजे.' बाईंनी याचा अर्थ विचारला तेव्हां श्रीमहाराजांनी माझ्याकडे पाहिले. तथापि इतर बोलण्यात तेव्हां तो विषय तसाच राहून गेला. त्या बाईंना आता कॅन्सर झाला आहे. उपचार चालू आहेत पण डॉक्टरांनी बरे होण्याची शक्यता नाही असे सांगितले आहे. त्यांना आता श्रीमहाराजांनी सांगितलेल्या ह्या वचनांची आठवण झाली आणि त्याचा अर्थ विचारण्यासाठी त्या नुकत्याच आल्या होत्या.

श्रीमहाराज म्हणत की वृत्तींमधील संधी साधली पाहिजे. वृत्तींचा प्रवाह एकसारखा चालू असतो. एक वृत्ती उठते जाते आणि तिची जागा दुसरी वृत्ती घेते. वृत्तीमधून ऊर्मि आणि मग कृती असा क्रम असतो. मनामधे वृत्ती येतात आणि जातात. म्हणजे त्या मनापेक्षा वेगळ्या असल्या पाहिजेत. नाम ही देखील वृत्ती असेल तर ते वृत्तीच्या तोंडी देता येणार नाही. नाम वृत्तीच्या तोंडी द्यायचे म्हणजे नेमके काय? आपण म्हणतो की शरीरात मन आहे पण खरे म्हणजे मनात शरीर आहे.

**साधक ब :** म्हणजे काय ?

**पू. बाबा :** आपला सूक्ष्म देह आपल्या स्थूल शरीराबाहेर आणि त्याला व्यापून असतो. सूक्ष्म देह वासनामय असतो. आपण झोपतो तेव्हां तो शांत असतो. अशा वेळी सत्पुरुषांना झोपलेल्या माणसाच्या प्रधान वासना समजू शकतात. म्हणूनच कित्येकदा रात्री सर्वजण झोपले की श्रीमहाराज नागप्पाबरोबर टेंभा घेऊन कोण कोठे झोपला आहे, त्याची प्रधान वासना कोणती आहे ते पाहून येत असत.

**साधक ग :** मनातून वृत्ती येतात म्हणण्यापेक्षा त्या चित्तातून येतात म्हणणे योग्य होईल. योग म्हणजे चित्तात उठणाऱ्या वृत्तींचा निरोध असे पतंजलींनी म्हटले आहे. चित्त जलाशयासारखे असून त्या जलाशयातून उठणाऱ्या लाटांसारख्या वृत्ती एकसारख्या येत असतात. वृत्ती मनाला व्यापतात. नाम हे ब्रह्म आहे. ते वृत्तींपलीकडे आहे. म्हणून कोणतीही वृत्ती उठली तरी नाम घेतले तर त्या वृत्तीचे ऊर्मि व कृतीमध्ये पर्यवसान होणार नाही अशा अर्थाने वृत्तीच्या तोंडी नाम द्यावे असे श्रीमहाराजांनी म्हटले असावे.

**साधक प :** सर्वच वृत्ती आपले मन व्यापत नाहीत. माणसे एकाच वेळी अनेक गोष्टी करू शकतात. तीव्र सुखदु:खांच्या - विशेषत: दु:खाच्या वृत्ती टिकून राहतात. त्या दुसरे काही सुचू देत नाहीत.

**पू. बाबा :** वृत्ती लाटांसारख्या असतात. त्या येतात आणि जातात. सर्वच वृत्तींमधून ऊर्मि उठत नाहीत.

**साधक ड :** एखादा जलाशय रंगीत करावयाचा असेल तर त्यावर येणाऱ्या लाटांवर रंग टाकला की तो खालपर्यंत पोचून पाणी रंगीत होईल. त्याप्रमाणे नामस्मरण प्रथम वृत्तींवर परिणाम करून हळूहळू ते संपूर्ण मन व्यापेल.

**साधक ब :** वृत्ती येतांना समजली पाहिजे म्हणजे ती आवरता येईल.

**पू. बाबा :** वृत्ती दाबण्यापेक्षा (repression) त्या वृत्तीची दिशा बदलणे (deflection) किंवा हे भगवंताचे आहे म्हणणे सोपे जाईल.

**साधक प :** मी माझ्या वृत्तींकडे वस्तुनिष्ठपणे पाहूच शकत नाही.

**पू. बाबा :** दोन वृत्तींमधील संधी जाणणे महत्त्वाचे आहे. निद्रा ही देखील वृत्ती आहे. श्रीमहाराज म्हणत की झोप येते म्हणजे काय होते ते समजून घ्या. झोपतो तेव्हां काय बाहेर जाते आणि जागे होतो तेव्हां काय आत येते ? हे समजून घेण्याचा मी प्रयत्न केला. पण परिणामी झोप उडत असे. कारण जागे राहिल्याशिवाय झोप कशी येते हे कसे समजणार ?

**साधक प :** झोप झाल्यावर जागे होताना, जागे होतो म्हणजे काय होते ते समजून घेणे जास्त सोपे आहे असे वाटते.

**साधक ब :** बुद्धीने निश्चय केला तर ध्येयाला विरोधी असणाऱ्या वृत्ती आवरणे सोपे जाईल. उदाहरणार्थ, टी. व्ही. पहायचा नाही कारण तो नामस्मरणाच्या आड येतो असे बुद्धीने एकदा ठरविले की मन तसे वागेल.

**साधक ज :** बुद्धीचे कार्य विचार. त्यांच्यावर ताबा आणणे कदाचित शक्य असले तरी राग, भीती इत्यादी भावनाना बांध घालणे कठीण आहे. राग आला की आपण रागरूपच होतो.

**साधक ग :** मी म्हणजे माझा देह हे माझे आयडेंटिफिकेशन (ओळख) मनाने ठरविले आहे. 'मी' ही प्रधान वृत्ती आहे आणि ती माझ्या शरीराला व्यापून आहे. माझे सर्व विचार आणि कृती ह्या मी भोवती राहतात. वृत्तीच्या तोंडी नाम द्यावयाचे म्हटले तर वृत्ती एकसारख्या येत असतात म्हणून एकसारखे नामस्मरण केले पाहिजे. वृत्तीपर्यंत नाम जायचे म्हणजे नाम खोल गेले पाहिजे.

**साधक प :** आपल्याला कोणी नांवे ठेवली तर ते मेंदूकडे जात नाही तर हृदयात जाते. त्या ठिकाणी वृत्तींचा उगम आहे. तेथपर्यंत म्हणजे हृदयात नाम उतरले पाहिजे.

**पू. बाबा :** हा मुद्दा महत्त्वाचा आहे. यावर येत्या शुक्रवारी जास्त विचार केला पाहिजे.

**साधक क :** झोपेत नाम राहते का?

**पू. बाबा :** झोपेत तर नाम राहतेच पण मरण्यापूर्वी माणूस बेशुद्ध झालेला असेल तर तो नाम कसे घेईल असे एकदा मी श्रीमहाराजांना विचारले होते. ते म्हणाले "अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्। यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः॥८.५॥" असे गीतेत भगवंतांनी सांगितले आहे. जन्मभर नाम घेणाराचे नाम खोल जाते त्यामुळे मृत्युपूर्वी तो बेशुद्ध असला तरी नाम घेण्यापुरता शुद्धीवर येत असलाच पाहिजे.

## ।१९३। (१५ मार्च १९९१)

गेल्या शुक्रवारी वृत्ति आणि मन यावर चर्चा झाली होती तेव्हां त्यावर जास्त विचार करावयाला पू. बाबांनी सांगितले होते. आज गेल्याबरोबर काही विचार केलात का असे त्यांनी विचारले.

**साधक ड :** श्रीमहाराजांच्या एका प्रवचनात म्हटले आहे की वृत्तीचे नामाशी लग्न लावून द्यावे.

**पू. बाबा :** पण म्हणजे काय तो अर्थ सांगा. परमार्थाला लागणारी बुद्धी ही व्यवहारी बुद्धीपेक्षा वेगळी आहे. गीतेत स्पष्ट सांगितले आहे की 'व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन। २.४१।' एकाग्रपणे बुद्धी विचार करू लागली, आत्मानात्म विवेक बरोबर झाला आणि बुद्धीचा निश्चय पक्का झाला की माणूस वासनांच्या मागे धावणार नाही. मी गेल्या आठवड्यात ह्यावर खूप विचार केला. आधुनिक शास्त्रज्ञ, विशेषत: एडिंग्टनसारखे फिजिसिस्ट म्हणतात की अणूंना देखील जाणीव आहे. एखादा अणु आपली कक्षा सोडून दुसरीकडे जातो, उडी मारतो तेव्हां तो हे जाणीवपूर्वक करतो असे त्यांचे मत आहे. वनस्पतींमध्ये Pollination च्या (परागण) 'क्रियेत जाणीव आहे. तथापि माणसाचे वैशिष्ट्य हे की तो नुसता विचार करीत नाही तर त्याला विवेकाची जोड देतो. मन हे शक्तिरूप आहे. ही शक्ती स्वस्थ रहात नाही. तिची होणारी हालचाल म्हणजे वृत्ती. ह्या हालचालीमुळे-वृत्तीमुळे मनाची शक्ती लक्षात येते. मनात येणारे संकल्प हा त्या शक्तीचा खेळ आहे. हे संकल्प विकल्प वासनांतून येतात. वासनांचे दृश्य स्वरूप, तसेच मनाच्या शक्तीचे दृश्य स्वरूप म्हणजे संकल्प विकल्पादि वृत्ती. आपले मन वासनामय, संकल्पमय आहे कारण ह्या विश्वाची निर्मिती भगवंताच्या संकल्पातून झाली. 'एकोऽहम् बहुस्याम् प्रजायेय इति।' भगवंताच्या संकल्पाला वासना म्हणावयाचे नाही कारण त्यात स्वार्थ नाही. वासनांमुळे वृत्ती उठतात व त्या मनाला व्यापून टाकतात. व्यापून टाकते (वृत्) ती वृत्ती.

श्रीमहाराज म्हणत की पाणी तापू लागले की बुडबुडे वर येतात तशा आतून वृत्ती उठत असतात. अशी एखादी प्रबळ वृत्ती आली की ती आपल्याला सर्वस्वी व्यापून टाकते. मग तेथे दुसरा विचारच राहात नाही. कसली तरी मोठी काळजी लागली की असे होते. एरवी अनेक वृत्ती, अनेक बुडबुडे उठत असतात, आणि फुटत असतात. वासनांतून आलेल्या वृत्तींच्या मागे आपण जातो. कित्येकदा बुद्धी या वासनेमागे जाऊ नको म्हणून सांगते, तरीही मन तिकडेच जाते कारण बुद्धीची निश्चय करण्याची शक्ती कमी पडते. ही बुद्धी व्यवहारबुद्धी नव्हे. बुद्धीचा निश्चय पक्का झाला तर माणूस वासनांच्या मागे धावणार नाही. मग मनात भगवंताचीच - नामाचीच वृत्ती उठेल आणि अशा वृत्ती एकसारख्या उठू लागल्या की नामस्मरणात रुचि येईल. एकदा ही रुचि

आली की काम झाले! तुकाराम महाराज म्हणतात, 'रामनामाचिया चवी। आन रस रुचे केवी।' ज्ञानेश्वर महाराज म्हणतात 'तेविं सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धी जे ऐसें अनन्य होणें। ते सत्वशुद्धि म्हणे। केशिहंता॥ १६.८०॥'

वृत्तींचे हे स्वरुप लक्षात घेऊन श्रीमहाराजांच्या वचनांचा आपण विचार करू. श्रीमहाराज जेव्हां म्हणतात की वृत्तीच्या तोंडी नाम द्यावें तेव्हां त्यांना असे म्हणायचे आहे की वासनांना आणि वासनांतून येणाऱ्या वृत्तींना सारखे काहीतरी (खावयाला) हवे असते. त्यांना पाहिजे असलेले भोग चारण्याऐवजी नाम खाऊ घालावे! असे केले तरच त्या शांत होतील. नाहीतर त्यांची वखवख वाढत राहील. वासना जेव्हां जोराने उफाळतात तेव्हां तितक्याच हट्टाने नामस्मरण चालू केले तर ते वृत्तीच्या तोंडी नाम देणे होईल आणि परिणामी वासनांचा जोर कमी होत होत नाहीसा होईल.

वृत्तीपर्यंत नाम पोचले पाहिजे. म्हणजे अशी स्थिती झाली पाहिजे. की नामाशिवाय दुसरे काही सुचणारच नाही. व्यवहारातील कामे यंत्राप्रमाणे चालू राहतील पण आतून मन मात्र नामात रंगलेले राहील. वृत्ती उठेल ती नामाचीच.

वृत्तींचे नामाशी लग्न लावावे. वृत्ती स्त्रीलिंगी आहे. लग्न झाले की स्त्री आपले माहेर सोडते व आपले सर्वस्व पतीला देते. त्याप्रमाणे वृत्तींचे वासनांचे माहेर सुटेल आणि त्या नामाला वश होतील. असे झाले की वृत्तींचे नामाशी लग्न लागले!

**साधक प :** वासनांमागून, वृत्तींमागून धावायची आपल्याला सर्व आहे. तेव्हां वासनांतून उठणाऱ्या भोगवृत्तींऐवजी नामवृत्ती उठली तर सवयीमुळे मन त्या वृत्तीमागून जाईल आणि मग खरी मजा येईल. मग नामस्मरण हे 'करणे' राहणार नाही. माणूस त्यात नकळत रंगून जाईल.

**साधक ग :** व्यवहारातील बुद्धी परमार्थात चालणार नाही हे तर उघडच आहे. मला वाटते, आपण जेव्हां सद्गुरूंच्या पायावर डोके ठेवतो तेव्हां त्याचा अर्थच असा आहे की आता मी माझी बुद्धी तुमच्या पायावर वाहिली. आता तुम्ही सांगाल ते, कोणताही विकल्प मनात न आणता, मी करेन.

**साधक ब :** मनात अनेक विकल्प येतात पण ते घालवावयाचा उपाय हट्टाने नाम घेत राहणे हाच आहे; कारण त्याशिवाय वासना लंगड्या होऊन नाम वृत्तीपर्यंत पोचणार नाही. स्वामी रामदासांनी म्हटल्याप्रमाणे Like a machine नाम घेतले पाहिजे.

**साधक प :** होय; पण ते घडावयाला काय अवस्था झाली पाहिजे ते स्वामी रामदासांनी आधीच्या दोन वाक्यांत सांगितले आहे. त्यांना God

**has taken him up for His experiment** असे वाटत होते आणि त्याचबरोबर नामाचे संरक्षणही वाटत होते.

**साधक क :** गेल्या शुक्रवारी तुम्ही सांगितले म्हणून मी ह्या बाबतीत विचार केला तो थोडक्यात सांगतो. साधारणपणे बाहेरील आघात असतांना किंवा काही वेळा नसतांनाही आपल्या संस्कारांच्या साठ्यातून (चित्तातून) जाणिवेत आलेला अनुभव म्हणजे वृत्ती असे म्हणता येईल. वृत्तीला आरंभ व शेवट असतो. ती सविराम अवस्था आहे. या दृष्टीने आपले सर्व ज्ञान वृत्तिमय आहे आणि आपण घेत असलेल्या अनुभवांचे ज्ञान व अर्थ आपल्या संस्कारांनी होतात. संस्कार हे स्मृतिरूप असून स्मृती साठवतांना त्या हवे-नकोपणाने आत जमा होतात. या स्मृती घट्ट होऊन वासना बनतात. इच्छा ही हवेपणाची तर भय ही नकोपणाच्या स्मृतीची प्रतिक्रिया म्हणता येईल. परंतु वृत्तीच्या या व्याख्येप्रमाणे निद्रा ही वृत्ती ठरत नाही. कारण तेथे हालचाल नाही. पण योगसूत्रात निद्रा ही वृत्ती सांगितली आहे.

श्रीएकनाथ महाराजांनी भागवताच्या तेराव्या अध्यायात मुख्य तीन वृत्ती मानल्या आहेत. त्या तीन गुणांना किंवा तीन अवस्थांना अनुसरून आहेत. त्यांच्या मते जागृती ही वृत्ती आहे. इतर लहान सहान वृत्ती ह्या मुख्य वृत्तीवर आरूढ होऊन अनुभवाला येतात. म्हणून वृत्ती म्हणजे खंडित अनुभवमय अवस्था म्हणावे लागेल. कारण निद्रा हाही अनुभवच आहे. सर्व वृत्तींना आणि अवस्थांना व्यापून आणि त्या पलीकडे साक्षी आहे. जीव हा साक्षीरूप आहे म्हणून वृत्तींच्या पलीकडे जाण्यासाठी तीनही अवस्थांना व्यापून आणि त्याच्याही पलीकडे असणाऱ्या शुद्ध संवित्‌कडे अवधान देणे हाच मार्ग आहे. साक्षी जेव्हां वृत्तीशी तादात्म्य होतो, तेव्हां त्याला मी साक्षी आहे याचा विसर पडून घडत असलेले कर्म मी करतो आणि त्याचे सुख-दुःख मी भोगतो आहे असा भ्रम होतो. ''जीव आपुले प्रकाशता। झाला वृत्तीतें प्रकाश करिता। वृत्ति जीवासी नानावस्था। निजस्वभावें देतसे।। नाथभागवत १३.४०९।।'' साक्षी जीव हा शुद्ध प्रकाशमय आहे. तोच सर्व वृत्ती प्रकाशित करून अलिप्त असतो. हीच तुरीय अवस्था होय. ती वृत्तिशून्य किंवा वृत्ती असून नसल्यासारखी अवस्था होय. हा ज्ञानमार्ग असून जाणिवेने जे प्रकाशित होते त्यापेक्षा वृत्ती प्रकाशित करणारे जे आहे त्याकडेच लक्ष द्यावे लागेल. असे जाणिवेवर लक्ष ठेवल्यास आपण साक्षी आहोत हे कळेल. हा मार्ग कठीण आहे. समर्थांनी दासबोधाच्या शेवटच्या दशकात याचे वर्णन केले आहे. ते सांगतात, ''ज्ञान

आणि अज्ञान। वृत्तिरूप हें समान। निवृत्तिरूप विज्ञान। जाले पाहिजे॥ २०.१.२८॥" यात दोनच वृत्ती मानल्या आहेत आणि विज्ञान ही तुरीय अवस्था आहे.

भक्तिमार्गात संस्कार बदलण्यावर (चित्तशुद्धीवर) भर असतो. आपल्या पूर्वसंस्कारांच्या जागी जर सद्गुरूबद्दलचे, त्यांच्या कर्तृत्वाचे, त्यांच्या आपल्याविषयीच्या हितबुद्धीचे, विश्वासाचे संस्कार प्रबळ झाले तर वृत्ती स्थिर होईल. श्रीमहाराजांनी सांगितले आहे की वृत्ती स्थिर करायची असली तर स्थिर अशा ठिकाणी ती लावली पाहिजे. असे ठिकाण सद्गुरु किंवा भगवंत. वृत्ती स्थिर झाली म्हणजे हवे-नकोपण जाईल. हवे-नकोपण ह्याच वासना, त्या क्षीण होतील. हवे-नकोपण जाणे हेच द्वंद्वांच्या पलीकडे जाणे आहे. अशा प्रकारे भक्तीने आपल्याला सुख-दु:खादि द्वंद्वांच्या पलीकडे जाणे हेच साधावयाचे आहे. श्रीएकनाथ महाराजांनी तीन अवस्थांच्या पलीकडे जाण्यासाठी नामस्मरण हे साधन सांगितले आहे. याचा अर्थ हाच की नामस्मरण हे तीन अवस्थांच्या पलीकडे असलेच पाहिजे. किंबहुना ते तुरीय अवस्थेच्याही पलीकडे आहे. म्हणूनच नाम तीनही अवस्थांमध्ये चालू शकते.

साधक 'क' यांनी केलेले हे विवरण ऐकून पू. बाबा म्हणाले, हा सगळा सिद्धान्त ठीक आहे, पण हे आचरणात कसे आणावयाचे? योगवासिष्ठात शुभेच्छा म्हटली आहे. ती हीच. पण जोपर्यंत वैराग्य नाही तोपर्यंत साधन खरे नव्हे. भागवतात 'जितं सर्वं जिते रसे' म्हटले आहे. नाथ म्हणतात 'जंव रसना नाहीं जिंकली। तंव जितेंद्रिय हे मिथ्या बोली।' पू. बाबा साधक ब यांना म्हणाले, तुम्ही मी आता तृप्त आहे असे म्हणता पण ही खरी तृप्ती नाही. ही वस्तूंवर आधारलेली तृप्ती आहे. पैशाचे थोडे कमीजास्त होऊ द्या, ही तृप्ती नाहीशी होईल. लक्षात ठेवा की कोणत्याही साधनात शेवटी ध्यानापर्यंत आल्याखेरीज भगवद्दर्शन होणार नाही.

## ।१९४। (२२ मार्च १९९१)

**पू. बाबा :** अमेरिकेत स्थायिक झालेले एक गृहस्थ आज भेटायला आले होते. तेथे ते शास्त्रज्ञ म्हणून काम करतात. गणपतीची उपासना करतात. त्यांना दोन मुली आहेत. त्यापैकी मोठी सुमारे बारा वर्षांची, जन्मल्यापासून अंथरुणात लोळागोळा आहे. मेंदूची वाढ नाही. स्नायू काम करू शकत नाहीत. केवळ मानवदेहधारी जीव! ते म्हणाले की मुलीची ही स्थिती पाहून

कित्येकदा निराशा येते. उपासनेतही निराशा येते. हे सगळे कशाला करायचे असे वाटू लागते. mercy killing ला डॉक्टर तयार आहेत पण सरकार परवानगी देत नाही. नुकताच तिला इन्फ्लुएंझा, न्युमोनियासारखा आजार झाला. हॉस्पिटलमधे ठेवावे लागले. सुमारे दहा हजार डॉलर खर्च झाले. मी त्यांना विचारले की ती गेली तर बरे म्हणता, मग इतका खर्च कशाला केला? ते म्हणाले, राहावत नाही म्हणून! ही माया ममता अशी सर्वांना व्यापते. ते मला म्हणाले, ही निराशा कशी घालवावयाची? निराशा आली की उपासना का होत नाही? मी म्हणालो की निराशा आली की तुमचा शक्तिपात होतो आणि त्यामुळे उपासना नीट होत नाही. त्यांना ते पटले.

श्रीमहाराज देहात असतांना म्हणाले होते की संसारातील निराशा, निरुत्साह, चिंता आणि संशय यांमुळे साधन नीट होत नाही. साधनात हे दोष शिरले तर माणसाची स्थिती फार वाईट होते. तथापि निराशा म्हणजे नेमके काय? आशा असल्याखेरीज निराशा नाही. आशा भविष्यकाळाबद्दल असते. अमुक घडावे किंवा घडू नये अशा आपल्या अपेक्षा असतात. ह्या आशा अपेक्षांचे मूळ आपल्या वासनांत आहे आणि वासनांचे मूळ देहबुद्धीत आहे. माणूस निराश झाला की हतबल होतो. त्याचा शक्तिपात होतो.

**साधक ग :** निराशा, निरुत्साह, चिंता ही साखळीच आहे. एक आली की बाकीच्या येतात. सुभाषितकारांनी आशेला अद्‌भुत श्रृंखला म्हटले आहे.

**पू. बाबा :** उत्साह म्हणजे शक्तीचे एकसारखे आतून होणारे स्फुरण असते. ते माणसाला कार्यप्रवण करते. साधनात उत्साह पाहिजे.

**साधक ब :** साधन करतांना काहीतरी अनुभव आला तर निराशा येणार नाही.

**पू. बाबा :** अनुभव म्हणजे काय पाहिजे?

**साधक ब :** नाम आणखी घ्यावे, आणखी घ्यावे असा उत्साह वाटला पाहिजे.

**साधक प :** नाम घेण्याचा उत्साह वाटणे हा अनुभव नसून अवस्था आहे. अनुभव येतो, जातो. त्याबद्दल संशयही निर्माण होऊ शकतो पण अवस्था टिकून राहते.

**साधक ब :** अनुभव म्हणा की अवस्था म्हणा - माझे शब्द चुकत असतील. पण मला ते पाहिजे.

**साधक प :** तुम्ही वेगळ्या शब्दांत नामाचे प्रेमच मागत आहात.

**पू. बाबा** : आपण आशा ठेवतो म्हणून निराशा येते. आशाच ठेवली नाही तर? श्रीमहाराज मला म्हणाले होते की म्हणावे, हा जन्म नामाला दिला; फुकट गेला तरी चालेल. मग निराशा कशाला येईल? श्रीमहाराज लगेच पुढे म्हणाले होते की तो (जन्म) फुकट जात नाहीच. असे करावे नाहीतर भाऊसाहेबांसारखे म्हणावे. नामस्मरण कां करतो, तर स्वारीला आवडते म्हणून! मग निराश, निरुत्साह होण्याचे कारणच नाही. चिंता, काळजी ह्या तर माणसाला कधी सोडतच नाहीत. आपल्या बऱ्याचशा विवंचना पैसा, प्रकृती आणि आपल्या आसपासची माणसे आणि नातलग यांसंबंधीच्या असतात.

काही वेळा नको त्याही चिंता आपण करतो. उदाहरणार्थ, आता परत लोकसभेच्या निवडणुका व्हावयाच्या आहेत, तेव्हा नवा पंतप्रधान कोण होतो कोणास ठाऊक! चारचौघांसारखे व्यवस्थित राहता येईल इतपत पैशाची व्यवस्था असतांना पैशाची काळजी कां वाटावी? ज्यांना दोन वेळच्या अन्नाची भ्रांत आहे त्यांची चिंता मी समजू शकतो. त्यांचे नाम टिकणे कठीण आहे. तुकोबांसारखा एखादाच. पण आपली तशी सुस्थिती असतांना आपण पैशाची विवंचना कां करतो?

**साधक ग** : पैशाचा आधार वाटतो. पैशाने आपल्या आजच्या आणि भविष्यातल्या अडचणी दूर करता येतीलसे वाटते. पदोपदी पैशाविना अडते हे आपण पाहतो.

**पू. बाबा** : हो, पण त्यासाठी किती पैसा पाहिजे याचे काही तारतम्य पाहिजे ना?

**साधक ग** : पैसा वाढेल तशा आपल्या उपभोगाच्या अपेक्षाही वाढतात.

**साधक ब** : आर्थिक सुस्थिती असली आणि आपण विचारपूर्वक वागत असलो तर आर्थिक नुकसान झाले तरी त्याची चिंता करता कामा नये. ह्या महिन्याची श्रीमहाराजांची प्रपंच या विषयावर प्रवचने आहेत. त्यात त्यांनी म्हटले आहे की त्यांना 'मी'चे वावडे नाही पण 'मीपणा' मात्र टाकला पाहिजे. हा 'मीपणा' सोडला तर हानी होऊनसुद्धा दु:ख होणार नाही.

**पू. बाबा** : मी कर्ता ऐवजी राम कर्ता म्हटले की हानीचे दु:ख होणार नाही, श्री. आरबोर मुलीचे लग्न जमत नव्हते तरी त्याची चिंता करत नव्हते. ते म्हणत, श्रीब्रह्मानंद महाराज पाहतील! दुसरे असे की म्हातारपणी अगदी उत्तम अशी प्रकृती राहणार नाही. जरूर तेव्हा शक्य आणि योग्य ते औषधपाणी करावे व प्रकृतीमुळे निराशा, निरुत्साह, चिंता इत्यादी निर्माण होणार नाहीत

असे पहावे. आपल्याला नामाविषयी संशय नाही असे मी धरून चालतो. तथापि सर्व काही केवळ नामानेच होईल अशी खात्री आपल्याला वाटत नाही म्हणून आपण त्याला आणखी काहीतरी जोड द्यावयाला पाहतो.

**साधक प** : निराशा, निरुत्साह इत्यादी नाहीसे व्हावयाला विवेक सतत जागा पाहिजे, तो राहात नाही. कारण आतून आपण अजून संसाराच्या बाजूचेच आहोत.

**साधक ग** : म्हणजेच अद्यापि ध्येय निश्चित ठरलेले नाही आणि त्यामुळे साधन निष्ठेने होत नाही.

**साधक ब** : आपले चुकले, हानीची हळहळ वाटली, कोणाबद्दल द्वेष वाटला तर हे मी पुन्हा करणार नाही असे आपल्या हितचिंतक माणसांना मुद्दाम सांगावे म्हणजे ती एक प्रकारे कमिटमेंट होते. एकदम जमणार नाही पण चुका लक्षात येत येत सुधारणा निश्चित होईल.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. औषध घेत राहिले की हळूहळू गुण येतो तसे हे आहे. साधन दीर्घकाळ करावे लागेल. ज्ञानेश्वर महाराज आपले आदर्श आहेत. त्यांनी म्हटले आहे. "दिठी नोहे मिणधी। बोलणें नाहीं संदिग्धी। कवणेंसीं हीनबुद्धी। राहाटिजे ना॥१३.३६४॥"

**साधक प** : शक्तिपात थांबवायला विवेक सतत जागा पाहिजे. श्रीमहाराजांनी साधनात अखंड सावधानता पाहिजे म्हटले आहे ते यासाठीच.

**साधक ज** : आपण कित्येक अनावश्यक गोष्टी उदाहरणार्थ, टी. व्ही. पाहणे, वर्तमानपत्रे वाचणे इत्यादी आंत घेत असतो, ते कमी केले तर पुष्कळसा शक्तिपात थांबेल.

**पू. बाबा** : राम कर्ता ही भावना वाढली पाहिजे, तुकाराम महाराजांनी 'बरवें केलें, विठोबा बरवें केलें' या अभंगात जे काही घडते ते विठोबा तू करतोस. मंबाजी किंवा अन्य कोणी निमित्तमात्र आहेत हे स्पष्ट केले आहे. आपली अशी खात्री झाली की साधनात निरुत्साह होणार नाही. काही करा, पण साधन वाढले पाहिजे. **Now it is high time !**

## |१९५| (२९ मार्च १९९१)

**पू. बाबा** : आज सकाळी मला श्रीमहाराजांनी आदिबीज नामाबद्दल सांगितले होते ते आठवले. बीज म्हणजे जेथून सर्व निर्माण होते ते. पुढे होणाऱ्या सर्व गोष्टी त्यामधे अंतर्भूत असतात. आदि म्हणजे सर्वात आधी.

'काळ' सुरू होण्याच्याही आधी असलेले बीज ते आदिबीज. त्यावेळचे श्रीमहाराजांचे सांगणे आठवले आणि एकदम प्रकाश पडला. हीच भगवंताची शक्ती. त्याच्या आधी काहीच नाही. हाच ॐकार. हेच 'Potential becomes actual' होणे. (शक्तीचे प्रत्यक्ष होणे) म्हणून भगवंतापासून नाम, आदिबीज वेगळे नाही. नाम आणि नामी एकरूप आहेत. SPACE-TIME ला येथून सुरुवात झाली. एकामागून एक घटना घडत जाणे म्हणजेच काल. अर्थात या मानवी कल्पना आहेत. आपल्याला देश-काल मर्यादेच्या बाहेर विचार करता येत नाही. म्हणून मागे जात जात काहीतरी असले पाहिजे असे आपण म्हणतो. हे असणे म्हणजेच आदिबीज. अनादिचे दोन अर्थ करता येतील. काल सुरू व्हावयाच्या आधी किंवा ज्याचा कालाशी संबंध नाही असे. आदिबीजातून निर्माण झालेली हीच भगवंताची शक्ती.

श्रीमहाराजांबरोबर मी जालन्याला गेलो होतो. तेथे श्री. देसाई नावाचे एक गृहस्थ भेटले. ते श्रीमहाराजांवर काव्य करीत होते. श्रीमहाराजांनी त्यांना विचारले की हे काव्य कोठून येते? ते मला माहीत नाही म्हणाले तेव्हां माझ्याकडे पाहून श्रीमहाराज म्हणाले, हे परावाणीतून येते. ती सर्वव्यापी आहे. पण आपल्याला दृश्यावाचून शक्तीची कल्पना करता येत नाही.

**साधक प** : मला अदृश्य - सूक्ष्म शक्तीची (उदाहरणार्थ वीज) कल्पना करता येते. पण ती शक्ती जाणीवमय आहे, तिला हेतु आणि दिशा (purpose and direction) आहे अशी कल्पना करता येत नाही आणि अनुभव तर नाहीच.

**पू. बाबा** : 'मला कळत नाही' ही भावना करता येईल कां? होणारी गोष्ट होत जाते. कोणी कशासाठी केली वगैरे काहीच कळत नाही हे खरे आहे. पण हे सतत मनात वागवता येईल का? तसे करता आले तर खेळ खेळल्यासारखे किंवा लहान मुलासारखे वागणे होईल.

**साधक ब** : बाबा, नामाची खोली म्हणजे काय?

**पू. बाबा** : नामाला अर्थगांभीर्य यावयास पाहिजे. नाम पवित्र आहे, शक्तिमान आहे, श्रीमहाराजांनी दिले आहे इत्यादी कल्पना निदान नामस्मरण करतो त्यावेळी तरी केंद्रित झाल्या पाहिजेत. त्यामुळे नामाभोवती एक प्रकारचे भावनिक (emotional) वातावरण निर्माण होईल. ते वातावरण दृढ होऊन त्याने मनात घर केले की मग नामस्मरण सोपे जाईल व नामाच्या शक्तीची जाणीव होईल. ही जाणीव झाली की समजावे नाम खोल गेले.

## ।१९६। (५ एप्रिल १९९१)

**पू. बाबा** : आळशावर गंगा अशी म्हण आहे, तसे झाले आहे. श्रीमहाराज म्हणत की तुम्ही मनापासून साधन करीत राहा, सत्पुरुष तुम्हाला शोधत येतील. त्यांच्या ह्या सांगण्याचा अनुभव येऊ लागला आहे. तीन-चार दिवसांपूर्वी एक गृहस्थ भेटायला आले होते. दिसायला सामान्य, धोतर, सदरा, टोपी असा अगदी साधा पोशाख. कोकणातून आले होते. गगनगिरी महाराज हे त्यांचे गुरु. त्यांनी ह्या गृहस्थांना मला भेटायला सांगितले म्हणून काही काम काढून ते राजापूरहून येथे आले होते. गगनगिरी महाराज मूळचे हठयोगी, पुढे राजयोगातही पारंगत झाले. त्यांनी त्यांचा शिष्य माझ्याकडे कशाला पाठवला असे वाटले. पण ह्या गृहस्थांना गगनगिरी महाराजांनी नामस्मरण करायला सांगितले होते. त्यांनी खूप नामस्मरण केले आणि त्यांना स्वप्नात नाम ऐकू येऊ लागले! त्यांनी त्यांच्या गुरूंना याबद्दल विचारले. प्रथम त्यांनी विशेष लक्ष दिले नाही पण पुन्हा विचारल्यावर मालाडला मला भेटायला सांगितले. मी त्यांना सांगितले की वाणीचे दोन प्रकार आहेत. एक शरीरी व दुसरी अशरीरी वाणी. शरीरी वाणीचे स्फुरण परावाणीत असते आणि अशरीरी वाणीचे स्फुरण विश्वमनात असते. (उदाहरणार्थ रामजन्म किंवा कृष्णजन्म होण्यापूर्वी झालेली आकाशवाणी) तुम्हाला स्वप्नात जे नाम ऐकू येते ते अशरीरी वाणीतून येते. माझे सांगणे त्यांना पटले.

ॐकार हा ईश्वराचा विग्रह आहे. परमात्मा जेव्हां सगुणात येऊन भगवंत होतो तेव्हा त्याला नाम आणि रूप दोन्ही येतात. ह्या संदर्भात मी एकदा श्रीमहाराजांना म्हणालो होतो की जगात जे जे उत्तम आहे ते ते भगवंताची विभूति आहे. यावर श्रीमहाराज म्हणाले, असे कां म्हणून? जगात जे जे आहे - मग ते चांगले असो वा वाईट - ती सर्व त्याचीच रूपे आहेत. मग मला आठवले की गीतेत 'यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा। तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम्॥' हे सांगण्याच्या आधी 'द्यूतं छलयतामस्मि' आणि यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन' असे सांगितले आहे. ते असो. मला सांगा, इच्छा असूनही मनासारखे नामस्मरण का होत नाही? नामस्मरणात कंटाळा का येतो? मला वेदान्त नको. प्रत्यक्ष जीवनात काय अडचण येते?

**साधक प** : तसे निश्चित असे कारण सांगता येत नाही. दुसरे काही तीव्रतेने पाहिजे असते असेही नाही.

**साधक ग** : सवयीने आमच्या जीवनाचा असा एक घाट बनून गेला आहे की त्याच त्या गोष्टी आम्ही करत राहतो.

**साधक प** : खरे म्हणजे त्याच त्या गोष्टी करण्याचाही कंटाळा येतो; पण मग दुसरे काय करायचे तेही समजत नाही. नामस्मरणही होत नाही. मला वाटते, नामस्मरण करताना गोडी यावी ही वासनाच आड येते.

**पू. बाबा** : यावर मी बराच विचार केला. मला वाटते की आपली आध्यात्मिक शक्ती कमी पडते.

**साधक ब** : नेमके काय होते ते कळत नाही. पण सकाळी नामस्मरण करताना जो उत्साह असतो तो दुपारी टिकत नाही. अशा वेळी दुसरे काही तरी न करता स्वस्थ बसून राहणेच योग्य ठरते. काही वेळा निरुत्साही वाटत असले तर आंघोळ करून नामाला बसलो तर गाडी पुन्हा रुळावर येते.

**साधक ग** : हेच योग्य आहे. दुसरे काही करू लागलो किंवा चार लोकात मिसळलो की सगळीच हवा होऊन जाते.

**साधक ज** : आमच्या सगळ्याच गोष्टी सामान्य आहेत. अगदी जीव ओतून उत्कटतेने कोणतीच गोष्ट होत नाही. त्यात परमार्थ किंवा नामस्मरणही आहे.

**साधक ग** : हा सपकपणा कसा घालवावा तेच समजत नाही.

**साधक ब** : तोही नामानेच जाईल.

**साधक प** : आम्ही समजतो ती नामस्मरणातील गोडी वरवरची आहे. ती येते जाते. वास्तविक नाम आत स्थिर व्हायला हवे. मग ते अमुक वेळी जमते तमुक वेळी जमत नाही ही गोष्टच राहणार नाही.

**साधक क** : हे खरे आहे. पण जीवाची शक्ती अल्प आहे. आणि त्याला सारखा कशाचा तरी आधार लागतो. दृश्याचा आधार सोपा जातो.

**पू. बाबा** : ह्या सगळ्याचा अर्थ असा की दृश्य जितके खरे वाटते तितके नाम खरे वाटत नाही. आमचे खरेपण देहबुद्धीवर आधारलेले आहे.

**साधक प** : नामाचा अनुभव मागणेच चुकीचे आहे. नामामुळे मीपणा कमी व्हावयाला, वृत्ती शांत व्हावयाला खूप काळ जावा लागेल. आज नाम घेतले की उद्या त्याचा परिणाम दिसला असे होणार नाही. चार-पाच वर्षांपूर्वी मी कसा होतो आणि आज कसा आहे याचा स्वत:शीच विचार केला तर नाम आपले काम करतेच याची खात्री पटेल. नामस्मरणात You need immense patience.

**साधक ग** : खूप चिकाटी तरी पाहिजे नाहीतर अतिशय उतावीळ तरी झाले पाहिजे. इतका काळ गेला, अजून काही साधले नाही अशी तळमळ लागायला पाहिजे. पण तेही होत नाही.

**पू. बाबा** : ते अवघडच आहे. क्रममुक्तीच खरी. वास्तविक भाऊसाहेबांचा (केतकर) मार्ग हा Royal road - राजमार्ग आहे. तो जमणे कठीण, पण जमला तर त्याच्यासारखी दुसरी गोष्ट नाही. तथापि एक निश्चित की आता माघारी फिरता येणार नाही. शेवटी टोकाला जाऊन साधन केल्याशिवाय साधणार नाही.

## |१९७| (१२ एप्रिल १९९१)

**पू. बाबा** : श्रीमहाराजांकडे नेहमी येणारे एक साधक होते. त्यांना अधून मधून नैराश्य (depression) ग्रासत असे. त्यांना श्रीमहाराज म्हणाले, जप, तप, पूजा वगैरे काही करायला नको, एकच गोष्ट करावी; मन प्रसन्न ठेवावे. ते म्हणाले की हे कसे जमायचे? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की एका भगवंताचा आधार घेतला की हे जमते.

पू. बाबांनी नंतर हॉलिवुडमधील नर्तिका व नटी शर्ली मॅक्लीन हिच्या Dancing in the Lights नांवाच्या आत्मचरित्रातला काही भाग वाचून दाखवला, भीतीसंबंधी ती म्हणते "I have no fear. I found that fear is a perception and not a fact. Now when I have fear, that is because I allow it." काही दिवसांनी तिच्या लक्षात आले की कोणत्या तरी अज्ञात शक्तीशी तिचा संवाद होतो. हा आपल्या मनाचाच खेळ आहे काय याची खात्री करून घेण्यासाठी तिने एकदा टेपरेकॉर्डर चालू करून ठेवला, तेव्हा त्यात हा दुसरा आवाज रेकॉर्ड झाल्याचे आढळले, पू. बाबा म्हणाले, हीच ती अशरीरी वाणी असावी. या संभाषणात किती वेळ गेला याचे तिला भान राहात नसे. ती घड्याळाकडे पाही पण त्या पाहण्याची मन नोंद घेत नसे. या संभाषणात ती भूतकाळही विसरून जात असे. एकदा ह्या आवाजाने सध्या काल प्रतिकूल आहे, एक वर्ष कोणतेही नवीन काम घेऊ नको असे तिला सांगितले. ती त्यानुसार वागली. लोकांनी तिला वेड्यात काढले. पण त्यानंतरचे तिचे चित्रपट खूप यशस्वी झाले. विश्वासंबंधी विचार करताना ती म्हणते की "There is mathematical perfection in the world. Each thing is a precious part that has to play its role." श्रीमहाराजही

कापडाच्या गिरणीतली यंत्रे पाहून असेच म्हणाले होते. ते म्हणाले की या यंत्रातला एखादा स्क्रू पडला तर यंत्र बंद पडणार नाही पण त्या प्रमाणात ते यंत्र कमकुवत होईल.

पुस्तकात दुसऱ्या एका ठिकाणी ही नटी म्हणते, सामान्यत: मी सकाळी आठ वाजता उठते. त्यानंतर योगाभ्यास आणि मंत्रजपानंतरच मी माझ्या कामाला सुरुवात करते. पू. बाबा म्हणाले, सामान्यत: सिनेमा सृष्टीतील माणसे म्हणजे थिल्लर असे आपल्याला वाटते, पण हे पहा!

**साधक प** : ही नटी भारतात आली होती. मला आठवते की तिची टीव्हीवर मुलाखात झाली होती. ती मोठी हुशार आहे. तिने झेन तत्त्वज्ञानाचाही अभ्यास केला आहे. स्त्रियांच्या चळवळीतही ती भाग घेते.

**साधक ब** : व्हिएटनाममधील युद्धाविरुद्धच्या चळवळीतही ती होती. व्हिएटनाममध्ये गेली होती.

**पू. बाबा** : आत्मचरित्रात ती एका ठिकाणी म्हणते की ती मूळची पूर्वेकडील देशातील असावी असे तिला वाटते. पण पहा, कोण कसे साधन करते ते! आणि आपण मनासारखे साधन होत नाही म्हणतो! असे कां?

**साधक प**: आपल्या आड काय येते याचा आपण पुष्कळदा विचार केला. निश्चित कारण असे सांगता येत नाही पण विचार करून हे कारण सापडेल असे आता वाटत नाही कारण विचाराच्या सहाय्याने विचारापलीकडे जाता येणार नाही.

**साधक ब** : तथापि जे काही कारण असेल ते नामानेच नाहीसे होईल.

**पू. बाबा** : होय; पण त्यासाठी भरपूर नामस्मरण झाले पाहिजे ना? तेच तर होत नाही.

**साधक प** : आपण अनुभवांच्या मागे लागतो. नामस्मरण 'चांगले व्हावे' असे वाटते आणि त्यातच, मला वाटते, शक्तिपात होतो. काय कोणास ठाऊक, पण ती काहीतरी गांठ आहे खरे!

**पू. बाबा** : चित्तशुद्धी व्हायला पाहिजे. (एकदम साधक ग ना) तुम्हाला काय वाटते? निर्भयता आणणे शक्य आहे काय?

**साधक ग** : होय, शक्य आहे. नाहीतर गीतेत दैवी संपत्ती सांगितली नसती. तसे नसते तर आसुरी संपत्ती घेऊन आलेल्यांना काही आशाच नाही.

**पू. बाबा** : होय, तुमचे हे म्हणणे बरोबर आहे. प्रयत्नांनी सद्गुण वाढवणे माणसाला शक्य आहे. त्यासाठी विवेक पाहिजे.

**साधक ब :** आत्तापर्यंतचे माझे जीवन पाहिले तर मी यशस्वी जीवन जगलो, मी काहीतरी केले असे वाटते. पण असे वाटत असतानाच त्यातील फोलपणाही जाणवतो. असे वाटते की गोष्टी घडत गेल्या. त्यात माझे कर्तृत्व असे काही नाही.

**पू. बाबा :** थोड्या फार फरकाने प्रत्येकाला असेच वाटते आणि तरीदेखील मी कर्ता हे जात नाही. राम कर्ता ही नुसती भाषा होते. आपण भूतकाळ विसरलो तर साधन व्यवस्थित होईल का?

**साधक प :** भूतकाळाबरोबर भविष्यकाळही गेला पाहिजे, तरच वर्तमानात जगता येईल.

**साधक ग :** देहरक्षणासाठी काही प्रमाणात भीती आवश्यकच आहे.

**साधक प :** त्याचा आपल्याला त्रास होत नाही. आपण कल्पनेने भीती निर्माण करतो, ती त्रासदायक होते. (उठताना पू. बाबांस) आता चर्चा पुष्कळ झाली. आमचे साधन चांगले व्हावे म्हणून काय जी अडचण आहे ती तुम्हीच दूर करा ना?

**सर्वजण :** होय, साधक प म्हणतात ते बरोबर आहे.

**पू. बाबा (हसून) :** पाहूं आता! आता पुढच्या महिन्यात आपण शिबिरासाठी गोंदवल्यास जाणारच आहोत. तेव्हां पाहू काय ते! श्रीमहाराजांजवळ प्रार्थना करू.

## ।१९८। (१९ एप्रिल १९९१)

**पू. बाबा :** सद्गुरूंना शरण जाण्यात अडचण कोणती? प्रथम, शरण जाणे म्हणजे काय? मला काय वाटते ते सांगतो. मग तुम्हाला काय म्हणायचे आहे ते सांगा. शरण शब्द शॄ या संस्कृत धातूपासून झाला आहे. त्याचा एक अर्थ हिंसा करणे असा आहे. म्हणजे शरण जाण्यात हिंसा आहे. आचार्यांनी देहबुद्धीची हिंसा म्हटले आहे. आपण शरण जाणे, शरण येणे इत्यादी शब्दप्रयोग करतो. शरण जाणे हे कर्म आहे की ती अवस्था आहे? शरण जाण्यात मीपणा नाहीसा करायचा आहे आणि ज्याला शरण जायचे त्याच्या इच्छेवर सर्व काही सोपवायचे आहे.

**साधक प :** सुरुवातीला तरी शरण जाणे हे कर्म आहे. मीच माझा मी नाहीसा करावयाचा आहे.

**पू. बाबा :** शरण जायचे म्हणजे शरण जाणारा आणि ज्याला शरण जायचे तो, या दोघांचा संबंध आहे. जो शरण जातो त्याला, ज्याला शरण जायचे तो

आपल्यापेक्षा श्रेष्ठ आहे हे मान्य असते. surrender पांढरे निशाण! मी आता काही करू शकत नाही हा भाव आहे.

**साधक ग :** व्यवहारातील शरण जाणे आणि अध्यात्मातील शरण जाणे यात फरक केला पाहिजे. लढाईत पराजित राजा जेत्याला शरण जातो तो नाइलाज म्हणून. तो ज्याला शरण जातो त्याच्याबद्दल त्याच्या मनात प्रेम नसते. संधी मिळाली की पराभवाचा वचपा काढावा असे त्याला वाटते. याच्या उलट अध्यात्मात शिष्य जेव्हां गुरूला शरण जातो तेव्हां त्याला गुरु सर्वश्रेष्ठ आहेत असे तर वाटतेच पण त्याचबरोबर ते माझे कल्याण करणारे आहेत अशी श्रद्धा असते.

**साधक ब :** व्यवहारातही प्रत्येक वेळी तुम्ही म्हणता तसे असेलच असे नाही. व्यवहारातही आपल्यापेक्षा श्रेष्ठ माणसांना आपण शरण जातो. त्यांच्याबद्दल कृतज्ञता वाटते.

**साधक ग :** प्रारब्धाचा सिद्धान्त खरा खरा पटला तर माणसाला शरण जाता येईल. कारण मग मी कर्ता हा भाव राहणार नाही. पण आमची अध्यात्मातील शरणागतीही व्यावहारिक शरणागतीसारखीच असते.

**पू. बाबा :** जरा स्पष्ट करून सांगा.

**साधक ग :** म्हणजे असे की ज्या गोष्टी मला माझ्या आंवाक्यातल्या वाटतात तेथे मी कर्ता आणि ज्या माझ्या आंवाक्यापलीकडच्या वाटतात तेथे गुरूंना किंवा देवाला शरण; देवा, आता तूच कर!

**साधक ब :** फिल्मवर सिनेमाची गोष्ट चित्रित झालेली असते. फिल्म उलगडत जाईल तसे काय काय घडायचे ते ठरलेले असते. त्यात बदल होत नाही. आपले जीवनही खरे म्हणजे तसेच आहे. काळ जाईल तशी फिल्म उलगडत जाते व घटना घडतात. आपण मात्र मी हे केले आणि ते केले असे म्हणतो.

**पू. बाबा :** तेही बरोबरच आहे. गीतेत श्रीकृष्णांनी भीष्म द्रोणादि सर्वांना मी मारलेलेच आहे असे म्हणून पुढे लगेच त्यांना मारण्यास तू निमित्त हो असे अर्जुनाला सांगितले आहे.

**साधक प :** फिल्म रीळ उलगडत जाणे त्याच्या म्हणजे भगवंताच्या बाजूने झाले. आपल्या दृष्टीने घटना घडविणे आणि बिघडविणे आपल्यावरच अवलंबून असते.

**पू. बाबा :** शरण जाणे आपल्याला माहीत आहे. मग पूर्ण शरणागति का होत नाही?

**साधक प :** शरण जाण्याचे चिंतन तरी कशाला पाहिजे? शरण गेला की संपले! पुढे काय घडेल याचा विचार तरी कशाला करावयाचा?

**साधक ग :** होय, पण हे कोणी करावयाचे? मीच शरण जावयाचे आणि चिंतन करणे थांबवायचे ना?

**पू. बाबा :** ज्याला शरण जायचे तो आतच आहे पण त्याची आपल्याला ओळख नाही.

**साधक ज :** वृत्ती अंतर्मुख झाली तरच शरणागति शक्य आहे. जन्मोजन्मी आपण देहबुद्धीला चिकटलेले आहोत. तीच टाकायची म्हणजे आत्महत्या करण्यासारखे आहे.

**साधक प :** स्वभावत: वृत्ती बहिर्मुखी आहे. तिला बळजबरीनेच अंतर्मुख करावे लागेल.

**पू. बाबा :** हे सगळे आपल्याला समजते आहे तर आपण अंतर्मुख का होत नाही?

**साधक प :** तीच तर पंचाईत आहे. आपण स्वच्छपणे विचार करू शकतो पण देहाच्या पातळीवर त्यानुसार कृती होत नाही. अंत:करणाला धक्का बसतो. देहाची खेच जास्त आहे.

**साधक ड :** खरे म्हणजे आपल्याला मनापासून केवळ परमार्थ नकोच आहे. तोच हवा असे झाले तर तळमळ लागेल.

**साधक क :** भाऊसाहेबांसारखे शरण जाता आले पाहिजे. त्यांचा स्वभावच तसा होता.

**पू. बाबा :** त्यांची किंवा ब्रह्मानंद महाराज, आनंदसागर यांची गोष्टच वेगळी. मागे एकदा श्रीमहाराजांच्या बरोबर मी गेलो होतो तेव्हां जालन्याला आनंदसागरांच्या खोलीत झोपलो होतो. त्या खोलीत मला नाम ऐकू आले. श्रीमहाराजांना हे सांगितल्यावर ते म्हणाले, बरोबर आहे; अशा वास्तु जतन केल्या पाहिजेत. त्याच वेळी मी श्रीमहाराजांना विचारले होते की आनंदसागरांचे नांव आनंदसागर की अनंतसागर. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, आनंदसागर; कारण ते सदैव आनंदातच होते. अर्थात साधन केल्यावर. त्यावर मी विचारले की त्यांनी कोणते साधन केले? श्रीमहाराज म्हणाले की ते (आनंदसागर) शरण गेले. शरण गेले म्हणजे काय केले ते मात्र त्यावेळी विचारायचे राहून गेले.

**साधक प :** साधनाने साधत नाही हे जेव्हां समजेल तेव्हां खरी शरणागति येईल. आज शरण जाण्यासाठी लागणारी तळमळ आमच्याजवळ नाही.

वास्तविक श्वासोच्छ्वासाप्रमाणेच नामाशिवाय जगता येणे शक्य नाही अशी स्थिती झाली पाहिजे.

**पू. बाबा** : खरी शरणागति झाली तर गुरूंनी सांगितलेल्या आज्ञेचे पालन विनासायास होईल. तिसऱ्या मजल्यावरून उडी टाक असे गुरूंनी आपल्याला सांगितले तर आपण ते करू का? ते सांगतील त्यात आपले हित आहे असे वाटले पाहिजे. उडी टाकून हातपाय मोडून घेणे आपल्या हिताचे आहे असे कोणास वाटेल?

**साधक ड** : कल्याण स्वामींनी ते करून दाखवले. शेंड्याकडे बसून झाडाची फांदी तोडायला समर्थांनी सांगितली आणि त्यांनी ती तोडली.

**साधक क** : श्रीमहाराजांना तुकामाईंनी मारविले नव्हते कां! मला समजत नाही, गुरु असे कां करतात?

**साधक प** : कदाचित शिष्याचा अहं पूर्णपणे नाहीसा करण्यासाठी ते असे काहीतरी करीत असावे. त्याचबरोबर परीक्षाही असावी.

**पू. बाबा** : पहा, नेहमीच्या वापरात असणाऱ्या ह्या शब्दाच्या मागे किती अर्थ दडलेला आहे. आपण शब्द वापरतो तेव्हां त्याची सगळी implications (ध्वन्यर्थ) लक्षात येत नाहीत.

## |१९९| (२६ एप्रिल १९९१)

**पू. बाबा** : गेले चार पाच शुक्रवार असे गेले की माझ्याकडे येऊन जाणारांपैकी कोणीतरी आपल्या चर्चेसाठी विषय पुरवीत आहेत. हे कसं झालं ते माहीत नाही, पण झालं आहे येवढं मात्र खरं! ह्या आठवड्यात एकजण भेटून गेले. परमार्थ करता यावा म्हणून ब्रह्मचारी राहिले आहेत. घरदार, पैसाअडका यांचे भावाला मुखत्यारपत्र करून दिले आणि सगळ्या व्यापातून मोकळे झाले. तथापि इस्टेटीच्या बाबतीत काही घोटाळा निर्माण झाल्यामुळे जाबजबाबासाठी त्यांना कोर्टात हजर रहावे लागले त्यामुळे ते विषण्ण होते. हे प्रारब्ध!

एकदा त्यांना सज्जनगडावर एक भिकाऱ्यासारखा दिसणारा माणूस भेटला. तेथील लोकही त्याला तसेच वागवीत होते. त्याने यांना विचारले की तुम्ही रोज किती जप करता? हे म्हणाले, बराच करतो, पण पाहिजे तितका चांगला होत नाही. त्याची चौकशी केल्यावर त्याने सांगितले की तो ब्राह्मण असून शेतीचा व्यवसाय करीत असे. मूळ कर्नाटकातील. त्याला ब्रह्मानंद महाराजांनी अनुग्रह दिला होता. त्याने एकदा ब्रह्मानंद महाराजांना विचारले की तुम्ही रोज

किती जप करता? ते म्हणाले की पंचवीस ते तीस हजार करतो पण मग थकून जातो. हा माणूसही रोज खूप जप करतो. तो म्हणाला की आता मी चिंता व भीती यातून मुक्त झालो आहे. मराठी येत नव्हते पण ब्रह्मानंद महाराजांनी ती माझ्या गुरूची भाषा आहे म्हणून सांगितले म्हणून मराठी शिकला. तो म्हणाला की नाम घेतांना सुरुवातीला अनेक संशय येत असत. एकदा तर वाटले की ब्रह्मानंद महाराज नामाबद्दल इतके सांगतात पण यांना तरी काही साधले आहे की नाही कोणास ठाऊक! यानंतर ते जेव्हां ब्रह्मानंद महाराजांना भेटले तेव्हां त्यांना काही विचारण्यापूर्वीच ब्रह्मानंद महाराज म्हणाले की पुन्हा असली शंका घेतलीस तर डोकीत खडावा मारीन. बोलण्याच्या ओघात तो म्हणाला की ईश्वराचे स्वरूप कठोर आहे पण स्वभाव दयाळू आहे.

एका वर्षी पीक चांगले वाढेना म्हणून त्यांनी साधनाने आलेल्या शक्तीचा उपयोग केला. पीक चांगले वाढले! ब्रह्मानंद महाराजांना हे अंतर्ज्ञानाने समजले व त्यांनी त्यांना याबद्दल धारेवर धरले. ते म्हणाले, ब्रह्मानंद महाराज म्हणत की तुम्ही नाम घ्या, श्रीमहाराज तुम्हाला फुलासारखे सांभाळतील.

ही सगळी हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, मनाचा संन्यास हा खरा संन्यास. केवळ काषाय वस्त्रे लेवून संन्यास होत नाही असे आचार्यांनी म्हटले आहे ते खरे आहे. सेंट्रल बँकेतील एक अधिकारी श्रीमहाराजांकडे येत असत. असेच एकदा ते त्यांच्या पारशी सहकाऱ्याला बरोबर घेऊन आले असतांना श्रीमहाराज म्हणाले की साधनात निरुत्साह वाटणे, कंटाळा येणे, कसा तरी जप करणे हे रोगी साधनाचे लक्षण आहे. याच्या उलट साधनाचा उत्साह वाटणे, आणखी नामस्मरण करावे असे एकसारखे वाटणे, नामस्मरण करतांना ते ज्यांनी दिले त्या सद्गुरूंचे स्मरण इत्यादी लक्षणे निरोगी नामस्मरणाची लक्षणे आहेत. आपले नामस्मरण निरोगी हवे.

**साधक क :** ते एकंदरीत कठीणच दिसते.

**पू. बाबा :** मी पाहिले आहे आणि माझा अनुभवही आहे की परमार्थासाठी दोन गुणांची अत्यंत आवश्यकता आहे. पहिला गुण, काहीही झाले तरी ते सहन करणे. प्रपंचात चांगला वाईट कसाही प्रसंग आला, कोणी काही बोलले तरी ते सहन करता आले पाहिजे. विशेषत: घरातली माणसे तुम्हाला नांवे ठेवू लागली, कमी जास्त म्हणू लागली की ते आतून कोणतीही ऊर्मी न येता सहन करणे फार अवघड आहे. यालाच तितिक्षा म्हणतात.

दुसरा गुण, अक्षोभ. काहीही होवो, शांत राहता आले पाहिजे. डिस्टर्ब होता कामा नये. आपले मन किती लगेच वरखाली होऊ लागते. प्रत्यक्ष घटनेपेक्षा तिच्या कल्पनेनेच आपण ढवळून निघतो. जपाकडे लक्ष लागत नाही. हे दोन्ही गुण अंगी असलेल्या भक्ताचे वर्णन करतांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "दक्षिण उत्तर मारुता। मेरु जैसा पांडुसुता। तैसा सुखदुःख प्राप्ता। मध्यस्थु जो॥ १२.२०३॥"

**साधक ग :** हे दोन्ही गुण एकमेकांशी जोडलेलेच आहेत.

**पू. बाबा :** You are right ! साधनात पाऊल पुढे पडावेसे वाटत असेल तर त्यासाठी प्रयत्न करावाच लागेल.

**साधक प :** चित्तशुद्धीखेरीज हे शक्य नाही. त्यासाठीच साधन चतुष्टय सांगितलेले असावे.

**पू. बाबा :** होय. एकदा श्रीमहाराजांना विचारले की तुम्ही नाम घ्यायला सांगता पण साधन चतुष्टयासंबंधी काहीच सांगत नाही. यावर श्रीमहाराज म्हणाले की एखाद्याला लग्न कर म्हणून सांगितले की त्यात लग्नाचे सगळे विधी आलेच; ते कर म्हणून वेगळे सांगावे लागत नाही. तसेच हे आहे.

मागे मी तुम्हाला पाँडिचरीच्या मदरचे एक पुस्तक दाखवले होते. त्या आजारी पडत तेव्हां म्हणत की देहातील रज आणि तम कमी होऊन सत्त्वाची वाढ होऊ लागली की माणूस आजारी पडतो आणि तमाचा निचरा होतो. (आमच्यापैकी एकांना) मला वाटते, तुमच्या आजाराचे स्वरूप हेच असावे.

**साधक प :** कृष्णमूर्तींच्या तीन चार आजारांबद्दल श्रीमती पुपुल जयकरांनी बरेच लिहिले आहे. त्या म्हणतात की प्रत्येक आजारानंतर ते अतिशय उल्हसित होत असत.

**पू. बाबा :** बहुधा म्हणूनच श्रीमहाराज म्हणायचे की आजारावर मी उपाय सांगतो, पण तो तुम्हाला पटायचा नाही. उपाय काय तर झालेला आजार भोगून भोग कमी करावा. ते असो; तुम्ही आम्हाला Force (प्रेरणा) म्हणजे काय ते समजावून सांगा. जगात सगळीकडे शक्तीचा खेळ चालला आहे. ही Energy (ऊर्जा) काय आहे?

**साधक प :** Energy (ऊर्जा) आणि Force (प्रेरणा) यात फरक आहे. जेव्हां ऊर्जेला दिशा मिळते अथवा दिली जाते तेव्हां ती प्रेरणा होते.

**पू. बाबा :** मग ऊर्जा म्हणजे काय ते सांगा.

**साधक प :** ऊर्जा किंवा शक्तीची तशी व्याख्या सांगता येणार नाही.

**पू. बाबा :** Being (सत्) ला ऊर्जा म्हणता येईल का?

**साधक ज :** Potential energy (स्थितिज ऊर्जा) आणि Kinetic energy (गतिज ऊर्जा) वेगळ्या आहेत. समजा भिंतीवर एखादा दगड ठेवला आहे तेव्हां त्यात स्थितिज ऊर्जा आहे. पण जेव्हां तो तेथून खाली पडतो तेव्हां तेथे गतिज ऊर्जा असते.

**पू. बाबा :** हे ऊर्जेचे प्रकार झाले. पण मुळात ऊर्जा म्हणजे काय?

**साधक प :** तसे सांगता येणे कठीण आहे. ऊर्जेचे किंवा शक्तीचे कार्य सांगता येते पण ऊर्जा म्हणजे काय ते सांगता येणार नाही. उदाहरणार्थ उत्क्रांती सांगता येते पण DNA ची रचना अशीच का झाली, पहिला जीव कसा निर्माण झाला, पाण्यातल्या जीवाला जमिनीवर यावेसे का वाटले आणि जमिनीवरील जीवाला आकाशात उडावेसे का वाटले हे सांगता येणार नाही. पृथ्वीवरील परिस्थितीनुरूप येथे जीवसृष्टी आहे. श्रीमहाराज म्हणत त्याप्रमाणे दुसऱ्या एखाद्या ग्रहावर तिथल्या परिस्थितीला योग्य अशी जीवसृष्टी असू शकेल.

**पू. बाबा :** होय; पण ही शक्ती आली कोठून? (साधक प यांना) तुम्ही मागच्या शुक्रवारी म्हणाला होता की आपल्या वृत्ती बहिर्मुख धावतात त्यांना आत वळवले पाहिजे. त्यावेळी मला कठोपनिषदातील मंत्र आठवला नाही. त्यात म्हटले आहे की "पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूः तस्मात् पराङ् पश्यति नान्तरात्मन्। (२.१)।" विधात्याने ही इंद्रिये बाहेर धावणारी अशी निर्माण केली आहेत. त्यांना आत वळविणे हे शक्तीचे काम आहे. त्यासाठी अतिशय जागरूक राहिले पाहिजे. केव्हां घसरू सांगता येत नाही. गुरुदेव रानडे त्यांच्या मुलीच्या लग्नाच्या वेळी मंडपात न थांबता बाहेर मोटारीत बसून राहिले होते. त्यांना याबद्दल विचारले. तेव्हां ते म्हणाले, कण्वासारख्या ऋषीची देखील शकुंतला सासरी जाणार म्हणून व्याकूळ अवस्था झाली तेथे मी कोण! इतके सावधपणे स्वतःकडे पाहता आले पाहिजे. गुरु, आपले साधन, देवता इत्यादींची स्वप्ने पडू लागली की ओळखावे गाडी नीट रस्त्यावर आहे. आज आपले नामस्मरण हे कर्म आहे. त्या कर्माला शक्ती लागते. ती शक्यतो इकडे तिकडे वाया जाता कामा नये. यासाठी अखंड सावधानता पाहिजे.

**साधक ग :** साधन हे सर्वात महत्त्वाचे असा निश्चय झाल्याखेरीज ते होणार नाही.

**पू. बाबा :** होय; पण ते केव्हां व्हावयाचे? It is high time now!

**साधक ब :** नामस्मरणाकरिता सुरुवातीला आपल्याला शक्ती लागते, प्रयत्न करावे लागतात. पण त्यानंतर त्या शक्तीचे काहीतरी mutation (उत्परिवर्तन) होत असले पाहिजे. ते झाले की नामच आपल्याला पुढे नेते.

**साधक प :** देहबुद्धी कमी झाल्याखेरीज ते होणार नाही. तुकाराम महाराजांनी देखील 'देहाचा विसर पाडी मज' असेच मागणे मागितले.

**पू. बाबा :** विस्मृतीत सुख असते. आपण झोपतो तेव्हां देहाचा विसर पडतो, आणि झोपेचा आनंद मिळतो. याबद्दल एकदा श्रीमहाराजांजवळ बोलणे निघाले असतांना ते म्हणाले, झोपेतील म्हणजे अज्ञानातील विस्मृतीत इतके सुखसमाधान असते तर ज्ञानाने येणाऱ्या जागेपणीच्या विस्मृतीत किती समाधान असेल! ही खरी सत्पुरुषांची दृष्टी.

**साधक ग :** तुकाराम महाराजांनी पांडुरंगाजवळ मागणे मागितले याचाच अर्थ आपल्या प्रयत्नाने देहाचा विसर पडणे शक्य नाही. त्यासाठी त्याची कृपा झाली पाहिजे.

**पू. बाबा :** होय; पण त्यासाठी आपला प्रयत्न आणि तळमळ नको का? आपल्या आहार विहारातही संयम पाहिजे. मी कसाही वागेन आणि तरीही तू कृपा कर हे कसे शक्य आहे? हां, एक आहे! मी तुझ्या पायाशी पडलो, आतां उठणार नाही अशी शरणागति झाली तर कृपा दूर नाही.

**साधक ब :** नाम हे सर्व कसे काय घडवून आणते हे energy mutation (ऊर्जेचे उत्परिवर्तन) कसे होते ते समजत नाही.

**साधक क :** ज्ञानेश्वर महाराजांच्या हरिपाठात एका अभंगात त्यांनी म्हटले आहे की नामाचे कार्य जेथे वेदांनाही कळले नाही तेथे ते सामान्य जीवजंतूना कसे समजेल?

## |२००| (२ मे १९९१)

उद्या आमच्यापैकी बरेचजण बाहेरगावी जाणार आहोत म्हणून पू. बाबांनी आज बोलावले आहे.

**पू. बाबा :** काल एका साधकांचे पत्र आले आहे. तीन महिन्यांपूर्वी त्यांचे प्रोस्टेटचे ऑपरेशन झाले. त्यांना ऑपरेशनची भीती वाटत होती. ऑपरेशन थिएटरमध्ये जातांना त्यांनी श्रीमहाराजांची मनोमन प्रार्थना केली. आत शिरतांना आपल्या दोन्ही बाजूस त्रयोदशाक्षरी मंत्राचा झोत आहे असे त्यांना जाणवले. त्यांचे नामस्मरण चालू होतेच. पण त्यापेक्षा दोन्ही बाजूंनी कानावर

पडणारे हे नाम अतिशय गोड होते. त्यात आनंद होता. ऑपरेशनच्या सर्व काळात श्रीमहाराज आपल्याजवळ आहेत असे त्यांना भान होते. त्यांनी लिहिले आहे की ऑपरेशनच्या वेळी पूर्वी सांगितल्याप्रमाणे तुम्ही (पू. बाबांनी) माझ्यासाठी प्रार्थना केली असेलच. पू. बाबा म्हणाले की अगदी ऑपरेशनच्या वेळी नव्हे पण त्या दिवशी पहाटे माझे नामस्मरण चालते त्यावेळी मी श्रीमहाराजांजवळ त्यांना बरे वाटू दे अशी प्रार्थना केली होती. पू. बाबा पुढे म्हणाले, ह्या गृहस्थांची फार मोठी साधना आहे असेही नाही, पण हा अनुभव पहा! साधक ब यांचा नाम आणि महाराज एकच आहेत हे कसे कळायचे असा नेहमीचा प्रश्न आहे त्याचे हे उत्तर आहे. हा अनुभव त्यांना कसा आला असावा?

**साधक ग** : आपण म्हणता त्याप्रमाणे त्यांच्या बाजूने खूप साधन नसले तरी श्रीमहाराजांची दया आहे ना? ते दयासिंधू आहेत.

**पू. बाबा** : होय, हे खरे आहे. आपण त्यांच्याकरिता काय करणार? पण ते सदैव आपल्याला मदत करायला तयार आहेत. आपण सोपवले पाहिजे.

**साधक प** : आता हा अनुभवच पहा ना! त्यांनी काही हा अनुभव मागितला नव्हता.

**पू. बाबा** : त्यांचाच आणखी एक अनुभव सांगतो. जुनी गोष्ट आहे. तेव्हां गोंदवल्यास सोवळ्याने आत समाधीपाशी जाऊ देत असत. हे गृहस्थ रोज पादुकांवर डोके टेकल्यानंतर पादुकांवरील एक फूल घेत असत आणि ते फूल कोठीमधे श्रीब्रह्मानंदांना वाहत असत. एक दिवस त्यांच्या मनात विचार आला की आपण हे करतो ते योग्य की अयोग्य. दुसरे दिवशी पादुकांवर डोके टेकल्यावर त्यांना समाधीतून शब्द ऐकू आले की 'अरे, ते आणि मी काही दोन नाही.' त्यानंतर त्यांनी असे फूल वाहणे बंद केले.

हे सांगून पू. बाबांनी विचारले की इतके अनुभव येऊन देखील खरी निष्ठा, नामाला पूर्णपणे वाहून घेणे का होत नाही? कारण पत्रात त्यांनी प्रोस्टेटचा अजून थोडा त्रास होतो त्यामुळे गोंदवल्याला शिबिरासाठी येणे जमणार नाही असे लिहिले आहे. म्हणजे श्रीमहाराजांवर पूर्ण भार टाकणे नाहीच. नुसती उत्कटता उपयोगाची नाही, आर्तता पाहिजे. आर्त म्हणजे काय? श्री. बाबा गद्रे पुण्याच्या मॉडर्न हायस्कूलमधे संस्कृत शिकवीत असत. त्यांना विचारले तेव्हां ते म्हणाले, आ+रत म्हणजे सर्व बाजूंनी रमलेला. नंतर श्रीमहाराजांना मी आर्तचा अर्थ विचारला तेव्हां ते म्हणाले, आपण देवाची किंवा सत्पुरुषाची

आरती करतो. खरी आरती जो आर्त आहे तोच करू शकतो. आर्तीमधें आता माझी शक्ती नाही हा भाव आहे. तुलसीदासांनी निर्बलके बल राम म्हटले आहे. तेथे हा आर्त भाव आहे.

**साधक ख** : गजेंद्राने आर्तपणे हाक मारल्यावर भगवंत त्याला सोडविण्यासाठी धावून आले.

**साधक ग** : व्यंकटेशस्तोत्रात फार चांगले वर्णन आहे. 'गजेंद्राच्या आकांतासी' आकांत शब्द आहे.

**साधक क** : आर्तीपेक्षा झुरणी हा शब्द मला जास्त आवडतो. आर्तता फार काळ टिकणे अवघड आहे. पण झुरणीमध्ये, आपण म्हणाला होतात त्याप्रमाणे silent agony (मूक व्यथा) आहे.

**पू. बाबा** : आपल्या ठिकाणी कशाबद्दल तरी आर्तता आहे का?

**साधक प** : काहीही प्रॉब्लेम असला की तो सोडविण्यासाठी जोपर्यंत आपल्याला वेगवेगळे पर्याय सुचतात तोपर्यंत आर्तता कशी येणार?

**साधक ग** : आपल्याला पैसा, नातलग, मित्र इत्यादींचा आधार वाटतो. पूर्णपणे निराधार वाटल्याशिवाय आर्तता येणार नाही.

**साधक ज** : आर्ततेत शरणागति आहे.

**पू. बाबा** : खरोखर, कसे आपले जीवन आहे!

**साधक ग** : चित्तशुद्धीखेरीज आर्तता येणार नाही.

**साधक ब** : कृष्णमूर्ती म्हणतात त्याप्रमाणे आमची inner poverty (आंतरिक दारिद्र्य) आहे.

**पू. बाबा** : नाही, त्यापेक्षा त्यांनी wretched life (करंटे जीवन) असे केलेले वर्णन जास्त बरोबर आहे.

**साधक प** : स्वामी रामदासांनी वर्णन केले आहे की प्रथम ते केवळ 'राम राम' असा जप करत होते. जेवढा वेळ जप चाले तेवढा वेळ ते शांत असत. जप थांबला की अस्वस्थता येई. पुढे त्यांच्या वडिलांनी त्यांना तेरा अक्षरी मंत्र दिला. जप थांबला की होणारी त्यांची तळमळ ही आर्तता.

**साधक क** : झुरणीतून आर्तता निर्माण होईल.

**साधक प** : अनुभवांमागे जावे असे मी म्हणत नाही. पण आज आपल्याला आधार घ्यायला दुसरे काय आहे?

**पू. बाबा** : आपल्याजवळ धारणाशक्ती नाही. नाहीतर पुन:पुन्हा अनुभव येण्याची काय आवश्यकता आहे? बरे, अनुभव येणे न येणेही आपल्या हाती

नाही. तेव्हां आज तरी शक्य तितके जास्त, मनापासून नामस्मरण करावे आणि प्रार्थना करावी.

### |२०१| (६ मे १९९१)

मुक्काम गोंदवले. पू. बाबांची खोली.

**पू. बाबा :** आपण प्रपंचाकडे जरुरीपेक्षा जास्त लक्ष देतो. त्यामुळे साधन करून देखील आपली प्रगती होत नाही. साधन करणाऱ्याला आहारादि विषयात संयम आवश्यक आहे. गीतेत सहाव्या अध्यायाप्रमाणे अठराव्या अध्यायातही 'विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानस:' इत्यादी वैराग्याची आवश्यक अंगे सांगितली आहेत. उदाहरणार्थ, रमणमहर्षी सर्व अन्न एकत्र कालवून खात असत आणि याला एक वेगळीच चव आहे असे म्हणत. ब्रह्मानंद महाराज सर्व अन्न पाण्यात भिजवून काढून खात असत. आपण तसे करू नये. पण चवीला किती महत्त्व द्यायचे? भागवतात म्हटलेच आहे की 'जितं सर्वं जिते रसे.'

### |२०२| (८ मे १९९१)

सातव्या नामसाधन अभ्यास शिबिराचा दुसरा दिवस.

**पू. बाबा :** माणसाला लौकिकाची एवढी ओढ का असते? आणि लौकिक म्हणजे नेमके काय?

**साधक ब :** लौकिक म्हणतो तेव्हां आपण आपले एक image (प्रतिमा) बनवलेले असते. त्याला धक्का लागू नये असे वाटते. मी चांगला नसलो तरी लोकांनी मला चांगला म्हणावेसे वाटते.

**पू. बाबा :** पण ते वस्तुस्थितीला धरून नसते ना?

**साधक ब :** म्हणून तर त्याला इमेज म्हणायचे. इमेज खरे नसतेच. काहीवेळा ते चुकीचेही असू शकते.

**साधक ग :** लोकेषणेला म्हणजे लौकिकाला सामाजिक अंग आहे. माणूस समाजात राहतो म्हणून त्याला लौकिकाची ओढ असते.

**पू. बाबा :** होय. हे बरोबर आहे.

**साधक ग :** वित्तेषणेचेही असेच आहे. वित्ताचा उपयोग समाजातच होतो आणि वित्त कशाला म्हणायचे तेही समाजच ठरवतो. आपल्या मृत्यूनंतर आपले नांव राहावे असे वाटते ही देखील अमरत्वाकडे असलेली ओढ आहे.

**पू. बाबा :** तथापि लौकिकाची ओढ टाळणे आवश्यक आहे. नाहीतर माणूस त्यात गुरफटत जातो.

आमचे हे बोलणे चाललेले असतांना एक बाई आल्या. त्यांनी नामात प्रेम येण्यासाठी काय करावे असे पू. बाबांना विचारले.

**पू. बाबा :** नामात प्रेम येण्यासाठी प्रथम आपले कशावर तरी प्रेम असले पाहिजे. मग ते तिकडून नामाकडे वळवावयाचे. तुमचे कशावर प्रेम आहे?

काही उत्तर न देता बाई गप्प राहिल्या.

**पू. बाबा :** तुम्हाला माझा प्रश्न समजलेला नाही का? तुमचे कशावर प्रेम आहे ते पाहिजे तर सांगू नका पण कशावर तरी प्रेम आहे ना?

**बाई :** इतर संसारी माणसांची जी कथा तीच माझी.

**पू. बाबा :** भगवंत पाहिजे असेल तर ते प्रेम तिकडून काढून भगवंताकडे वळविले पाहिजे. खरी पंचाईत अशी आहे की आपले ध्येय निश्चित होत नाही. ते निश्चित झाले तर बाकीच्या संसाराचे काही का होईना, मी भगवंताला सोडणार नाही असे माणूस म्हणेल.

रिझर्व बँकेत नोकरीला असलेले एक गृहस्थ आले. ते पू. बाबांना आधी भेटले होते. त्यांच्या वडिलांच्या मृत्यूनंतर दहाव्या दिवशी पिंडाला कावळा शिवला नाही आणि स्वप्नात नेहमी वडील येतात म्हणून ते अस्वस्थ होते. त्यांनी त्यासंबंधी प्रश्न विचारला.

**पू. बाबा :** पिंडाला कावळा शिवणे, श्राद्ध इत्यादी गोष्टी धर्मशास्त्राच्या आहेत. त्यांचा अध्यात्माशी संबंध नाही. माणूस मेला की त्याच्या कर्मानुसार त्याचा पुढचा प्रवास सुरू होतो असे अध्यात्म सांगते. श्राद्ध इत्यादी करण्याने तो बदलता आला तर प्रारब्धाचा सिद्धान्त लटका पडेल.

**गृहस्थ :** जप करू लागल्यापासून वडील स्वप्नात येणे कमी झाले आहे. प्रारब्धाचा सिद्धान्त सत्पुरुषांनाही लागू आहे का?

**पू. बाबा :** सत्पुरुषांचे संचित नाहीसे होते. ते देहबुद्धीच्या पलीकडे गेलेले असतात त्यामुळे क्रियमाण निर्माण होत नाही. देहबुद्धी गेलेली असली तरी देह असतोच ना? त्याला प्रारब्ध भोगावे लागतेच. पण सत्पुरुषाला त्याचे सुखदु:ख नसते. ते असो. जप करीत राहा, तुमच्या सगळ्या अडचणी नाहीशा होतील.

## |२०३| (९ मे १९९१)

**पू. बाबा :** येथे नेहमी येणारे एक साधक आहेत. त्यांना तीन वर्षांपूर्वी मी 'तक्रार करायची नाही' हा अभ्यास करायला सांगितले होते. आज सकाळी ते भेटले होते तेव्हां त्यांनी सांगितले की त्यांचा अभ्यास चालू आहे, इतकेच नव्हे तर त्यात काही प्रमाणात यशही आले आहे. आता निदान लहान सहान बाबतीत ते तक्रार करीत नाहीत.

**साधक क :** याचा अर्थ तक्रारीच्या भिन्न पातळ्या असतात.

**साधक आ :** तक्रार न करणे याचा अर्थ प्रतिक्रिया न होणे.

**साधक प :** ही फार वरची पायरी आहे.

**पू. बाबा :** तक्रार नसणे म्हणजे जे घडते त्याचा स्वीकार करणे. हे घडणे परिस्थितीला अनुसरून असेल तर स्वीकार करणे सोपे असते. तसेच काही वेळा जे घडते ते आवडले नाही तरी त्याला आपली हरकत नसते. म्हणून तक्रार म्हणजे मनाविरुद्ध घडणे आले. सर्वात प्रथम ते शारीरिक पातळीवर आहे. शरीराच्या बाबतीत काही कमीजास्त झाले की आपण तक्रार करतो. शारीरिक (Physical) मानसिक (Psychological) आणि आध्यात्मिक (Metaphysical) अशा तक्रारीच्या तीन पातळ्या आहेत. तक्रार गेली तर काळजी जाईलच. कारण काळजी म्हणजे उद्याची, आज कल्पनेने केलेली तक्रार असते. तक्रारीत Valuation आहे.

**साधक ब :** साधन चांगले व्हावे म्हणून तक्रार करावयाची नाही हे लक्षात ठेवले पाहिजे. कारण तक्रार सुटली आणि माणूस तेथेच थांबला तर तो केवळ एक सद्गुण ठरेल. तक्रार न करण्यात यापेक्षा जास्त positive aspect आहे. समाधान असेल तरच तक्रार पूर्णपणे जाईल.

**साधक प :** परिस्थिती पूर्णपणे प्रत्यक्ष कळल्याशिवाय तक्रार जाईल का?

**साधक :** तक्रार नसणे याला वेदान्तानुसार तितिक्षा म्हणता येईल.

**पू. बाबा :** तक्रार नाहीशी होण्यासाठी नेहमी सावध राहावे लागेल. हा अभ्यास व्यवहारात, रोजच्या जीवनात करण्यासारखा आहे. खरोखर श्रद्धा असेल तर सर्व काही आपल्या सद्गुरूंच्या इच्छेने घडते म्हटल्यावर तक्रार राहणारच नाही. तक्रारीचे मूळ मीपणात आहे म्हणून मीपणा कमी झाल्याशिवाय तक्रार जायची नाही. तक्रार न करण्यात शरणागतीची सुरुवात आहे.

## |२०४| (११ मे १९९१)

आज संध्याकाळच्या निरूपणात पू. बाबांनी सांगितले की नामस्मरणाचा अभ्यास केला पाहिजे. सद्गुरु मदत करतीलच. नंतर सात वाजता त्यांच्या खोलीत गेलो तेव्हां संध्याकाळच्या विषयावरच बोलतांना ते म्हणाले की नाम हे पूर्ण आहे ही जाणीव सतत जागी राहिली पाहिजे. तत्त्व माहीत झाले तरी ते आचरणात येईपर्यंत अभ्यास केला पाहिजे. शेवटी प्रत्येकाला स्वत:चे साधन स्वत:च करावे लागेल. समूहाने केलेल्या साधनाची एका मर्यादेपर्यंतच मदत होईल. पहाटे जप करतांना तुम्हालाच आपण खरोखर कसे आहोत याची जाणीव होऊन चित्तशुद्धीला मदत होईल. ही स्वत:शीच करावयाची लढाई (self encounter) आहे. You have to carry your own cross. अनेक मुखांनी आपला शक्तिपात होत असतो तो सदैव सावध राहून थांबवला पाहिजे.

## |२०५| (१७ मे १९९१)

मालाड. पू. बाबांच्या घरी.

**पू. बाबा :** येथे येणाऱ्या कित्येकजणांना श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचे अनुभव आलेले आपण ऐकतो. अनुभव सांगणारे प्रामाणिक असतात. पण असे असूनही हे लोक काळजीतून मुक्त झालेले दिसत नाहीत. असे कां होते?

**साधक प :** अनुभव आला तरी तो तात्पुरता असतो. संकटाच्या वेळी श्रीमहाराजांचा आधार वाटतो पण संकट गेले की तो भाव टिकत नाही. कारण तो वरवरचा असतो.

**साधक ग :** मला वाटते की हे अनुभव केवळ देहाच्या पातळीवरचे असतात, देहाच्या सुखदु:खाशी निगडीत असतात. त्याच्यापेक्षा खोल ते शिरत नाहीत. चित्तशुद्धी होऊन देहबुद्धी कमी झाल्याशिवाय ते आत शिरणारही नाहीत.

**साधक ड :** आज तरी आपली मी देह आहे अशीच भावना आहे. त्यामुळे सर्व विचार, वृत्ती त्याला धरून अगदी वरवरच्या आहेत.

**पू. बाबा :** पण आलेला अनुभव तर खरा असतो. मग भाव का टिकत नाही?

**साधक प :** माझे जगणे श्रीमहाराजांच्यामुळे आहे असे जेव्हां वाटेल तेव्हांच येणाऱ्या अनुभवांचा खरेपणा स्थिर होईल. इतकेच नव्हे तर आणखी अनुभव यावेत ही इच्छाही नाहीशी होईल.

**साधक ब** : (पू. बाबांना) आपण गोंदवल्याला शिबिरात सांगितले होते की परमात्मस्वरूप जेव्हां दृश्यात आले तेव्हां त्या दृश्याचे पहिले रूप किंवा विग्रह म्हणजेच ॐकार. नामस्मरणात ॐकार सामावलेला आहे. ते आदिबीज आहे ही जाणीव एकसारखी राहिली तर नामस्मरण खोलवर जाईल आणि खऱ्या अर्थाने नामाची संगत लाभेल.

**पू. बाबा** : होय, हे बरोबर सांगितलेत. नामाच्या अर्थाची जाणीव महत्त्वाची आहे. तीच खरी नामाची संगत आहे.

**साधक प** : आपल्या जीवनात नाम इतके खोल शिरल्याशिवाय खरी प्रगती झाली असे म्हणता येणार नाही. वास्तविक आपली सर्वांचीच स्थिती अशी आहे की जीवनात आणखी काही मिळवायचे राहिले आहे असे नाही; किंवा तेच जीवन पुन्हा जगावे असा उत्साहही राहिलेला नाही. पण तरीदेखील नामाने वृत्ती, वासना शांत होण्याचा जो खरा खरा अनुभव आला पाहिजे तो येत नाही.

**पू. बाबा** : गोंदवल्याहून परत आल्यापासून तुम्हाला सांगायचे म्हणत होतो. तेथे पाच-सहा दिवस नामस्मरण किती उत्तम झाले! पण इकडे परत आल्यावर त्याची हवा झाली. असे होता कामा नये. एकसारखे गोंदवल्याला तरी कितीदा जाणार? आणि तिथे नेहमी राहणारे साधक म्हणतात की समाधीची पूजाअर्चा करतांना देखील त्यांचा श्रीमहाराजांच्या अस्तित्वासंबंधीचा भाव एकसारखा टिकत नाही. ते केवळ कर्मकांड होते. म्हणून येथे घरीच आपल्याला नामस्मरणाची ती तीव्रता निर्माण करता आली पाहिजे.

**साधक ड** : मला वाटते, वैखरीने नाम घेतले तर किंवा भजन केले तर ते जमेल.

**पू. बाबा** : पण घरात राहून ते एकसारखे कसे जमणार? घरातल्या इतरांना त्याचा उपद्रवच व्हावयाचा. तथापि, लक्षात ठेवा, श्रवणाचा आणि सत्संगतीचा उपयोग होतोच, शुक्रवारी आपण भेटलो की पातळी कशी पुन्हा उंचावते.

**साधक ड व ज (एकदम)** : वा! यासाठी आम्ही शुक्रवारची वाटच पहात असतो.

**साधक ग** : आम्ही घरी परत गेलो की घरचाही एक साचा (pattern) ठरलेला असतो, त्यात सापडतो.

**पू. बाबा :** आपल्यापुरता तो पॅटर्न बदलावा लागेल.

**साधक ज :** वास्तविक वर्तमानपत्रात विशेष असे काही नसते. पण ती वाचण्यात, टी. व्ही. पाहण्यात वेळ जातो.

**पू. बाबा :** हे थांबवले पाहिजे. तिकडे आपले चित्त जाते कारण आपल्याला त्याची आवड आहे. ती आवड बदलल्याखेरीज परमार्थ नाही.

**साधक प :** राखाल म्हणजे स्वामी ब्रह्मानंद वृंदावनात गेले होते तेव्हां त्यांना एका बटूची संगत लाभली होती. सूक्ष्म देहातील तो बटू त्यांना दिसत असे आणि मार्गदर्शन करीत असे. श्रीकृष्ण हा त्यांचा सनातन सवंगडी (eternal companion) होता. श्रीरामकृष्णांनी त्यांना प्रथम पाहिले तेव्हां त्यांना कमळाच्या एका पाकळीवर श्रीकृष्ण आणि दुसऱ्या पाकळीवर गोपवेषात राखाल दिसला होता! पण हे माहीत झाले तर त्यांच्या हातून जगातील कार्य होणार नाही हे जाणून श्रीरामकृष्णांनी ही गोष्ट त्यांच्यापासून लपवून ठेवली होती. ब्रह्मानंद पुढे कित्येक वर्षे रामकृष्ण मिशनचे अध्यक्ष होते.

**पू. बाबा :** स्वामी रामदास कसे नामात रंगून गेले होते!

**साधक प :** त्यांचीही सुरुवातीला फरफट झाली. त्यांच्याप्रमाणे नामस्मरण थांबताच तळमळ वाटू लागली तर आपोआपच नामस्मरण वाढेल. नाम घे म्हणून कोणी सांगावे लागणार नाही.

**पू बाबा :** ह्या मोठ्यांच्या अवस्था आहेत. आपण निदान नामाच्या संगतीत राहायचा प्रयत्न करावा. (साधक ख ना) काय हो, हे शक्य आहे की नाही?

**साधक ख :** नाम आम्हाला खऱ्या अर्थाने माहीत नाही. त्यापेक्षा श्रीमहाराजांच्या संगतीचा अभ्यास करणे सोपे आहे.

**पू बाबा :** होय; पण आता श्रीमहाराज नाहीत असेही आपल्याला वाटते. याउलट नाम पूर्वी होते, आता आहे व आपल्यानंतरही राहणार आहे. म्हणून त्याच्या संगतीचा अभ्यास करावा. राम कर्ता हा भाव वाढवावा. त्याखेरीज मीपणा कमी होणार नाही.

**साधक प :** जीवनात रोज येणारे बरेवाईट प्रसंग पाहून वा! आज महाराजांची ही इच्छा दिसते असे वाटून आनंदच झाला पाहिजे.

## |२०६| (२४ मे १९९१)

**पू. बाबा :** मागे एकदा एकटाच श्रीमहाराजांबरोबर अश्वत्थपूरला गेलो होतो. जायच्या आदल्या दिवशीच मला किडनीचा त्रास (Renal colic) होऊ लागला. अंगात तापही होता. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी डेक्कन क्वीनने निघावयाचे होते. दुपारी पू. तात्यासाहेब मला म्हणाले की तुमच्या अंगात ताप आहे, तेव्हां पाहिजे तर तुम्ही येऊ नका. मला जाऊ नये असे आतून वाटत नव्हते म्हणून म्हणालो की ठरलेला बेत बदलायचे कारण नाही. पुण्याला गेल्यावरही झोपूनच होतो. अश्वत्थपूरला गेल्यावर तेथे श्रीमहाराजांना भेटायला एक गृहस्थ आले. त्यांनी उमदीकर महाराजांकडून अनुग्रह घेतलेला होता. मोठे साधनी होते. त्यांचे दासबोधावर प्रेम होते. लोकांना दासबोध सांगतही असत. त्यांच्याबाबत श्रीमहाराज एकदा श्री. काकासाहेब तुळपुळे यांना म्हणाले होते की हे तुमच्या कितीतरी पुढे आहेत. त्या दिवशी मात्र श्रीमहाराज त्यांच्याशी थोडे कडक बोलले. श्रीमहाराज त्यांना म्हणाले, तुम्हाला काय मिळवायचे आहे ते ठरवा. साधन बरोबर चालल्याची खूण म्हणजे समाधान वाढले पाहिजे.

हे आज आठवायचे कारण सध्या ज्ञानेश्वरीतला जो विषय चालला आहे त्याच्याशी याचा संबंध आहे. सध्या 'कच्चिदतेच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा। कच्चिदज्ञानसंमोह: प्रनष्टस्ते धनंजय॥ १८.७२॥ हा श्लोक चालू आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी त्यावरील टीकेत म्हटले आहे की

येऱ्हवीं आपुलें करणें। सर्वज्ञ काय तो नेणे॥
परि केलें पुसणें। याचिलागीं॥ १५४८॥
एवं करोनियां प्रश्न। नसतेंचि अर्जुनपण।
आणुनियां जालें पूर्णपण। तें बोलवी स्वयें॥ ४९॥
मग क्षीराब्धीतें सांडितु। गगनीं पुंज मंडितु।
निवडे जैसा न निवडितु। पूर्णचंद्र॥ ५०॥
तैसा ब्रह्म मी हें विसरे। तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे।
हेंही सांडी तरी विरे। ब्रह्मपणही॥ ५१॥
ऐसा मोडतु मांडितु ब्रह्मे। तो दु:खें देहाचिये सीमे।
मी अर्जुन येणें नामें। उभा ठेला॥ १५५२॥

पू. बाबा म्हणाले, यांतले 'मोडतु मांडितु' हे experssion (शब्द वर्णन) मला फार आवडले. श्रीकृष्णांनी विचारल्यावर अर्जुनाला मी ब्रह्म आहे या

भावाचा विसर पडला; पण मग जग ब्रह्म दिसू लागले आणि त्यानंतर ते दोन्ही जाऊन तो अर्जुनभावाच्या मर्यादित आला. आपले साधन असे 'मोडतु मांडितु' झाले पाहिजे. नामस्मरण करायला बसले की देहभान विसरले; पुन्हा काही वेळाने देहावर आला, पुन्हा विसरला असे झाले म्हणजे मग साधनाचे कष्ट राहाणार नाहीत. हे कां होत नाही; तर आपले ध्येय निश्चित ठरत नाही. ते कां ठरत नाही? आड काय येते?

**साधक प :** ते ध्येय नाही असे म्हणता येणार नाही. तसे असते तर साधनच केले नसते. आता आम्ही साधनाशिवाय राहू शकत नाही म्हणजे ध्येय ठरलेले आहे. मग भलेही नामस्मरणाने काय साधणार आहे ते माहीत नसो.

**साधक ग :** ध्येय ठरावयाचे म्हणजे आज तरी इतर अनेक गोष्टींप्रमाणे भगवंतही हवा असे वाटते. आता केवळ भगवंतच हवा, दुसरे काही असो वा नसो, असे अद्यापि वाटत नाही.

**पू. बाबा :** होय. ध्येय निश्चित ठरले आणि ते गाठण्यासाठी साधन निश्चित ठरले की मग साधनात ढिलाई राहणार नाही. नामस्मरण थांबले की अरे अरे! असे वाटले पाहिजे. तळमळ निर्माण झाल्याखेरीज अखंड नामस्मरण होणार नाही. हे होत नाही याचे कारण, मला वाटते, अनेक प्रकारे आपला शक्तिपात होतो. हा शक्तिपात कसा थांबवावा?

**साधक प :** आपण साधन का करतो हे एकदा निश्चित ठरवले पाहिजे. प्रपंच सुधारावा म्हणून करतो का? तसे असेल तर घेतलेले नाम कुठे जाते ते उघडच आहे. मला वाटते, बँकेत जशी वेगवेगळी खाती असतात तशी प्रपंचाचे खाते आणि परमार्थाचे खाते मनाने वेगळी केली पाहिजेत. प्रपंच जसा व्हावयाचा तसाच होणार. त्याकरिता माझे नामस्मरण नाही असे निश्चित ठरले की नामस्मरणाने चित्तशुद्धी आणि पुण्यसंचय होईल आणि मग आपण पारमार्थिक अनुभवात स्थिर होऊ.

**साधक ज (साधक प यांस) :** तुम्ही म्हणता तसे दोन अकाउंटस् वेगळे म्हणून सुरू करायचे आणि प्रपंचात काही कमीजास्त झाले की श्रीमहाराजांजवळ रडायचे असे झाले की या दोन अकाउंटस्मध्ये गल्लत होणारच. हे सगळे कृत्रिम वाटते. त्यापेक्षा 'मी नाम घेतो; काय करायचे ते तुम्ही करा' असे सर्वकाही सद्गुरूंवर सोपवणे चांगले.

**साधक प :** ही शरणागतीची पुढची पायरी आहे. ती चढणे एकदम जमले तर चांगलेच. तथापि विवेकाने प्रपंच आणि परमार्थ वेगळे करण्यात काय अवघड

आहे? विवेकाचा अर्थच तो आहे. हा विवेक साधला तर पुढचे साधन सद्गुरूच करून घेतील. कारण मीपणा गेल्याशिवाय खरे साधनच होणार नाही.

**साधक ड :** मला वाटते, त्यापेक्षा माझी इच्छा श्रीमहाराजांच्या कानांवर घालावी. मात्र जे घडेल ते त्यांनी माझ्या हिताकरिता केले आहे असे मानून त्याचा विनातक्रार स्वीकार करावा.

**साधक प :** हे जमले तर छानच आहे. विषय निघाला तो शक्तिपात कसा थांबवायचा.

**पू. बाबा :** त्यासाठी साधकाला सावध राहिलेच पाहिजे.

**साधक ब :** माझे नामस्मरण प्रपंचाकरता वापरू नका (खर्च करू नका) असे सद्गुरूंना सांगणे आवश्यक आहे काय?

**साधक ग :** ब्रदर लॉरेन्सने म्हटले आहे की मी नाम घेऊ लागलो की त्या नामस्मरणाचे फळ म्हणून बारीक सारीक गोष्टी देऊन तू मला फसवतोस. तसे करू नको. मला बाकी काही नको; केवळ तू हवा आहेस.

'मोडतु मांडितु' या अवस्थेतून पुढे नामस्मरण कसे स्थिर होते या संदर्भात पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली.

एकदा धाकट्या राममंदिरात श्रीमहाराजांनी आरती संपवली आणि एका बाईच्या अंगात भाऊसाहेबांची (केतकर) आई आली. तिने ज्या आवाजात आणि ज्या पद्धतीने भाऊ अशी हाक मारली त्यावरून भाऊसाहेबांनी ही आपली आई आहे असे ओळखले - आणि श्रीमहाराजांनी विचारल्यावर तसे सांगितले. तेव्हा श्रीमहाराजांनी साडेतीन कोटी जपाचा संकल्प सोडला आणि त्या बाईंना (अंगात आलेल्या भाऊसाहेबांच्या आईला) सांगितले, तुमच्याकरिता हा संकल्प सोडला आहे. आता तुम्ही तुमच्या मार्गाने पुढे जा; परत येऊ नका.

ही घटना घडली त्याच्या दुसऱ्या दिवशी श्री. भाऊसाहेबांच्या मनात आले की पहावे तेव्हां श्रीमहाराज अनेक व्यापात गुंतलेले असतात; आता हे साडेतीन कोटी जप केव्हा करणार? श्रीमहाराजांनी हे ओळखले आणि त्यांना म्हणाले, भाऊसाहेब, असा एक क्षण जात नाही की जेव्हां माझा जप चालू नाही!

हे सांगून पू. बाबा म्हणाले, ही फार मोठी अवस्था झाली. पण आपण नामस्मरणाला म्हणून बसतो तेव्हां तरी आपले असे नामस्मरण कां होऊ नये? समजा तुमच्यापैकी कोणाबद्दल माझ्या मनात विचार आला की हा यूसलेस

माणूस आहे; आणि लगेच वाटले की अरेरे, असा विचार मनात यावयाला नको होता, अशा वेळी मनात प्रथम आलेला विचार आणि नंतरचे त्या विचाराबद्दलचे वाटणे ही दोन्ही खरी वाटतात. तसे नाम खरें कां वाटत नाही?

**साधक ग :** घटना किंवा विचार यांना अस्तित्व आहे. आपण जो तेरा अक्षरी जप करतो त्यात कोणता विचार आहे?

**पू. बाबा :** तो ॐकार आहे, आदिबीज आहे. ते भगवंताचे स्वरूप आहे.

**साधक ग :** नामस्मरण करतांना असा काही विचार असणे आवश्यक आहे काय? वास्तविक, नाम हे पवित्र आहे, मंगल आहे, माझ्या गुरूंनी ते मला दिलेले आहे येवढे वाटले तरी पुरेसे आहे.

**पू. बाबा :** पण तो भाव तरी राहतो का? तुलसीदासांनी नामाला 'चारु चिंतामणि' म्हटले आहे. पण आपल्याला नामाची किंमतच कळत नाही.

**साधक ज :** मला वाटते, नामस्मरण करतांना हे नाम कोठून येते याचा विचार करू लागलो तर नाम खोल जाते.

**पू. बाबा :** नाम खोल गेले पाहिजे. ॐकार शब्द कोठून येतो यावर चित्त एकाग्र झाले तरी त्यामुळे नाम खोल जाईलच असे नाही. तसेच केवळ संख्येलाही महत्त्व नाही.

**साधग ग :** Invocation of the Name मधे दिलेले पक्ष्याचे उदाहरण आठवते ना? विशिष्ट उंचीवर जाईपर्यंत पक्षी पंख हालवतात पण मग पंख न हालवता स्थिर तरंगत राहतात.

**पू. बाबा :** बरोबर; नाम घेऊ लागलो की आपली पातळी वर गेली पाहिजे. खाली येऊ लागलात तर पुन्हा नामानेच वर जाता आले पाहिजे. नामात रंगणे हुकमी झाले पाहिजे.

**साधक ब :** नामाची संगत झाली पाहिजे.

**पू. बाबा :** संगत ही पुढची गोष्ट आहे. आधी नाम खरे वाटले पाहिजे. तुम्ही म्हणाल की नामाच्या खरेपणापेक्षा श्रीमहाराजांचे अस्तित्व समजायला सोपे जाते. पण या म्हणण्यातही तसा अर्थ नाही कारण श्रीमहाराज 'होते' असे आपण म्हणतो त्यापेक्षा नाम होते, आहे आणि पुढेही राहील म्हणून नामाच्या सत्यत्वाचा भाव वाढवणे जास्त चांगले. शिवाय नाम केव्हांही, कोठेही घेता येते. 'कईं ऐसी दशा येईल माझ्या अंगा। चित्त पांडुरंगा झुरतसे।' असे झाले पाहिजे. ही झुरणी महत्त्वाची आहे. नाम नाही म्हणजे काहीच नाही अशी तळमळ लागली पाहिजे.

संतांचे अंतरंग समजणे आणि त्या अर्थाने त्यांची संगत लाभणे किती कठीण आहे ते सांगतांना पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. पू. बाबांनी श्रीमहाराजांचे चरित्र लिहून पूर्ण केले आणि नंतर (पू. तात्यासाहेब पेटीवर असतांना) श्रीमहाराजांना दाखवले तेव्हां ते पाहून श्रीमहाराज म्हणाले, काय आहे त्या चरित्रात? महाराज येथे गेले, तेथे गेले, येथे बसले, असे बोलले हेच सगळे देहाचे वर्णन ना? सत्पुरुषाच्या अंतरात काय असते ते कोणाला कळले आहे? त्याचे आतले चरित्र हे त्याचे खरे चरित्र!

## |२०७| (३१ मे १९९१)

आज सुरुवातीलाच पू. बाबांनी निसर्गदत्त महाराजांसंबंधीच्या एका पुस्तकातून त्यांचा व श्री मॉरिस फ्रीडमन यांचा झालेला संवाद वाचून दाखवला. फ्रीडमननी निसर्गदत्त महाराजांना विचारले की तुम्ही मुक्त झालात का आणि कसे? ते म्हणाले की माझ्या गुरूंनी मला 'मी आणि माझे' पण सोडायला सांगितले आणि तो अभ्यास केल्यावर काही दिवसांनी त्यांनी सांगितल्याप्रमाणे मला स्वरूपज्ञान झाले आणि मी मोकळा झालो. यावर फ्रीडमननी विचारले की तुम्हाला सुख-दुःख, इच्छा, भीती वगैरे वाटत नाही का? ते म्हणाले, मीही एक सामान्य माणूस होतो. विशेष शिक्षण झालेले नव्हते; व्यापार करीत असे. तथापि स्वरूपज्ञान झाल्यानंतर सुख-दुःखादी द्वंद्वे, इच्छा, भीती नाहीशी झाली. फ्रीडमननी विचारले, तुम्हाला मृत्यूची भीती वाटत नाही का? यावर निसर्गदत्त महाराज म्हणाले, मी केव्हांच मेलो आहे! मेलेल्याला कसली मरणाची भीती? पण तुम्ही तर आम्हाला समोर दिसत आहात, फ्रीडमन म्हणाले. ते म्हणाले, तो आता केवळ शरीराने दिसतो आहे. 'मी' केव्हांच मेलेलो आहे. स्वरूपज्ञान झाले की तुम्हालाही ही अवस्था प्राप्त होऊ शकेल. फ्रीडमन म्हणाले, तुम्ही जगाकरिता काही कां करीत नाही? निसर्गदत्त महाराज म्हणाले की सत्पुरुष जगासाठी सूक्ष्मात कार्य करतात. स्थूलात कार्य करणारांपेक्षा ते जगाच्या हितासाठी किती तरी जास्त कार्य करतात.

हे वाचून झाल्यावर पू. बाबांनी विचारले की 'मी आणि माझेपण' कसे सोडावयाचे?

**साधक प** : 'मी' सुटला की 'माझे' सुटेल कारण तो 'मी'चाच विस्तार आहे.

**साधक ब :** माझ्या घरातली माणसे, नातेवाईक, मित्रमंडळी इत्यादी माझ्यावर अवलंबून आहेत हा माझा भ्रम आहे. आपल्यावर कोणीही अवलंबून असत नाही. आपण गेलो की थोडे दिवस त्यांची गैरसोय होत असेल, पण मग सगळे विसरून जातात. हे मनात ठसले की माझेपण ढिले होईल.

**साधक ग :** अडचण अशी आहे की मीच त्यांना धरून ठेवले आहे.

**साधक प :** अनेक गोष्टीत आपण थोडे थोडे गुंतलेले आहोत. त्यातून सुटल्याशिवाय भगवंताकडे पूर्णपणे लक्ष लागणार नाही; आणि हे आपल्यालाच करावे लागेल.

**पू. बाबा :** हा अभ्यासच आहे.

**साधक ग :** गुरुदेव रानडे कट्टाने म्हणजेच हट्टाने नामस्मरण करावयाला सांगत तसे हट्टानेच या गोष्टी बाजूला साराव्या लागतील.

**पू. बाबा :** प्रारब्धावर एकदा विश्वास बसला की जे घडते ते मला सहन होत नसले तरी बरोबरच आहे असे माणसाला वाटू लागेल.

**साधक ग :** पण प्रारब्धाचा सिद्धान्त हृदयात ठसणे फार अवघड आहे.

**साधक ज :** त्या सिद्धान्तात प्रश्न येतो की माणसाला स्वातंत्र्य आहे की नाही ?

**साधक ग :** सोनोपंत दांडेकर यासाठी फार चांगले उदाहरण देत असत. तुम्ही आगगाडीत बसून पुण्याला निघालात आणि गाडी धावू लागली की गाडीत बसून पुन्हा मुंबईला जाऊ शकत नाही. तथापि डब्यातल्या डब्यात तुम्हाला पुण्याच्या अथवा मुंबईच्या दिशेने हिंडता येते. आपल्या प्रारब्धाधीन जीवनात देखील असेच मर्यादित स्वातंत्र्य असते.

चर्चेत सुरुवातीला पू. बाबा म्हणाले होते की 'संसारदु:खें दुखवला। त्रिविध तापें पोळला। तोचि एक अधिकारी झाला। परमार्थासी॥' असे रामदासांनी म्हटले आहे. म्हणजे ज्यांच्यावर काही संकटे कोसळली नाहीत त्यांनी परमार्थाचा विचारच करू नये की काय अशी शंका निघाली.

**पू. बाबा :** तसे नव्हे; आणि आजवर संकटे कोसळली नाहीत म्हणजे पुढे ती कोसळणार नाहीत असे थोडेच आहे. माणूस दुसऱ्यांच्या अनुभवानेही शहाणा होऊ शकतो. जीवनाचे स्वरूप काय आहे ते ओळखून त्यातून बाजूला होता आले पाहिजे.

**साधक प :** माझे सर्व जीवन त्याच्या इच्छेनुसार चालले आहे असे वाटले पाहिजे. ध्येय निश्चित झाल्याखेरीज तसे वाटणार नाही.

**पू. बाबा** : होईल, होईल; निराश व्हावयाचे कारण नाही.

**साधक (पू. बाबांना)** : आता तुम्हीच आशीर्वाद देऊन करून घ्या!

**पू. बाबा** : सत्पुरुषांच्या सहवासाने परमार्थ सुलभ होतो. तथापि साधन ज्याचे त्यालाच करावे लागते. व्हाइटहेड या प्रख्यात गणितज्ञ तत्त्वज्ञान्यास म्हातारपणी पक्षाघात झाला आणि नीट विचार करता येईना तेव्हां तो म्हणाला, बरोबर आहे. यापुढे मी विचार करू नये अशी ईश्वराची इच्छा असली पाहिजे.

संसारात आसक्ति नको. आपल्या घरात आपल्याला पाहुण्यासारखे राहता आले पाहिजे. नाथांनी 'ऐसें असावें संसारीं। जोंवरि प्राचीनाची दोरी।' या अभंगात हे उदाहरणे देऊन फार छान सांगितले आहे.

नमस्कार करून आम्ही उठलो तेव्हा पू. बाबा म्हणाले, खऱ्या साधकाला लोकांच्या गलबल्याचा त्रास होतो. ग्रेगरी (ग्रेगोरिअन कॅलेंडरचा कर्ता) प्रथम कार्डिनल होता. पुढे पोप म्हणून त्याची नेमणूक झाल्यावर त्याला पूर्वीसारखा साधनाला वेळ मिळेना. तेव्हां तो म्हणाला की मी कार्डिनल होतो तेच बरे होते. हल्ली गोंदवल्याला माझी अशीच स्थिती होते.

## |२०८| (७ जून १९९१)

**पू. बाबा** : मध गोळा करणे ही जशी मधमाशांची सहज प्रवृत्ति असते तशी भक्ताच्या बाबतीत नामस्मरण, भगवत् चिंतन ही सहज प्रवृत्ति झाली पाहिजे. वेळ मिळाला की, त्यात तो रमला पाहिजे, नव्हे, त्याखेरीजचे जीवन त्याला शुष्क, निरर्थक वाटले पाहिजे. शरणागतीनेच हे साधेल. शरणागतीबद्दल तुमची काय कल्पना आहे? नाथभागवताच्या १२ व्या अध्यायात शरणागतीचे वर्णन केले आहे ते आधी ऐका.

मामेकमेव शरणमात्मानं सर्वदेहिनाम्। याहि सर्वात्मभावेन मया स्या ह्यकुतोभयः॥ १५॥ सांडूनि स्त्रीपुत्रविषयध्यान। सांडूनि योग योग्यता शहाणपण। सांडूनि कर्मठता कर्माभिमान। मजलागीं शरण रिघावें॥ २३३॥ सांडूनियां वेदाध्ययन। सांडूनियां शास्त्रश्रवण। सांडूनि प्रवृत्ति निवृत्ति जाण। मजलागीं शरण रिघावें॥ ३४॥ सांडूनि धनमानचेष्टा। सांडूनि सज्ञानप्रतिष्ठा। सांडूनियां नाना निष्ठा। शरण वरिष्ठा मज यावें॥ ३५॥ सांडूनियां वैदिक लौकिक। सांडूनि आगम तांत्रिक। मज शरण रिघालिया देख। माझें निजसुख पावसी॥ ३६॥ सांडूनि कुळाचें उंचपण। सांडूनि जातीचा अभिमान। सांडूनि

आश्रमाचें श्रेष्ठपण। मजलागीं शरण रिघावें॥ ३७॥ सांडूनियां ज्ञान ध्यान। सांडूनियां विधिविधान। सांडूनियां देहाभिमान। मजलागीं शरण रिघावें॥ ३८॥ माझें नांव अंतर्यामी। हृदयींचें जाणता मुख्यत्वें मी। तो मी चाळवेना शब्दधर्मी। श्रद्धा परब्रह्मीं निर्ममत्वें॥ ३९॥ सर्व त्यागाचें त्यागितेपण। उद्धवा तुज मी सांगेन खूण। सर्व सांडावा अभिमान। हें मुख्य लक्षण त्यागाचें॥ २४०॥ सर्वही सांडोनि अभिमान। मज रिघालिया शरण। तुज कैचें जन्ममरण। माझें प्रतापें जाण तरशील॥ २४१॥ .... म्हणसी शरण रिघावें कवणे ठायीं। तरी मी असे तुझ्या हृदयीं। त्या हृदयस्थासी लवलाहीं। शरण पाही रिघावें॥ २४४॥ सर्वभावें सर्वस्वेंसीं। मज हृदयस्था शरण येसी। तैं माझी सर्वगतता पावसी। सर्वभूतनिवासी हृदयस्थू॥ २४५॥ तिळभरी राखोनि अभिमान। जरी मज रिघशी शरण। तरी माझी प्राप्ती नव्हे जाण। अभिमान विघ्न प्राप्तीसी॥ २४६॥ .... यालागीं सांडूनि अभिमान। मज हृदयस्था रिघालिया शरण। तुज मी उद्धरीन जाण। देवकीची आण उद्धवा॥ २५३॥

ओव्या वाचून झाल्यावर पू. बाबांनी विचारले की या ओव्यांत वर्णन केल्याप्रमाणे अभिमानासगट सर्व त्याग झाला तरच शरणागती शक्य आहे काय?

**साधक प :** शरण कोणाला जायचे आहे? ज्याला शरण जायचे तो कोठे बाहेर नाही. तो अंतर्यामीच आहे. बाहेर धावणारे मन आत वळविल्याखेरीज शरणागतीला सुरुवातच होणार नाही. १९८० किंवा ८१ साल असावे, आम्ही आळंदीला राघवदास नावाच्या एका सत्पुरुषांकडे गेलो होतो. बोलता बोलता ते म्हणाले की अगदी ज्ञानेश्वर महाराज समाधीतून बाहेर आले किंवा प्रत्यक्ष रामराया जरी तुमच्या समोर आले तरी तेही 'तू कर', 'मन आत वळव' म्हणूनच सांगतील. हे आपल्यालाच करावे लागणार आहे. भगवंत अंतर्यामी आहे अशी थोडा वेळ जरी जाणीव झाली तरी या ओव्यांमध्ये ज्या गोष्टी सोडायला सांगितल्या आहेत त्या कष्ट न वाटता सुटतील. आज त्या सुटत नाहीत कारण माझे दृश्य जगातले जीवन त्यांना धरूनच चालते. त्याच्या पलीकडच्या आनंदाची, अंतर्यामीची मला जाणीवच नाही.

**पू. बाबा :** होय, हा मुद्दा बरोबर आहे. आपले मन दृश्यातच वावरत असते. ते आत वळवणे महत्त्वाचे आहे. आपल्याला कधी अंतर्यामीची जाणीव झाली आहे कां?

**साधक प :** क्वचित होते. पण दिवसातून पाच मिनिटे तरी सद्गुरूच अंतर्यामी आहेत ही जाणीव झाली तर साधन कर म्हणून सांगावे लागणार नाही.

**पू. बाबा :** पाच मिनिटे! क्षणभर तरी ही जाणीव व्हावी. जाणीव नसली तरी त्याचा अंतरात वास आहे हे निश्चित. तो आत कोठे आहे ते स्थान माहीत नसेना का! आपण नाम घेतो ते त्याच्याच कृपेने ना? हा अंतर्यामीच्या जाणिवेचा मुद्दा फार महत्त्वाचा आहे; कारण शेवटी त्यालाच शरण जायचे आहे. तो माझ्या अंतर्यामी आहे, माझ्या सर्व कृती, माझे विचार, सर्व काही त्याला समजतात. त्याच्यापासून मी काहीही लपवू शकत नाही ही जाणीव झाली की माणूस वेडावाकडा वागणारच नाही. नामाला विरोधी अशा आपल्या वर्तनाचे मूळ वासनेत आहे. निर्वासन झाल्याखेरीज अंतर्यामीची जाणीव व्हावयाची नाही. मनाला दृश्य पहावेसे वाटले आणि डोळे हे इंद्रिय निर्माण झाले, ऐकावेसे वाटले आणि कान निर्माण झाले. अशा प्रकारे वासनेतून - सूक्ष्मातून स्थूल इंद्रिये निर्माण झाली आणि त्यांच्या द्वारा मन. दृश्य जगाचा उपभोग घेऊन वासनापूर्ती करू लागले.

**साधक प :** होय, जप करत बसलो असतांना चांगले गाणे ऐकू आले की जप सोडून मन लगेच तिकडे धावते. मनाची ही वृत्ती मोडावीच लागेल.

**साधक ग :** म्हणजे वृत्तिशून्य अवस्था आली पाहिजे का?

**पू. बाबा :** वृत्तिशून्य नाही. केवळ भगवंताची वृत्ती राहील.

**साधक प :** प्रत्यक्ष श्रीरामांनी देशात हिंडायचा आदेश दिला तेव्हां समर्थ रामदास आणखी साडेतीन कोटी जप करतो म्हणाले किंवा श्रीमहाराज नाम घेण्याची वासना पूर्ण झाली नाही म्हणून परत आलो असे म्हणाले होते ना?

**पू. बाबा :** इतके सांगूनही तुम्ही अजून नाम घेत नाही म्हणून मला परत यावे लागले असे ते म्हणाले होते.

**साधक प :** अंतर्यामीची जाणीव ही तन्द्रीसारखी (Trance) काही अवस्था असते का? ही ध्यानावस्था आहे का?

**पू. बाबा :** तसे म्हणता येईल, अंतर्यामीची जाणीव स्थिर झाली की समाधि अवस्था. तेथे दृश्याचे भान नाहीसे होते.

**साधक म :** तोपर्यंत मोडितु मांडितु अशी अवस्था असेल.

**साधक ब :** असा मनुष्य काही काळ तरी व्यवहाराला निरुपयोगी होईल.

**पू. बाबा :** श्रीरामकृष्णांची अशी स्थिती झाली होती. श्री. परांजपे यांनी दोन खंडात लिहिलेले त्यांचे चरित्र फार वाचनीय आहे. पण ते असू दे, अंतर्यामीची जाणीव कशी होईल?

**साधक ब :** चित्तशुद्धी झाल्याखेरीज ती जाणीव होणार नाही. म्हणूनच नाथांनी अनेक गोष्टी सोडाव्या असे सांगितले आहे.

**साधक प :** मला वाटते, अंतर्यामीची जाणीव झाली की, ह्या गोष्टी आपोआप सुटतील. मी सोडतो म्हणून त्या सुटणे कठीण आहे.

**साधक ब :** हे सुटले पाहिजे. हे माझ्या आड येते आहे ते दूर करा अशी सद्गुरूंची प्रार्थना केली तर ते निश्चित ह्या वासना दूर करतील. खरे म्हणजे ते मदत करायला वाटच पहात आहेत.

**साधक ग :** अंतर्यामीची जाणीव हीच तुकाराम महाराजांनी मागितलेली प्रेमखूण असावी.

**पू. बाबा :** होय. ''जाणोनि नेणतें करी माझें मन। तुझी प्रेमखूण दाऊनिया॥ मग मी संसारीं असेन वर्तत। जेवीं कां जळांत पद्मपत्र॥''

**साधक ग :** म्हणजेच ही प्रेमखूण मिळाली की अवगुण जायला कष्ट नाहीत, मागे एकदा आपली शरणागतीसंबंधी चर्चा झाली होती तेव्हा आपण पाहिले की जोपर्यंत पैसा, नातेवाईक, मित्र इत्यादींचा आधार वाटतो तोपर्यंत शरणागती शक्य नाही.

**साधक प :** आपला खरा आधार, नव्हे आपले अस्तित्व अंतर्यामीवर अवलंबून आहे. कशीही चांगली वाईट स्थिती असली तरी तो आहेच. इतकेच नव्हे तर हे शरीर गेले तरी तो आहेच ही जाणीव शरणागतीला आवश्यक आहे.

**पू. बाबा :** यासाठीच प्रार्थना केली पाहिजे. येता-जाता, उठता-बसता एकसारखे त्याचे स्मरण करावे. गोंदवल्याला कसे छान नामस्मरण झाले. इथे आल्यावर तो भाव हळूहळू कमी झाला. तो आहे, तो आहे, तो माझ्या अंतर्यामी आहे असा त्याच्या अस्तित्वाचा भाव सतत राहिला पाहिजे. हे कसे करायचे ते सांगा.

**साधक ब :** 'जेथें नाम तेथें माझे प्राण' असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. माझ्या हृदयातून नाम येते, म्हणजे तेथे श्रीमहाराज असलेच पाहिजेत. त्याखेरीज ते येणार नाही. ते अंतर्यामी आहेत याची ही खूण आहे.

**पू. बाबा** : 'गोपाळा रे तुझें ध्यान। ध्यान लागो मना॥' असे ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे. आपण केले पाहिजे. होईल. कां नाही जमणार? करत रहा; निराश व्हायचे कारण नाही.

## |२०९| (१६ जून १९९१)

सकाळी आठच्या सुमारास मालाडला पू. बाबांकडे गेलो. गेले चार दिवस पू. बाबांना ताप आहे. डावा गुडघाही खूप दुखतो आहे. स्नायुबंध दुखावला असावा व मलेरियाचा ताप असावा असे डॉक्टरांचे निदान आहे.

पू. बाबा म्हणाले, काल संध्याकाळी गुडघा खूप दुखत होता. चमका येत होत्या. श्रीमहाराजांची प्रार्थना करून त्यांना सांगितले की, सहन करायची शक्ती द्या. बरे करा असे म्हणायचे मनातदेखील आले नाही. ही त्यांचीच कृपा; कारण अशा वेळी खरे हृदयात असते तेच बाहेर येते. ताप आणि गुडघ्याचे दु:ख असले तरी काल आणि आज जप चांगला झाला.

अलीकडे शरणागतीसंबंधी शुक्रवारी चर्चा झाली होती. त्या संदर्भात सारदादेवींशी (श्रीरामकृष्णांच्या पत्नी) त्यांच्या भक्तांच्या झालेल्या संभाषणातील एक गोष्ट साधक ग ना आठवली ती त्यांनी पू. बाबांना सांगितली. 'मातृचरणीं' या पुस्तकात पृ. १९४ वर ती आहे. लेखकाच्या शब्दातच ती येथे देत आहे.

एके दिवशी माताजी म्हणाल्या, ''एवढा जप केला काय, नि एवढं काम केलं काय, कशानंच काही होत नाही. महामायेनं रस्ता सोडून दिल्याशिवाय कोणाची काय बिशाद आहे! हे जीवा, शरणागत हो, केवळ शरणागत हो. मगच ती दया करून रस्ता सोडून देईल'', असे बोलून त्यांनी कामारपुकुरला वास्तव्य करीत असतानाची ठाकुरांच्या जीवनातली एक घटना सांगितली. ''एकदा कामारपुकुरात ज्येष्ठ महिन्यात संध्याकाळी खूप पाऊस पडून मैदानंबिदानं पाण्यानं भरून गेली. ठाकुर डोंबवाड्याकडून समोरच्या खोल रस्त्याने एवढं एवढं पाणी तुडवून शौचाला चालले होते. तिथं 'मागुर' मासे आढळून येऊन पुष्कळ लोक त्यांना काठीनं मारीत होते. एक 'मागुर' मासा ठाकुरांच्या पायाजवळ सारखा घुटमळू लागला. तो पाहून ठाकुर म्हणाले, 'ह्याला मारू नका रे, हा कसा शरणागत होऊन माझ्या पायाजवळ फिरत आहे. कोणाला जमत असल्यास याला नेऊन तळ्यात सोडून या.' त्यानंतर आपणच

त्याला सोडून आले नि घरी येऊन म्हणू लागले, 'अहा, कुणी जर अशा प्रकारे शरण आला तरच त्याचं रक्षण होतं.'''

**पू. बाबा :** ह्या देहाकडून काही पाप झालं नाही असं श्रीरामकृष्ण म्हणत.

**साधक ग :** श्रीसारदादेवींचीही स्वत:च्या पावित्र्यासंबंधी गंगेहून पवित्र असल्याची खात्री होती.

या संदर्भात 'मातृचरणीं'मध्ये पृष्ठ ३०३ वर जी हकिगत दिलेली आहे ती साधक ग यांनी पू. बाबांना सांगितली. ती अशी, ''शेवटच्या खेपेस माताजी जयरामवाटीस असतांना एके दिवशी स्वयंपाकीणबाई रात्री नऊ वाजता येऊन म्हणाली, 'मी कुत्र्याला शिवले, आता आंघोळ करून येते.' माताजी म्हणाल्या, 'इतक्या रात्री आंघोळ करू नकोस; हातपाय धुऊन कपडे बदलून घे.' स्वयंपाकीण म्हणाली, 'असं चालतं का?' माताजी म्हणाल्या, 'मग गंगाजल शिंपडून घे.' ते देखील तिच्या मनाला पटले नाही. तेव्हा माताजी म्हणाल्या, 'तर मग मला स्पर्श कर.'''

## |२१०| (२१ जून १९१९)

डॉ. सोनार यांनी पू. बाबांच्या दोन्ही गुडघ्यांत पू झालेला आहे असे निदान **(Septic focus)** केले व दि. १८ रोजी दोन्ही गुडघ्यांतून प्रत्येकी **40 c.c.** पू काढला. त्यानंतर आजारास उतार पडून तापही नॉर्मलवर आला. ग्लूकोज व रक्तही दिले. त्यानंतर आज डॉ. देशपांडे यांनी उजव्या गुडघ्यातून थोडा पू काढला. अशक्तपणा बराच आहे तथापि पू. बाबा आज बोलण्याच्या mood मध्ये आहेत.

**पू. बाबा :** काल रात्री मी भगवद्‌विचाराच्या जगात फेकला गेलो होतो. देहभान नव्हते. गुडघ्याचे दु:ख वाढले की तेवढ्यापुरता देहावर येत होतो पण पुन्हा विचारात मग्न होत होतो. ते असू दे. (साधक ब ना) रविवारी तुम्हाला तुकाराम महाराजांचा 'नव्हती ते संत करिता कवित्व' हा अभंग सांगितला होता तो गाथ्यात काढून पाहिलात कां?

**साधक ब :** पहिली ओळ नीट लक्षात न राहिल्यामुळे गाथ्यात तो शोधता आला नाही.

**पू. बाबा :** त्या अभंगात शेवटी म्हटले आहे की, जोपर्यंत देहबुद्धी नाहीशी झाली नाही तोपर्यंत त्या माणसाला संत म्हणता येणार नाही, 'तुका म्हणे

नाहीं निरसला देह। तोंवरि आघवे संसारिक॥' मग कवित्व, कीर्तन, पांडित्यादि कोणतेही गुण त्याच्या अंगी असोत.

सौ. दप्तरदारांना अलिकडे रिक्षातून जातांना झालेल्या अपघाताच्या संदर्भात पू. बाबा म्हणाले, असे का झाले किंवा मला देखील हा आजार का झाला याचा विचार करण्यात अर्थ नाही; कारण विचार करून याचे उत्तर मिळणार नाही. 'मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें। तयासारिखें भोगणें प्राप्त झालें॥' असे समर्थांनी त्याचे उत्तर दिले आहे. प्रारब्धाचा सिद्धान्त पटला तर शरीरदु:ख झाले तरी ते साधनाच्या आड येणार नाही. माझ्या या शरीरदु:खात मन शांत आहे पण प्रसन्न राहिलेले नाही. प्रसन्नता राहिली पाहिजे. आजाराचे बरोबर निदान झाले, योग्य ते डॉक्टर आयत्या वेळी नागद्याहून आले आणि उपचार झाले. खरोखर ही मंडळी माझ्यासाठी किती करत आहेत!

**साधक ग :** मंगळवारी आलो होतो तेव्हां डॉ. सोनारांनी येऊन उपचार केल्याचे कळले तेव्हां मनात आले, श्रीमहाराज म्हणतात की, तुम्ही निष्ठेने साधन करा, पाहिजे ती व्यक्ती पाहिजे त्या वेळेला येऊन तुम्हांला मदत करेल.

सौ. दप्तरदार यांचे डॉक्टरांनी कशा प्रकारे ऑपरेशन केले ते ऐकून पू. बाबा म्हणाले, खरोखर जगातले विशेषत: दृश्याचे ज्ञान किती वाढत आहे! ते पूर्ण नसले तरी शास्त्रज्ञांनी आश्चर्यकारक प्रगती केली आहे. माणूस चंद्रावर जाऊन आला. ही झपाट्याची प्रगती कां झाली?

**साधक प :** जगाचे म्हणजेच दृश्याचे ज्ञान additive आहे. त्यात उत्तरोत्तर भर पडत गेली आहे.

**पू. बाबा :** शास्त्रे ज्या तर्काचा उपयोग करतात तो तर्क अध्यात्माला लागू पडत नाही. माणसाला समग्र कारणांचे (totality of causes) ज्ञान होऊ शकत नाही. त्यामुळे भौतिक शास्त्रांमधेदेखील शक्यता (probability) फार तर खूप वरच्या श्रेणीची शक्यता (high degree of probability) असते, निश्चितता (certainty) नाही. कॅसेल नांवाच्या जर्मन शास्त्रज्ञाने आइनस्टाइनला हे पटवून दिले. उदाहरणार्थ, आपल्या शरीरात काय चालले आहे हे आपल्याला किंवा डॉक्टरांनादेखील पूर्णपणे कोठे कळते?

**साधक प :** माझ्या शरीरात काय चालते, घडते ते मला काम करतांना माहिती असायचे कारणही नाही. अन्न कसे पचते, रक्ताभिसरण कसे होते यांची माहिती असायला पाहिजे असे नाही. श्रीमहाराज म्हणत तसे माझा ताप

'माझा' म्हणतो पण मला तो नाहीसा करता येत नाही. पण तरीदेखील विशिष्ट चौकटीत भौतिक शास्त्रात जास्त निश्चितपणा येऊ लागला आहे.

**पू. बाबा** : शास्त्रांची जशी स्थल, काल, निमित्ताची चौकट आहे तशी सूक्ष्म जगताचीही चौकट आहे. तेथे **Valuation** आहे.

**साधक प** : होय; पण ते समजणे अवघड आहे. वास्तविक स्थूलापेक्षा सूक्ष्मातील कार्य जास्त प्रभावशाली असते. एक सत्पुरुष निर्माण झाला तर तो सगळ्या जगाचे कल्याण करतो.

**साधक ग** : काही दिवसांपूर्वी आपण निसर्गदत्त महाराजांचे मॉरिस फ्रीडमनशी झालेले संभाषण वाचून दाखवले होते. त्यात निसर्गदत्त महाराजांनी हेच म्हटले आहे.

**पू. बाबा** : अशा पुरुषांना दिव्य दृष्टी असते. माणूस पाहिला की त्याचे पुढे काय होणार ते त्यांना दिसते. इतकेच नव्हे तर एखाद्या माणसासंबंधी नुसते ऐकूनही त्यांना सर्व समजते. माझे मेहुणे हैदराबादला आजारी होते. त्यांच्या आजारासंबंधी श्रीमहाराजांना मी सांगितले तेव्हा श्रीमहाराजांनी फक्त स्सऽऽ असा दु:खोद्गार काढला. मला वाटले की बहुतेक ते या आजारातून बरे होणार नाहीत. तथापि तेव्हां त्यांना बरे वाटू लागले पण पुढे मधुमेहामुळे त्यांचे डोळे गेले. पायाला गँग्रीन झाले आणि नऊ वर्षे खितपत पडून त्यांचा अंत झाला. गँग्रीनचे ड्रेसिंग करायला एक मुसलमान कंपाउंडर येत असे. तो म्हणायचा की जखमेला इतकी बदबू (दुर्गंधी) येते की घरी गेल्यावर जेवण जात नाही! पुढे ते वारल्यानंतर एक दिवस श्रीमहाराजांना मी विचारले की मागे मी त्यांच्या आजाराबद्दल सांगितले होते तेव्हां आपण स्सऽऽ असा दु:खोद्गार का काढलात? ते म्हणाले की मला हे पुढचे सगळे हाल दिसले होते. ते कसे दिसले म्हणून विचारल्यावर म्हणाले, ते कसे सांगता येईल?

नंतर पुन्हा भौतिक शास्त्रे व अध्यात्म यांबद्दल बोलणे सुरू झाले.

**पू. बाबा** : भौतिक शास्त्रांमध्ये जशी उत्तरोत्तर प्रगती होत गेली तशीच अध्यात्म शास्त्रात झाली असावी का?

**साधक प** : निश्चितच.

**साधक ग** : तथापि या दोहोंत एक महत्त्वाचा फरक आहे. शास्त्रांनी केलेल्या प्रगतीचा उपयोग आणि उपभोग कोणालाही घेता येतो. मला टी.व्ही.चे कार्य कसे चालते हे माहीत नाही पण मी त्याच्यावरचे कार्यक्रम

पाहू शकतो. पण अध्यात्मात स्वत:वरच प्रयोग करावयाचा असल्यामुळे त्यासाठी अधिकार लागतो.

**पू. बाबा :** हा मुद्दा बरोबर वाटतो.

**साधक प :** टी.व्ही. सारखी गोष्ट सोडून द्या पण Rocketry सारख्या शास्त्रात रॉकेटमधून जो माणूस पाठवायचा असेल त्याच्या अनेक चाचण्या घेतात. म्हणजे तेथेही अधिकार लागतोच.

**पू. बाबा :** पण भौतिक शास्त्रांप्रमाणे अध्यात्मात काही निश्चित मार्ग आहेत कां ?

**साधक प :** कां नाहीत ? नामस्मरणाचा मार्गच घ्या. आज मीच पहिला नामस्मरण करणारा असतो तर किती अवघड गेले असते. पण आज हजारो वर्षे त्या मार्गाने जाऊन तो खरा आहे असे सत्पुरुषांनी सांगितले आहे; इतकेच नव्हे तर त्या मार्गावरचे टप्पेही त्यांनी सांगितलेले आहेत. राजमार्ग तयार आहे; फक्त मी त्यावरून चालायचे आहे.

**पू. बाबा :** होय. हे मात्र खरे. नामस्मरणाने भगवंत भेटतो हे संतांनी अनुभव घेऊन खात्रीपूर्वक सांगितले आहे. पण मग आपल्या आड काय येते ? तुम्ही म्हणता तसा राजमार्ग तयार आहे.

**साधक ग :** आमची निष्ठा कमी पडते.

**पू. बाबा :** होऊन गेलेल्या गोष्टींचा, तसेच पुढे काय होईल याचा विचार करायचा नाही असे ठरवले तर नामस्मरण चांगले होईल का ?

**साधक ग :** ते का सोपे आहे ? आपण म्हणता ती विचारशून्य स्थिती आहे. ती जमली तर नामस्मरण चांगले कां होणार नाही ?

**पू. बाबा :** होय, तेही अवघडच दिसते.

**साधक ग :** त्यापेक्षा भाऊसाहेब म्हणत त्याप्रमाणे श्रीमहाराजांना आवडते म्हणून नामस्मरण करावे. असे करण्यात विचार तर थांबतीलच शिवाय त्यात श्रीमहाराजांविषयीच्या प्रेमाची गोडी आहे.

**पू. बाबा :** हे जमले पाहिजे. एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की तुम्ही लोकांना ते ऐकत नाहीत तरी किती पुन:पुन्हा सांगता. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, श्रवणशक्तीप्रमाणे ग्रहणशक्तीही लागते ना ? ती कमी पडते. तुम्ही कॉलेजात लेक्चर्स देताच ना ? सर्वांवर त्यांचा परिणाम कोठे होतो ?

पू. बाबांना परवा श्री. दादा बेलसरे यांचे रक्त दिले होते, त्यावरून बोलणे निघाले की व्यसनी किंवा गुन्हेगार माणसाचे रक्त जर एखाद्याला दिले तर

रक्तातून ते दोष संक्रमित होत असतील का? सर्वांचे म्हणणे होते की काही आजार रक्तातून संक्रमित होतात पण व्यसने आणि गुन्हे संक्रमित होतात असे अद्यापि शास्त्राने सिद्ध झालेले नाही. या संदर्भात पू. बाबांनी अलीकडच्या एका घटनेचा उल्लेख केला. कृष्णमूर्तींना जेव्हां रक्त द्यावे लागले तेव्हा त्यांनी सांगितले होते की, आतापर्यंत हा देह अतिशय पवित्र ठेवलेला आहे. दारू घेणाऱ्याचे रक्त मला देऊ नका.

## |२११| (२५ जून १९९१)

आज मंगळवार; तथापि पू. बाबांची प्रकृती कशी काय आहे ते पहाण्यासाठी आम्ही मालाडला त्यांच्याकडे गेलो. आता त्यांची तब्येत सुधारते आहे. अजून उजव्या गुडघ्यावर थोडी सूज आहे. पाय हालवतांना गुडघ्यातून दुखतो; अशक्तपणाही बराच आहे. आम्ही गेलो तेव्हा ते झोपूनच होते. बोलणेही खोल येत होते. पण मग त्यांना काल रात्री एक स्वप्न पडले होते त्याची आठवण झाली आणि ते सांगण्यासाठी म्हणून उठून बसले आणि एकाएकी प्रसन्न दिसू लागले.

पू. बाबा म्हणाले, काल रात्री स्वप्न पडले; त्यामधे श्रीमहाराजांशी संभाषण झाले. सकाळी उठलो तेव्हा ते सगळे विसरलो होतो. पण स्पंजिंग, कपडे बदलणे इत्यादी झाल्यावर थोडा थकवा आला आणि जरा डोळा लागला तेव्हां ते संभाषण अबोध मनातून (unconscious mind) पुन्हा वर आले. त्यानंतर मात्र पुन:पुन्हा आठवून मी ते लक्षात ठेवले. आज तुम्ही याल अशी कल्पना नव्हती; पण फार छान संभाषण झाले. एकूण तीन मुद्द्यांवर श्रीमहाराज बोलले.

**पहिला मुद्दा असा** : एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो की मी किती क्षुद्र आहे. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, असे का म्हणता? झाडाचे बी किती लहान असते; पण ते भूमीत रुजले आणि त्याचा वृक्ष झाला की तो आकाशात जातो. पृथ्वीचा एक भाग झाल्यामुळे त्याला पृथ्वीचे मोठेपण येते. मग त्याला क्षुद्र कोण म्हणणार? तुम्ही तर इतके वाचन, लेखन केलेले आहे; इतके लोकांना सांगता. भगवंताशी संबंध आला की जीव त्याचा एक भाग बनून जातो. मग त्यात क्षुद्रपणा कोठे राहतो? जगापासून अलग राहिलेला जीव तादात्म्य पावला की विशाल बनतो.

**दुसरा मुद्दा** : 'सहज समाधि'संबंधी बोलणे झाले. 'सहज समाधीचा अभ्यास' प्रसिद्ध करण्यापूर्वी मी श्रीमहाराजांना दाखवले होते. त्यांच्याशी

त्याबद्दल चर्चाही झाली होती. नंतर मनात विचार आला होता की पतंजलींनी सविकल्प, निर्विकल्प इत्यादी समाधिभेद सांगितलेले आहेत त्यांमध्ये सहजसमाधीचे स्थान काय? त्याबद्दल काल श्रीमहाराज म्हणाले की सहजसमाधि ही सर्वोच्च समाधी अवस्था आहे. यामधे प्रपंच आणि परमार्थ असा भेद राहात नाही. प्रपंचात राहूनच साधक समाधी अवस्थेत असतो. देहाची, प्रपंचाची कर्मे तर होत असतात पण त्यात 'मी करतो' ही भावना नसते.

**तिसरा मुद्दा** साध्य व साधन यातील फरकासंबंधी होता. जे साध्याकडे नेते त्याला साधन म्हणतात. आत्मज्ञान किंवा भगवंताचे दर्शन हे साध्य आणि त्यासाठी नामस्मरण हे साधन. पण येथे साधन हेच साध्य केले की साध्य आणि साधन हा भेद राहात नाही. नाम हेच स्वरूप आहे. अनुभवांच्या मागे कशाला लागायचे? साधन करतां करतां, फळ जसे पिकले की हातात येते तसे साधनच साध्य झाल्यावर अनुभव घेणारा वेगळा राहात नाही. फळ पिकले की झाडाला दु:ख नाही आणि फळाला कष्ट नाहीत; तसे हे आहे. न करतेपणा म्हणजेच राम कर्ता हा भाव हाच किती मोठा अनुभव आहे.

पू. बाबा पुढे सांगू लागले. मी विचार केला की हा न करतेपणा का जमत नाही? यॅस्पर **(Jasper)** म्हणून एक जर्मन तत्त्वज्ञ आहे. तो म्हणतो की तत्त्वज्ञानाचा खरा अभ्यास आणि आचरण व्हावयाला वादळात तुमचे जहाज फुटले तर जशी तुमची अवस्था होईल तशी अवस्था झाली पाहिजे. सगळे आधार सुटले पाहिजेत. सुखं च मे, शयनं च मे म्हणतांना त्यातच भगवंतही हवा म्हणतो म्हणून मग काहीच जमत नाही. समजा, मी नाम घेतो; त्यातून काय होणार आहे मला माहीत नाही असा भाव वाढवला तर साधन चांगले होईल का?

**साधक ग** : ही भाऊसाहेबांसारखी स्थिती झाली! श्रीमहाराज भेटले; झाले. आता मिळवायचे असे काही राहिले नाही असे त्यांना वाटले. मग नामस्मरण देखील श्रीमहाराजांना आवडते म्हणून ते करत होते.

**पू. बाबा** : होय; ती अवस्था मोठीच आहे. आणखी एक गोष्ट. मनाला किती जरी शिकवले तरी, ही माझी बायको, हा माझा मुलगा, ह्या माझ्या नाती हा माझेपणा मनातून जात नाही. म्हणजे ही माझेपणाची वासना घेऊन आपण गेलो तर पुढच्या जन्मात माणसे बदलली तरी तीच माझेपणाची वासना राहील. ती सुटणे फार कठीण दिसते.

**साधक ग :** ती सर्व माझी वाटतात; निदान तसे तरी श्रीमहाराज माझे वाटले पाहिजेत.

**पू. बाबा :** होय, असे घडले पाहिजे.

**साधक प :** म्हणजे आजचीच स्थिती पुढच्या जन्मात. आजही अनेक माणसे आणि वस्तूंप्रमाणे श्रीमहाराजही माझे वाटतातच. पण पुढे काय? वास्तविक केवळ महाराजच माझे आहेत, बाकी कोणीही माझे नाही असे वाटले पाहिजे.

**पू. बाबा :** होय; हे जास्त बरोबर आहे. काल दिवसभर श्रीमहाराजांच्या विचारात राहिलो होतो, तर देहदु:खाचा विसर पडला. मधून मधून त्रास होत होता; पण एकंदरीत स्वत:पासून वेगळा झालो होतो. असे देहापासून वेगळे होता आले तर लवकर जमेल का?

**साधक प :** मागे एकदा मला आलेला अनुभव मी तुम्हाला सांगितला होता. रोजचे व्यवहार चालू होते पण मी देहात नव्हतो. पहिले दिवशी गंमत वाटली. दुसरे दिवशीही विशेष वाटले नाही; पण मग भीती वाटू लागली आणि मग तो भाव गेला. मला वाटते, मी देहापासून वेगळा झालो तरी एक पुंज होऊन बाजूला राहिलो. त्या विशालाशी जोडला गेलो नाही. श्रीअरविंदांकडे अय्यर नावाचा एक साधक होता. त्याची अशी स्थिती झाली होती. त्याने श्रीअरविंदांना ते सांगितले. ते म्हणाले की ही चांगली स्थिती आहे; ही टिकवून धर, मी यातून गेलो आहे. पण त्याला ते सहन होईना. अरविंद म्हणाले, You bloody Aiyer, keep it up. पण त्याला ते सहन होईना आणि शेवटी तो तेथून पळून गेला!

**पू. बाबा :** मला आठवतं, मागं मी तुम्हाला सांगितलं होतं. स्वामी रामतीर्थांची पत्रं प्रसिद्ध झालेली आहेत. त्यातील एका पत्रात त्यांनी म्हटलं आहे की सुमारे आठ दिवस आपण देहाबाहेर आहोत अशी त्यांची अवस्था होती!

**साधक ग :** प म्हणतात ते बरोबर असावं. जीव सूक्ष्मरूपाने देहाबाहेर गेला तरी त्याचा जर त्या विशालाशी संबंध जोडला गेला नाही तर विचित्र स्थिती होत असावी.

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणाले, एक माणूस रस्त्याने निघाला. चालता चालता अशा ठिकाणी आला की तेथून पुढे तीन रस्ते फुटले होते. ते रस्ते कोठे जातात हे दाखविणाऱ्या पाट्या किंवा दुसऱ्या काही खुणा तेथे नव्हत्या. त्यामुळे कोणत्या रस्त्याने पुढे जायचे याचा त्याला संभ्रम पडला. अशा वेळी

त्या रस्त्यांची माहिती असणाऱ्या एका सज्जनाने त्याला जेथे जायचे होते तिकडे जाणारा मार्ग दाखविला. ज्ञान, भक्ती, योग, कर्म हे रस्ते फुटतात तेथे सद्गुरु बरोबर रस्ता दाखवतात. इतकेच नव्हे तर वाटेत येणारे खाचखळगे, काटेकुटे यातून हात धरून ते तुम्हाला पुढे नेतात.

**साधक ग :** आजच्या तारखेच्या प्रवचनातच म्हटले आहे की एकदम पुढचा चार मैलांचा रस्ता मला दिसू दे, तर मी चालायला सुरुवात करेन असे म्हणून कसे चालेल? चालू लागलात की पुढचा रस्ता आपोआप दिसू लागेल.

**पू. बाबा :** होय, करत राहिले पाहिजे, खरे म्हणजे श्रीमहाराज सर्व काही करतात, पण आपला 'मी'च आड येतो. सर्व काही श्रीमहाराजांवर सोपवून दिले पाहिजे. आपली हे चांगले, ते वाईट ही भावनाच गेली पाहिजे.

**साधक ग :** म्हणजे जीवनातले norms च गेले पाहिजेत. भाऊसाहेबांच्या पत्नी आजारी असतांना, श्रीमहाराजांनी भाऊसाहेब, कठीण दिसते आहे,, मी काय करू म्हणून विचारले तेव्हा ते म्हणाले की तिच्या कल्याणाचे असेल ते करा!

**पू. बाबा :** होय. आणि अगदी सहज ते त्यांच्या तोंडून आले. वास्तविक तेव्हां त्यांचा संसार अर्धवट झालेला होता. समजा, त्या गेल्या असत्या तर त्यांनी काही दुसरे लग्न केले नसते. तशी सगळी पंचाईतच होती.

**साधक ख :** पण श्रीमहाराज अकल्याण कसं करतील, ही त्यांची भावना होती. तसं अजून जमत नाही.

## |२१२| (२८ जून १९९१)

पू. बाबांच्या उजव्या गुडघ्याला इलॅस्टिक बँडेज बांधलेले आहे. आज डॉ. देशपांडे यांनी त्या गुडघ्यातून सुमारे 50 c.c. द्रव काढले आणि गुडघ्यात स्ट्रेप्टोमायसीन इंजेक्ट केले असे पू. बाबांनी सांगितले. नंतर त्यांनी ज्ञानेश्वरीच्या चवथ्या अध्यायातील गीतेचा २४ वा श्लोक आणि त्यावरील ज्ञानेश्वर महाराजांच्या ओव्या वाचून दाखवल्या:

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥ ४.२४॥

हें हवन मी होता। कां इये यज्ञीं हा भोक्ता। ऐसिया बुद्धीसि नाहीं भिन्नता। म्हणऊनियां॥ ११९॥ जे इष्टयज्ञ यजावे। तें हविर्मंत्रादि आघवें। तो देखतसे अविनाशभावें। आत्मबुद्धि॥ १२०॥ म्हणऊनि ब्रह्म तेंचि कर्म। ऐसें बोधा

आलें जया सम। तया कर्तव्य तें नैष्कर्म्य। धनुर्धरा॥ १२१॥ आतां अविवेक कुमारत्वा मुकले। जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहालें। मग उपासन जिहीं आणिलें। योगाग्नीचें॥ १२२॥ जे यजनशील अहर्निशी। जिहीं अविद्या हविली मनेंसीं। गुरुवाक्य हुताशीं। हवन केलें॥ १२३॥

ओव्या वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले, ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की 'अविवेक कुमारत्वा मुकलें'. अविवेक हा बालपणासारखा आहे. तो गेल्याखेरीज आणि विवेकाचे तारुण्य आल्याखेरीज विवाह नाही. म्हणून प्रथम विवेक आवश्यक आहे. विवेकाशिवाय वैराग्य हे हेंकाडपिसें वैराग्य असे समर्थांनी म्हटले आहे. तेव्हा प्रथम विवेक निर्माण झाला, बालपण संपले आणि तारुण्य आले की मग विरक्तीशी लग्न. विरक्ती स्त्रीलिंगी आहे म्हणून विवेकाचे तिच्याशी लग्न! म्हणजेच परमार्थासाठी विवेक वैराग्ययुक्त झाले पाहिजे. येथे पाणिग्रहण शब्द वापरला आहे. श्रीमहाराज म्हणत की याला विशेष अर्थ आहे. विवाहात सप्तपदी करताना वर वधूचा हात धरतो. 'धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि' इत्यादी शपथ घेतो. आता मी तुझा आहे, तुझ्या ताब्यात आहे म्हणतो. तसा विवेकी साधक विरक्तीच्या ताब्यात जातो. कारण 'तरी विरक्तीवांचूनि केही। ज्ञानासि तगणें नाहीं।' विरक्तीखेरीज परमार्थ अशक्य आहे. यज्ञ, पूजा इत्यादी सपत्निक करतात. म्हणून साधकाने विरक्तीशी लग्न केल्यानंतर योगाग्नीची पूजा सुरू केली. ह्या पूजेची वेळ कोणती? अहर्निशी - सर्वकाळ ह्या योगाग्नीत मनासह अविद्येचे हवन केले. नुसती अविद्याच नाही, तर मनही नाहीसे झाले. मनाचे उन्मन झाले. हे हवन येथे गुरुआज्ञेच्या अग्नीमधें केले आहे. गुरुआज्ञेचे, गुरुवाक्याचे महत्त्व इतके मोठे आहे. त्यांनी सांगितले की ते शिरोधार्य! तेथे संशय नाही. ब्रह्मानंद महाराज म्हणत की एक गुरुआज्ञा पाळण्यापलीकडे मी दुसरे साधन केले नाही.

**साधक क** : ते म्हणत, श्रीमहाराज मला बुवा म्हणाले आणि मी बुवा झालो!

**पू. बाबा** : आज या ओव्या वाचल्यावर मी जो अर्थ लावला तो तुम्हाला सांगितला. तथापि बाराव्या अध्यायातील 'वन्हीची ज्वाळा जैसी। वायां जाय आकाशीं। क्रिया जिरों दे तैसी। शून्यामाजीं॥ १३३॥ या ओवीचा पुरता अर्थ लक्षात येत नाही. त्यांना नेमके काय म्हणायचे आहे?

**साधक प** : मला वाटते, येथे अभ्यासाच्या पायऱ्या सांगितलेल्या आहेत. प्रथम माझ्या स्वरूपात मन, बुद्धी इत्यादी ठेव म्हणजे तू मीच होशील म्हणून

सांगितले आहे. ('म्हणोनि माझिया स्वरूपीं। मन बुद्धि इयें निक्षेपी। येतुलेनि सर्वव्यापी। मीचि होसी॥१०२॥' हे शक्य नसेल तर शक्य तितका वेळ भोगातून मन काढून माझे स्मरण कर. सुरुवातीला असे स्मरण निमिषभर झाले तरी चालेल, कारण अभ्यासानेच भोगातून मन निघत निघत शेवटी तू मीच होशील. तथापि हा अभ्यासही करणे तुला शक्य झाले नाही तर तू जे काही कर्म करशील त्या कर्मातील कर्तेपण सोडून दे असे सांगितले आहे. आणि हेही शक्य नसेल तर कर्म तूच कर पण त्याच्या फलाचा त्याग कर म्हणून सांगितले आहे. कर्मफलाच्या बाबतीत असा निष्काम झालास की ते कर्म कसे होईल ते त्यानंतर सांगितले आहे. "वन्हीची ज्वाळा जैसी। वायां जाय आकाशीं। क्रिया जिरों दे तैसी। शून्यामाजीं॥१३३॥ अर्जुना हा फलत्यागु। आवडे कीर असलगु। परि योगामाजीं योगु। धुरेचा हा॥१३४॥ येणें फलत्यागें सांडें। तें तें कर्म न विरूढे। एकचि वेळे वेळुझाडें। वांझें जैसीं॥१३५॥ तैसें येणेंचि शरीरें। शरीरा येणें सरे। किंबहुना येरझारे। चिरा पडे॥१३६॥" म्हणून मला वाटते की तुम्ही सांगितलेली एकच ओवी न घेता हा संपूर्ण क्रम लक्षात घ्यायला पाहिजे. नाथभागवतात तिसऱ्या अध्यायात म्हटले आहे की कर्माचे स्वरूपच असे आहे की कोंबडीने पिले पंखांखाली घ्यावी तशी प्रलयाच्या काली माया कर्मबीजे आपल्या पंखांखाली घेते. ती नाहीशी झाली असे वाटते इतकेच.

**पू. बाबा :** हे स्पष्टीकरण बरोबर वाटते. कर्म करून ते मला अर्पण कर असे म्हटले आहे. कर्म असे अर्पण करता येते का?

**साधक प :** अर्पण करणे म्हणजे देणे आहे. 'मी' देतो असे वाटते तोपर्यंत खरे अर्पण होणार नाही.

**साधक ग :** अर्पण करणे म्हणजे केवळ देणे नाही. आपण भिकाऱ्याला भीक घालतो ते काही अर्पण म्हणता येणार नाही. अर्पण करतांना ज्याला अर्पण करायचे तो मोठा आहे, शक्तिमान आहे, संपन्न आहे, त्याला मी देऊन काय देणार? पण मला राहवत नाही म्हणून मी देतो हा कृतज्ञतेचा भाव आहे.

**पू. बाबा :** होय, दृश्यातले देतांना हे ठीक आहे. पण मन, बुद्धी इत्यादी कशी अर्पण करायची?

**साधक ग :** अर्पण करताना आपण 'इदं न मम' असे म्हणतो. हे माझे नाही; तुझेच आहे.

**पू. बाबा :** एकदा दिले की तो काय करतो इकडे लक्ष जाता कामा नये.

**साधक ब** : ग म्हणतात ते बरोबर आहे. मी त्याला काय देणार! माझी शक्ती किती, बुद्धी ती काय, पण तरीदेखील देण्याची मनाची तयारी पाहिजे. आम्ही दरिद्री आहोत. Inner poverty आहे.

**साधक क** : मला वाटते, अर्पण करतांना ज्याला अर्पण करायचे त्याच्याबद्दल प्रेमाची भावना पाहिजे.

**साधक ब** : होय; प्रेम असले तर माझे ते तुझे असा भाव आपोआप येईल.

**साधक ग** : अर्पण केले की त्यासंबंधीचा विचार थांबला पाहिजे. भाऊसाहेबांनी एकदा संसार श्रीमहाराजांना दिला आणि त्याबद्दल पुन्हा विचार केला नाही

**पू. बाबा** : अर्पण करण्यात प्रेमाबरोबर शरणागतीचाही भाव आहे. शरणागतीत मी नाहीसा होतो. मी बरोबर ममत्वही गेले पाहिजे त्याप्रमाणे अर्पण करतांना कल्पना गेली पाहिजे. यातून काही मिळवायचे आहे असे वाटता कामा नये. तसेच श्रीगुरूंना अर्पण जातांना त्यांच्याविषयी मनात कोणताही संशय असता कामा नये. तिसरी गोष्ट म्हणजे अर्पण करतांना कोणताही संकल्प नसावा. आता मी त्यांचा झालो आहे, तेव्हा अमुक व्हावे किंवा अमुक होऊ नये अशा तऱ्हेची कोणतीही इच्छा असतां कामा नये.

**साधक ग** : संकल्प म्हणजे नेमके काय?

**पू. बाबा** : सम्यक् कल्प तो संकल्प. कल्पना आणि संकल्प यात फरक आहे. भविष्यात काय घडेल याबद्दल तुम्ही अनेक प्रकारच्या कल्पना करू शकता पण त्यापैकी अमके घडावे अथवा घडू नये असा संकल्प असतो. संकल्पात निश्चय असतो. अर्थात संकल्पानुसार घडेलच असे नाही.

## ।२१३। (५ जुलै १९९१)

पू. बाबांच्या प्रकृतीत बरीच सुधारणा दिसते आहे. आम्ही गेलो तेव्हा डॉ. देशपांडे पू. बाबांशी बोलत बसले होते. आम्ही पू. बाबांच्या तब्येतीची चौकशी केली. पू. बाबा म्हणाले, डॉ. सोनारांनी एक दिवसाआड $B_{12}$ ची इंजेक्शन्स घ्यायला सांगितले आहे. त्यामुळे शरीरातील रक्त जलद वाढेल असे त्यांचे म्हणणे आहे. पण ती violent treatment घेण्यापेक्षा थोडी सावकाश सुधारणा झाली तरी हरकत नाही म्हणून डॉ. फणसळकरांनी दिलेले होमिओपॅथीचे टॉनिक घेतो आहे, तेवढे पुरेसे आहे. माझ्या प्रकृतीला

ॲलोपथीची औषधे सहन होत नाहीत. ह्या आजारात आत्तापर्यंत जी अँटीबायोटिक्स घेतली त्याचा परिणाम असा झाला की नाम एकसारखे टिकत नाही, मधून मधून सुटते. म्हणजे ह्या औषधांचा मनावर काहीतरी परिणाम होतो. जशी तंद्री लागायला पाहिजे तशी लागत नाही. आणखी एक तुम्हाला सांगतो. श्रीमहाराजांच्या बोधवचनात आहे की माणूस जो जगतो तो त्याला जगवणाऱ्या अतींद्रिय शक्ती असतात म्हणून. जोपर्यंत त्या शक्तींची साथ असते तोपर्यंत तो अपघातातूनही बचावतो. या शक्तींची मदत असते तोपर्यंत तो आजारी पडला आणि औषधपाणी केले नाही तरी जमेल. औषध देतांना त्या शक्तींना मदत करायचा प्रयत्न असतो. ह्या आजारात आता बरे वाटू लागले आहे याचा अर्थ आणखी काही दिवस ठेवावे अशी श्रीमहाराजांची इच्छा आहे असे दिसते.

नंतर पू. बाबांनी दिलीपकुमार रॉय यांच्या श्रीकृष्णप्रेम यांच्या चरित्रातील कृष्णप्रेमनी त्यांना लिहिलेल्या एका पत्रातील काही भाग वाचून दाखवला. पृष्ठ १५७ वर कृष्णप्रेम म्हणतात :

Some people would probably say that I am materialising the spiritual conceptions. But I do not agree. The abstract is NOT more spiritual then the concrete. That is an illusion due to our false view of the concrete. Krishna is no pale abstraction or symbol but, whether in Goloka or in this world, the concrete of the concrete."

(कदाचित काही लोक म्हणतील की अध्यात्मातील संकल्पना मी भौतिक पातळीवर आणतो आहे. पण मला हे मान्य नाही. अमूर्त हे मूर्तापेक्षा जास्त आध्यात्मिक किंवा दिव्य असते असे नाही. मूर्तासंबंधीच्या चुकीच्या समजुतीमुळे निर्माण होणारा तो भ्रम आहे. कृष्ण ही अमूर्त कल्पना किंवा चिन्ह नसून गोलोकात आणि या जगातही तो मूर्तामधील मूर्त आहे). पुन्हा पृष्ठ १६३ वर ते म्हणतात :

"I am myself utterly certain that Krishna can be experienced in perfect concreteness. As I think I once said before, He is the concrete of concretes and no more misty abstraction or imagined form."

(माझी पूर्ण खात्री आहे की दृश्यामध्ये कृष्णाचा अनुभव घेणे शक्य आहे. मला वाटते, मी पूर्वी सांगितले होते त्याप्रमाणे कृष्ण ही अस्पष्ट अमूर्त कल्पना नसून तो मूर्तामधील मूर्त आहे.)

यानंतर पू. बाबांनी श्रीमहाराजांच्या बोधवचनातील एक वचन (क्र. ३४८) वाचून दाखवले. श्रीमहाराज म्हणतात, ''सर्व जगाशी माझेपण गेले पाहिजे. त्याकरतां स्मरण पाहिजे. 'मी तुझा, मी तुझा' असे सारखे अनुसंधान पाहिजे. नामस्मरणाचा तोच संपूर्ण अर्थ आहे.''

पू. बाबांनी विचारले की कृष्णप्रेमना श्रीकृष्ण प्रत्यक्ष दिसला तसे आपल्याला श्रीमहाराज वाटतात का? नामस्मरण करतांना 'मी तुझा' हा भाव असतो का? मी तुझा म्हणताना मी, तू आणि या दोहोंतला संबंध या तीन गोष्टी स्पष्ट व्हायला पाहिजेत. त्यातला मी सध्या सोडून देऊ कारण मी माझ्या देहापासून वेगळा झालेला नाही. पण श्रीमहाराजांसंबंधी आपली काय कल्पना आहे? त्यांचा आणि आपला कोणता संबंध आहे? काही महत्त्वाचे संबंध म्हणजे मित्र-मित्र, स्वामी-दास, पिता किंवा माता आणि पुत्र, पुत्री, गुरु-शिष्य, पति-पत्नी इत्यादि. यांपैकी महाराज आपले मित्र नाहीत हे उघडच आहे. स्वामी आणि दास हा संबंध फार अवघड आहे कारण दास म्हणजे संपूर्ण आज्ञापालन. ब्रह्मानंदमहाराज दास होते. एका आज्ञापालनापलीकडे त्यांनी दुसरे साधन केले नाही. तेही आपल्याला शक्य नाही. तेव्हां आज आपला श्रीमहाराजांशी संबंध आहे का? आणि असला तर काय संबंध आहे?

**साधक प** : गुरु आणि शिष्य. विशेषत: न ऐकणारा वांड शिष्य म्हणता येईल.

**पू. बाबा** : **Truant** - उनाड शिष्य म्हणा!

**साधक ज** : आई आणि मूल हा संबंध जास्त जवळचा आहे असे मला वाटते. आई मुलाला जन्म देते. जन्मापूर्वी ते तिच्या शरीराचा भाग असते. जन्मल्यानंतर ते सर्वस्वी आईवर अवलंबून असते. जगात काहीही होवो, ते तिच्या पदराखाली सुरक्षित असते.

**पू. बाबा** : काही लोक आईशी **attached** (चिकटलेले) असतात. मोठे झाल्यानंतरही त्यांचे आईवर उत्कट प्रेम असते. पण बहुसंख्य लोक आईवर इतके प्रेम करतात का? आई म्हणजे सर्वस्व हे लहानपणी ठीक आहे. पण पुढे तो भाव राहतो का?

**साधक ज** : सर्वांचाच तो भाव टिकेल असे नाही.

**साधक ब** : श्रीमहाराज आई आणि बाप दोन्ही आहेत. बाप धाक लावतो आणि आई लाड करते. वेळ पडली तर श्रीमहाराज चपराकही देतात.

**पू. बाबा** : असं वाटतं का नाम घेतांना? किंवा एरवी त्यांची आठवण होते तेव्हां ते माझे मायबाप आहेत असं वाटतं का?

**साधक ग** : 'दळितां कांडिता' या अभंगात जनाबाईने 'मायबाप बंधु बहिणी। तूं बा सखा चक्रपाणि॥' असे म्हटले आहे.

**पू. बाबा** : पण आपला संबंध कोणता?

**साधक प** : तसा एकच संबंध म्हणून सांगता यायचे नाही. तथापि गुरु-शिष्य हा प्रमुख संबंध म्हणता येईल.

**पू. बाबा** : तर मग ठरले की त्यांचा आपला गुरु-शिष्य संबंध आहे. ते श्रेष्ठ आणि पूज्य आहेत. पण मी शिष्य म्हणवून घ्यायला लायक आहे का?

**साधक क** : ते कठीणच आहे.

**पू. बाबा** : समर्थांनी सत्‌शिष्याच्या लक्षणांवर एक समास लिहिला आहे.

**साधक ग** : मी शिष्य आहे. पण मला वाटते की त्यात माझ्या तयारीपेक्षा देखील गुरूबद्दल वाटणारी कृतज्ञता जास्त महत्त्वाची आहे. कृतज्ञता भाव जर वाढवता आला तर साधन चांगले होईल.

**साधक प** : अमका भाव मी वाढवेन म्हणून वाढणारच नाही. त्यांनी वाढवला तरच तो वाढेल.

**साधक ब** : होय; पण शिस्त म्हणून तरी आपल्या बाजूने प्रयत्न पाहिजेत. मायबाप म्हणतांना बापाप्रमाणे बाहेरून चापटी मारतांना त्यांचाच आतून आईच्या हातासारखा आधार असतो.

**पू. बाबा** : कबीराचा दोहा आहे. त्यांनी गुरूला कुंभार आणि शिष्याला ते घडवीत असलेला कुंभ म्हटले आहे.

गुरु कुम्हार शिष्य कुंभ है घडि घडि काढै खोट।
अंदर हाथ सहार दै बाहर मारै चोट॥

शिष्याचे दोष नाहीसे करण्यासाठी बाहेरून थप्पड मारलेली दिसली तरी आतून त्यांच्याच हाताचा आधार असतो. साधक ग म्हणतात तसा कृतज्ञता भाव वाढविणे शक्य आहे कारण आपल्याला कृतज्ञता माहीत आहे. आपल्याला तिची सवय आहे.

**साधक प** : चांगला शिष्य होणे सोपे नाही.

**साधक ग** : त्यांनी अनुग्रह दिला आहे म्हणजे त्यांनी मला आपला म्हटले आहे आणि ते दयासिंधु आहेत!

**पू. बाबा** : श्रीमहाराज दयासिंधु आहेतच; पण आपल्या बाजूनेही आपण त्यांना योग्य असे वागायला नको का? मला वाटते, ते सर्वव्यापी आहेत आणि मी काय करतो ते त्यांना समजते असे खरे खरे वाटू लागले तर आपण त्यांना आवडत नाही ते करणार नाही.

**साधक ज** : इतकेच नव्हे तर माझ्या मनात जे विचार येतात ते माझ्या आधी त्यांना कळतात असे वाटले पाहिजे.

**साधक ब** : इतके जरी जमले नाही तरी विचार आल्यावर तो त्यांनीच आणला असे वाटून त्यांची आठवण झाली तरी वावगे वागणे, बोलणे होणार नाही.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणत, ज्या तोंडाने भगवंताचे नांव घ्यायचे त्या तोंडाने अपशब्द उच्चारणे वाईट आहे. म्हणून गुरूंना आवडत नाही ते टाळणे आणि त्यांना आवडते ते करणे हेच साधन आहे.

**साधक क** : सर्व काळ अनुसंधान राहणे महत्त्वाचे आहे.

**पू. बाबा** : 'मी तुझा' म्हणण्यात किती अर्थ आहे! पण हे वाटण्यासाठी आज मी काय केले पाहिजे याच्यावर आणखी विचार पुढच्या शुक्रवारी करू.

## |२१४| (१२ जुलै १९१९)

पू. बाबांच्या प्रकृतीत बरीच सुधारणा आहे. मी 'तुझा' आहे म्हणजे काय यावर विचार केला का म्हणून त्यांनी विचारले.

**साधक ब** : मला वाटते 'तुझा' म्हणजे काय हे समजायलादेखील प्रथम साधनचतुष्टय संपन्न व्हायला पाहिजे. चित्तशुद्धी झाल्याखेरीज त्याचा होता येणार नाही. मी इतका मळलेला आहे की आज मी तुझा म्हणून त्याच्याजवळ जाऊच शकत नाही. मला धुवून पुसून स्वच्छ करायचे काम मला करता येत नाही. मला वाटते, साधनानेच हे होईल. आज तरी मला याखेरीज दुसरा मार्ग दिसत नाही.

**साधक ग** : मी 'तुझा' म्हणायला आधी 'माझा' जायला पाहिजे. जोपर्यंत मी आणि माझा आहे तोपर्यंत तू आणि तुझा हे केवळ शब्द ठरतात. वास्तविक तो अंतर्यामी आहेच, पण माझ्या अज्ञानामुळे मी ते जाणू शकत नाही. साधन करताना शेवटी अशी अवस्था येईल की, मला जमत नाही असे

खरे वाटू लागेल आणि तिथे शरणागतीचा उदय होईल. शरणागती आल्याखेरीज 'तुझा' म्हणजे काय ते समजणार नाही.

**पू. बाबा** : पण शरणागती यायची म्हणजे काय व्हायचे?

**साधक ग** : मीपणा, अहंकार नाहीसा झाल्याखेरीज शरणागती येणार नाही.

**पू. बाबा** : मी यावर खूप विचार केला. मला वाटते, 'मी कर्ता' ही आज जी आपली धारणा आहे ती गेली पाहिजे. जोपर्यंत ती जात नाही तोपर्यंत 'राम कर्ता' असे वाटणार नाही. खरोखर आपण किती दुबळे आहोत याचा पदोपदी प्रत्यय येतो; तरीदेखील मी कर्ता हा भाव जात नाही.

**साधक ग** : आजपर्यंतचे आमचे शिक्षण आणि अनुभव असा आहे की हाती घेऊ त्या प्रत्येक कार्यात यश मिळेलच असे नाही; पण मी केले नाही तर काहीच होत नाही. उदाहरणार्थ, मी जर परीक्षेलाच बसलो नाही तर पास कसा होईन?

**पू. बाबा** : तसे नव्हे. प्रयत्न अवश्य करावा. पण मी केले की ते होईलच किंवा झालेच पाहिजे असे वाटू नये. त्याची इच्छा असेल तसे घडेल असे आतून वाटले पाहिजे. समजा, तुमच्या मुलीचे लग्न व्हायचे आहे तर त्याकरता खटपट करावी पण तिचे लग्न झालेच पाहिजे हा आग्रह कशाला? आपल्या समाजात नसले तरी परदेशात, विशेषत: युरोपात लग्न न झालेल्या कितीतरी बायका आढळतात आणि समाज त्यांना कमी लेखत नाही. तथापि मुख्य मुद्दा असा की, आपला संकल्प गेला पाहिजे. संकल्प वासनेतून येतो. अमूक व्हावे, अमूक होऊ नये या वासना आपल्याला त्रास देतात. वास्तविक वासना ही अपूर्णतेची जाणीव आहे. आपण भगवंतामधे पूर्णता न पाहता ती दृश्य वस्तूत शोधतो ही चूक आहे आणि या सर्वाचे मूळ देहबुद्धी आहे. देहबुद्धी गेल्याखेरीज मी 'तुझा' असे वाटणार नाही. तुझा म्हणतांना तो माझ्यापेक्षा श्रेष्ठ आहे, नव्हे, सर्वशक्तिमान, सर्वव्यापी आहे अशी जाणीव झाली पाहिजे.

**साधक ब** : साधक ग म्हणतात ते खरे आहे. आजपर्यंत आम्ही केले आहे आणि बरेचदा त्यामध्ये यशही मिळालेले आहे.

**पू. बाबा** : वास्तविक आपले करणे किती लटके आहे. कितीतरी गोष्टींचा कार्यकारणभाव आपल्याला माहीत नाही. मी कसा जगतो हे आपल्याला कुठे कळते? आज इतकी वर्षे माझ्या हृदयाचे ठोके चालू आहेत ते का चालले आहे हे मला कुठे समजते? वास्तविक राम कर्ता म्हणतांना ती विश्वव्यापी शक्ती माझ्या जीवनात कार्य करते आहे, माझे अस्तित्व तिच्यावर अवलंबून

आहे हे आपल्या लक्षात येत नाही. ज्या प्राणशक्तीमुळे आपण जगतो त्या प्राणशक्तीची आपल्याला कल्पना नाही. आपल्याला फक्त वजन उचलण्यासारख्या स्थूल शक्तीची म्हणजे पृथ्वी तत्त्वाशी संबंधित शक्तीची जाणीव आहे. वायु, तेज, जल, आकाश या तत्त्वांच्या शक्तीची आपल्याला कोठे कल्पना आहे? माझ्या आजारात अँटीबायोटिक्सचा वापर केला आणि मी बरा झालो, म्हणजे प्राणशक्तीत काय घडले ते कोठे मला कळते? पॅरेलिसिस झाला की एका हाताने दुसरा हात उचलावा लागतो. लुळ्या पडलेल्या हातातील शक्ती कोठे जाते?

**साधक ड** : पचनशक्ती, प्राणशक्ती इत्यादी शक्ती आपल्याला समजत नसल्या तरी त्या आहेत याची आपल्याला जाणीव आहेच ना!

**साधक प** : मला वाटते, तुम्ही म्हणता ते सगळे माहीत असायची आवश्यकता नाही. हृदयाचे ठोके वगैरेच्या बाबतीत आता शास्त्रज्ञांनी संशोधन केलेले आहे. आज आपल्या देशात देखील कितीतरी लोकांना पेसमेकर बसवलेले आहेत आणि त्यामुळे त्यांची हृदये व्यवस्थित कार्य करत आहेत. आपण अन्न खातो त्याचे पचन कसे होते ते समजले आहे. आपल्या सिस्टिममध्ये इलेक्ट्रिकल डिसचार्जेस कसे होतात ते कळले आहे. पण हे सगळे कळूनही 'आत जाणे' म्हणतात ते जमत नाही.

**पू. बाबा** : आत नेणाऱ्या त्या शक्तीची जाणीव झाली, राम कर्ता हे पटले तर भाऊसाहेबांसारखे वागणे होईल. श्रीमहाराज पू. तात्यासाहेबांच्या मुखाने बोलत याचे त्यांना काहीच आश्चर्य वाटत नसे. ते म्हणत, अहो! त्यांना (श्रीमहाराजांना) काय अशक्य आहे? त्यांना वाटले तर ते भिंतीतून देखील बोलतील! तसेच 'मला अजून कां ठेवलंय' म्हणाले; म्हणजे मी जगतो असे नसून ती शक्ती मला जगवते अशी त्यांची पुरेपूर खात्री होती. हे खरे शक्तीची जाणीव होणे. खरोखर, नामाच्या शक्तीची आपल्याला कोठे कल्पना आहे? नाम पवित्र आहे, शक्तिस्वरूप आहे, तेच साक्षात् भगवंत आहे असे नाम घेतांना वाटते का?

**साधक ब** : चित्तशुद्धी होईपर्यंत ते कळणे अवघडच आहे. प्रथम नामानेच चित्तशुद्धी होईल आणि मग त्याच्या शक्तीचा प्रत्यय येईल.

**साधक ग** : नाम सूक्ष्म आहे आणि त्याची शक्तीही सूक्ष्म आहे. तिची जाणीव व्हायला मनाला तेवढी सूक्ष्मता आली पाहिजे.

**पू. बाबा :** मार्कस ऑरेलिसने म्हटल्याप्रमाणे You must take a dip into it. नामात बुडी मारली पाहिजे.

**साधक ग :** आत जायला आपली कल्पना आड येते. कल्पना थांबली पाहिजे. स्मृतीपेक्षाही कल्पना जास्त त्रास देतात.

**पू. बाबा :** त्या शक्तीची जाणीव झाली पाहिजे. त्यासाठी एक लक्षात ठेवावे की आपण नादाला लुब्ध आहोत. नामाच्या नादात लय साधावा.

**साधक प :** त्या शक्तीची जाणीव आणि श्रद्धा एकच आहेत. आपली श्रद्धा क्षीण आहे.

**पू. बाबा :** म्हणजेच त्या शक्तीची आपली जाणीव क्षीण आहे. 'मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्। यत्कृपा तमहं वन्दे परमानंदमाधवम्॥' हे परमात्म्याच्या शक्तीचं वर्णन आहे. तुझा आहे म्हणण्यापेक्षा मी शून्य आहे, मला जी किंमत आहे ती तुझ्यामुळे आहे असे वाटले पाहिजे. गुरु-शिष्य संबंधापेक्षाही पतिव्रतेसारखा भाव पाहिजे. गुरूवर निष्ठा असणे एका परीने सोपे आहे; पण पतीवर निष्ठा असणे अवघड आहे. गुरु आपल्यापेक्षा श्रेष्ठ आहे, शक्तिमान आहे हे शिष्याला दिसत असते, कळत असते; पण नवरा आपल्यासारखाच माणूस असतो, इतकेच नव्हे तर कित्येकदा अतिसामान्य किंवा व्यसनी, विषयी असतो आणि तरीदेखील पतिव्रतेची त्याच्यावर, देवावर असावी तशी निष्ठा असते! हे फार कठीण आहे. म्हणूनच निष्ठेची पराकाष्ठा सांगताना तुकाराम महाराज म्हणतात, "पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण। आम्हां नारायण तैशापरी॥"

**साधक प :** शक्तीची कल्पना येणे अवघड आहे.

**पू. बाबा :** विश्व चालवणाऱ्या आणि विश्वात राहणाऱ्या माझे जीवन चालवणाऱ्या शक्तीची जाणीव झाली पाहिजे. या शक्तीची जाणीव आणि श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव एकच आहेत.

## |२१५| (१९ जुलै १९९१)

पू. बाबांच्या प्रकृतीत बरीच सुधारणा आहे. आज गुरुपौर्णिमेच्या उत्सवानिमित्त काकड आरती सुरू झाली. नामसप्ताहही सुरू झाला. पुढच्या शुक्रवारी दि. २६ रोजी गुरुपौर्णिमा आहे. आज माडीवरील नवीन बांधलेल्या हॉलमध्ये श्रीमहाराजांच्या तसबिरीची व पादुकांची स्थापना झाली. हॉल

प्रशस्त आहे. उत्सवानिमित्त सजविला आहे. नेहमीप्रमाणे काकड आरतीनंतर आज पू. बाबांचे प्रवचन झाले.

**पू. बाबा** : रमण महर्षी एकदा संभाषणात म्हणाले होते की या देहाच्या मृत्यूनंतर तरी मी कोठे जाणार? मी तुमच्यातच आहे. कोठे जाणार नाही आणि कोठून येणार नाही. मी तुम्हाला सोडू शकत नाही. श्रीमहाराजही असेच म्हणाले होते. मी कोठे गेलो नाही आणि आलो नाही. मी देह सोडल्यावर तुम्ही मला ओळखले नाही आणि देहात असतांनाही नाही; कारण मी त्यापलीकडे आहे. (मी जेव्हां गोंदवल्यास होतो तेव्हाही मी देहात नव्हतो, मी नामातच होतो; आणि तेव्हांही जेथे नाम तेथे मी असे. मी देहात नसून नामातच होतो आणि आताही नामातच आहे.) आपण नामस्मरण करतो पण त्यांच्या या अस्तित्वाची आपल्याला कधीतरी जाणीव होते का? श्रीमहाराज आहेत असे वाटते का? ते नाहीत असेही आपल्याला वाटत नाही. ते आहेत असे आपण म्हणतो आणि होते असेही म्हणतो. मग त्यांचे हे 'असणे' काय आहे? त्याची खूण काय? त्याचा अनुभव कोणता?

**साधक ब** : काही संकट आले आणि आपल्या कल्पनेपलीकडे आपण त्यातून सहीसलामत सुटलो की आपण हे श्रीमहाराजांनी केले म्हणतो. त्यावेळी ते खरेही वाटते. आपण sincerely तसे म्हणतो; पण जसजसा काळ जाईल तसतसे ते अंधूक, कमी कमी होत जाते. तथापि मला वाटते की त्यांचे अस्तित्व स्पंदनरूप असावे. सांगता येत नाही पण ते जाणवते तो feel (भाव) आहे.

**पू. बाबा** : नुकताच डॉ. दप्तरदारांच्या सौभाग्यवतींना अपघात झाला. रिक्षा कलंडतांना त्या महाराज असे ओरडल्या. त्यांना लागले पण सुनेला काही झाले नाही ही श्रीमहाराजांची कृपा असे त्यांना आणि डॉक्टरनाही वाटते. पण तरीदेखील त्यांच्या अस्तित्वाची तुम्हाला तशी जाणीव आहे का?

**साधक** : संकटाच्या वेळी त्यांची आठवण होते. ते आपल्या मागे आहेत असे वाटते पण एरवी तो भाव राहात नाही. नामस्मरण करतांना सारखी त्यांची आठवण होते असे नाही.

**पू. बाबा** : असे कां होत असावे? गीतेत देखील भगवंतांनी म्हटले आहे की 'अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्। परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्॥९.११॥' म्हणजे मी देह धारण केला असल्याने, हे मूढ लोक माझे दिव्य स्वरूप न समजल्याने, मी सर्व सृष्टीचा ईश आहे हे न ओळखता,

मला मनुष्य समजतात. मी देहापलीकडे आहे असे श्रीमहाराज म्हणत त्याचा अर्थ आपल्याला कोठे समजतो? त्यांचा अनुग्रह झाला आहे. त्यांनी जबाबदारी घेतली आहे. ते कसे आहेत ते आपल्याला समजो अथवा न समजो. आई मुलाची एका जन्माचीच काळजी करते पण ज्याला अनुग्रह दिला त्याची काळजी सद्‌गुरु शिष्याला आत्मज्ञान होईपर्यंत जन्मजन्मांतरी वाहतात!

**साधक ग :** आपण देहबुद्धीत असल्यामुळे देहबुद्धीच्या पलीकडे असणारे भगवंताचे किंवा सद्गुरूंचे ते देहातीत सूक्ष्मरूप आपल्याला समजत नाही. जसजशी देहबुद्धी कमी होऊ लागेल तसतशी त्यांच्या त्या देहापलीकडच्या अस्तित्वाची जाणीव होऊ लागेल. तोपर्यंत आपण दृश्यात आहे तेच खरे मानणार.

**पू. बाबा :** तुमचे हे म्हणणे मला पटले; पण आपण आपल्या स्वत:च्या बाबतीत देखील आपण देहापलीकडे काहीतरी आहोत असे आत कुठेतरी समजत असतोच. उदाहरणार्थ, एखादा माणूस मेला तर त्याने देह ठेवला असे आपण म्हणतो. म्हणजे देह तेथेच असतो पण ज्याने तो धारण केला होता तो आता त्या देहात राहात नसून तरीही कोठे तरी आहे असे मानत असतो. हात, पाय इत्यादी शरीराचेच अवयव आहेत पण 'माझा' हात दुखतो म्हणतो. म्हणजे देहाहून मी कोणीतरी वेगळा आहे हे बीज आपल्या जाणिवेत कोठेतरी आहे, पण ते फार खोलवर आहे. त्याची वाढ कशी करायची?

**साधक ग :** मला वाटते, सर्व गोष्टी करतांना त्यांना सांगून करायच्या असा अभ्यास केला तर हे होऊ शकेल. सुरुवातीला ते थोडेसे कवाइतीसारखे वाटेल. पण तसे करतांना हळूहळू त्यांच्या अस्तित्वाची जाणीव होऊ लागेल.

**पू. बाबा :** हा एक अभ्यास आहे. तथापि आपला दृश्यावर जितका विश्वास आहे तितका सूक्ष्मावर नाही म्हणून सत्पुरुषदेखील काही वेळा गंमत करतात. फार पूर्वी ह्यांचे (सौ. आईचे) ऑपरेशन झाले तेव्हां त्या हॉस्पिटलमधे जातांना श्रीमहाराजांनी त्यांना एक सुपारी दिली आणि ही जवळ असू दे म्हणून सांगितले. श्रीमहाराजांनी मुद्दाम दिलेली सुपारी जवळ ठेवणे ही जणू ते बरोबर असण्याची खूण होती. तसेच विट्याला एक वकील होते. ते हायकोर्ट प्लीडरच्या परीक्षेला बसणार होते. परीक्षेपूर्वी ते श्रीमहाराजांना भेटले तेव्हां श्रीमहाराजांनी अभ्यास चांगला झाला आहे ना म्हणून चौकशी केली. ते म्हणाले की विशेष नाही झाला तेव्हां श्रीमहाराजांनी (पू. तात्यासाहेब) आपली

टोपी त्यांना घालायला दिली व ती घालून परीक्षेला जा म्हणून सांगितले. परीक्षा पास झाल्यानंतर पुढे ते त्या टोपीची पूजा करीत आणि कोर्टात जाण्यापूर्वी ती एकदा डोक्यावर ठेवून काढून ठेवत असत. जणू त्या टोपीत वकिलीचे ज्ञान भरलेले होते!

**साधक ग** : श्रीमहाराज जर सर्वव्यापी आहेत तर सुपारीत किंवा टोपीतही ते असणारच.

**साधक ज** : आपल्याला अनुभव येतात आणि घडलेल्या घटनेत श्रीमहाराजांची कृपा आहे असे वाटू लागते; पण दुसऱ्याच क्षणी त्या घटनेचा काहीतरी व्यावहारिक उलगडा झाल्यासारखे वाटते आणि पूर्वी वाटू लागलेला त्यांच्या अस्तित्वाचा भाव नाहीसा होतो. दुसरे असे की आपण त्यांची कृपा म्हणतो तेव्हां मला अनुकूल ते झालेले असते. माझ्या इच्छेविरुद्ध घडणे हीदेखील त्यांची कृपाच आहे असे वाटले पाहिजे. मला वाटते, त्यांच्या अस्तित्वाच्या जाणिवेचा खरा अनुभव म्हणजे त्या माणसाच्या जीवनातील काळजी, चिंता कमी होते आणि एक प्रकारची शांतता येते.

**पू. बाबा** : हे लक्षण झाले. पण अस्तित्व जाणवते म्हणजे नेमके काय होते ते समजत नाही.

**साधक ब** : मला वाटते की त्यांचे अस्तित्त्व स्पंदनरूप आहे. तथापि त्यांच्या अस्तित्वाची निर्माण होणारी स्पंदने माझे मनच नाहीशी करते. माझे मन मला स्वस्थ बसू देत नाही. काहीतरी सारख्या उठाबशा काढायला लावते. काही वेळा तर मला अतिशय खिन्न (morose) वाटते. माझ्या जगण्याचा हेतू काय? का मी केवळ नोकरी करण्यासाठी जन्माला आलो, अशासारखे विचार सतावू लागतात. आज इकडे येतांना असाच खिन्न होतो. पण नवीन जागेत आजच श्रीमहाराजांची प्रतिष्ठापना झालेली पाहून तिथल्या वातावरणामुळे खिन्नता कोठच्या कोठे पळाली. मन एकदम प्रसन्न झाले. हा त्यांच्या अस्तित्वाचा पुरावाच आहे.

**पू. बाबा** : ब्रदर लॉरेन्ससारखे झाले पाहिजे. तो सर्व काळ ख्रिस्ताला बरोबर वागवीत असे. दारू खरेदी करायला जातांना त्याला त्या व्यवहारातले काही माहीत नव्हते. तथापि, तो म्हणतो की, ख्रिस्त बरोबर होता त्यामुळे सगळा व्यवहार चांगला झाला!

**साधक ग** : सर्व काळ श्रीमहाराजांना सांगून गोष्टी करू लागलो की सुरुवातीला काही प्रॉब्लेम्स येतात. आपण त्यांना सांगून घरातून बाहेर पडतो

आणि घरातल्या इतर माणसांप्रमाणे तेही घरात राहतात. मग ते घरातही आहेत आणि बाहेर मी जेथे जाईन तेथे माझ्या बरोबरही आहेत हे समजायला कठीण जाते कारण मला सर्वव्यापित्वाची कल्पनाच नाही. वास्तविक ते माझ्यासारखे एकदेशी नाहीत, सर्वव्यापी आहेत म्हणजे माझ्यामधेही आहेत.

**पू. बाबा :** म्हणूनच नाथांनी त्यांना अंतर्यामी म्हटले आहे.

**साधक ज :** ते सर्व काळ सर्व ठिकाणी आहेत. माझ्यात आहेत, माझ्या घरात आहेत, पण गोंदवल्याला जास्त आहेत. जास्त म्हणजे, तिथले वातावरण, तिथे त्यांचे दर्शन घेण्याच्या एकाच विचाराने आलेली माणसे, सर्व काळ त्यांच्यासंबंधी चालणारी चर्चा इत्यादींमुळे त्यांचे अस्तित्व तेथे सहज जाणवते.

**पू. बाबा :** आणि त्यांची खूण म्हणजे पादुका आहेत ना! आणखी एका मार्गाने त्यांच्या अस्तित्वाचा अभ्यास करता येईल. सर्व काळ ते मला पाहताहेत, माझ्यावर त्यांचे लक्ष आहे असा अभ्यास करावा. हा वेदान्ताचा मार्ग आहे.

**साधक ग :** केवळ पाहात आहेत, त्यांचे लक्ष आहे असे वाटून उपयोगी नाही. त्यात आणखी काहीतरी पाहिजे; नाहीतर त्यातून भयगंड निर्माण होण्याची शक्यता आहे.

**साधक ख :** ते हितकर्ते आहेत हाही भाव हवा.

**साधक ज :** आपण हितकर्ते म्हणतो तेव्हा आपल्याला जे व्हावेसे वाटते ते करणारे किंवा नकोसे वाटते ते टाळणारे असा अर्थ आपल्याला अभिप्रेत असतो. तथापि माझ्या अंतिम कल्याणाचे काय आहे हे त्यांना माहीत असल्यामुळे आज मला न आवडणारे घडले तरी त्यातच माझे हित आहे असे वाटले पाहिजे.

**साधक :** मी खूप विचार केला. हे मनच लबाड आहे. ते मला पदोपदी फसवते. ते नुसते खट्याळ नाही, तर rascal - बदमाष आहे. चांगल्या मनाची शक्ती वाढवून माझ्या आजच्या मनाला गप्प बसवले पाहिजे. 'जेवीं हिरेनि हिरा चिरिजे। तेवीं मनेंचि मन धरिजे।' आणि आता ते ताब्यात आले अशी कधीही खोटी समजूत करून घेऊ नये.

**साधक भ :** तुम्ही सर्वांच्या मनातले बोलून दाखविले!

**साधक ग :** मांजराला कोंडून दहा वर्षे उंदीर दिसू दिला नाही तरी त्यानंतर मोकळे सोडल्यावर उंदीर दिसला की ते झडप घालतेच; तसे हे मन आहे.

**पू. बाबा :** पुढच्या शुक्रवारी गुरुपौर्णिमा आहे. त्यानंतरच्या शुक्रवारी अस्तित्वाचा अभ्यास कसा करायचा ते सांगा.

## |२१६| (२ ऑगस्ट १९९१)

आज श्री. वेर्लेकर आले होते. पू. बाबांनी त्यांना मुद्दाम बोलावले होते हे नंतर समजले. पू. बाबांच्या प्रकृतीत बरीच सुधारणा आहे. मात्र उजव्या गुडघ्यावर अद्यापि बरीच सूज दिसते.

**पू. बाबा :** मी तुम्हाला सांगावे म्हणत होतो ते विसरण्यापूर्वी सांगतो. सुमारे चाळीस वर्षांपूर्वीची हकिगत आहे. गोंदवल्याला मी 'बॉम्बे हाऊसमधे' बसलो होतो. तेथे श्रीमहाराज (पू. तात्यासाहेब) आले आणि त्यांनी काय चालले आहे म्हणून विचारले. काही विशेष नाही म्हटल्यावर म्हणाले, मग ज्ञानेश्वरी वाचावी. बारावा अध्याय काढा म्हणाले आणि पहिल्या ओवीचा त्यांनी जो अर्थ सांगितला तसा अर्थ कोठेच सापडणार नाही. ओवी अशी आहे : "जय जय वो शुद्धे। उदारे प्रसिद्धे। अनवरत आनंदे। वर्षतिये॥ १२.१ ॥" ज्ञानेश्वर महाराज त्यांच्या गुरूंना - निवृत्तिनाथांना माउली म्हणतात. सुरुवातीलाच त्या माउलीचा ते जयजयकार करतात. जगात शुद्ध काही असेल तर ती या माउलीची कृपा आहे. त्या कृपेचा, आनंदाचा अविरत वर्षाव करणारी ही माउली उदार आहे आणि प्रसिद्ध आहे. वर्षाव शब्दच किती समर्पक आहे! उदार कोणाला म्हणायचे? आपल्याजवळ किती आहे आणि दुसऱ्याला दिल्यावर किती शिल्लक राहील याचा विचार न करता जो देतो तो उदार. ही माउली उदार आहे आणि म्हणूनच कृपेचा अखंड वर्षाव करते आहे. हा आनंद कधीही संपणारा नाही. तिला प्रसिद्ध अशासाठी म्हटले आहे की परमात्मा निर्गुणातून सगुणात येतो, सद्गुरूच्या रूपाने प्रकट होतो म्हणून तो भक्तांना माहीत होतो - प्रसिद्ध होतो. निर्गुण निराकाराला कसे जाणणार? ते सगुण साकार होऊन गुरुरूपाने प्रकटते म्हणून ते प्रसिद्ध. खरं सांगतो, चाळीस वर्षांपूर्वी त्यांनी सांगितलेला हा अर्थ आज आठवतो आहे हीदेखील त्यांचीच कृपा आहे. (ग ना) काय हो, हा आनंद कसा असेल!

**साधक ग :** जो आमच्या जवळ नाही तो हा आनंद. आज तरी आम्हाला त्याचे अभावानेच वर्णन करता येते.

**पू. बाबा :** ते काही खरं नाही! अमृतानुभवात गुरूंना नमन करतांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्या हि शांकरी।

जयत्याज्ञा नमस्तस्यै'' माझ्या गुरूंचे, निवृत्तिनाथांचे रूप धारण करणारी ही शंकरापासून आलेली साक्षात् ब्रह्मविद्या आहे. त्या विद्येला म्हणजेच माझ्या गुरूंना मी वंदन करतो. त्यांची आज्ञा मला प्रमाण आहे. गुरुआज्ञा पालनाला फार महत्त्व आहे. ब्रह्मानंद महाराजांनी खरे गुरुआज्ञा पालन केले. श्रीमहाराजांवर त्यांचे इतके प्रेम होते की कानडी भाषेत रचलेली श्रीमहाराजांची आरती त्यांनी देवनागरी लिपीत लिहिली! बेलधडीच्या राममंदिरात ती फ्रेम करून ठेवली आहे. इतकेच नव्हे तर त्यांची कानडी भाषेत पण देवनागरी लिपीत लिहिलेली काही पत्रे श्री. बाबूराव अंतरकरांनी मला वाचायला दिली आहेत. गुरुआज्ञा पाळणे म्हणजे काय ते ब्रह्मानंद महाराजांना कोणी विचारले नाही. पण श्रीमहाराज त्यांच्या गुरूंसंबंधी - श्रीतुकामाईसंबंधी बोलतांना म्हणाले की, ते केव्हां काय करतील याचा नेम नसे. मी नेहमीच त्यांची आज्ञा पाळली. कृपा का झाली या प्रश्नाचे हे उत्तर आहे.

**साधक ग :** ज्ञानेश्वर महाराजांनी त्याच श्लोकांत गुरूंसंबंधी पुढे 'दयार्द्रयै निरन्तरम्' म्हटले आहे. शिष्याचे अज्ञान नाहीसे झालेले नसेल तेव्हां त्याच्या हातून चुका होणारच. पण त्यांच्याजवळ दया आहे.

**पू. बाबा :** शब्द पहा! दयार्द्रयै - दयेने चिंब भिजलेले, आणि तेही निरंतर. खरोखर, त्यांच्या दयेला अंत नाही. श्रीमहाराजांच्या पदात आहे, 'गौरवर्ण कांती, मूर्तिमंत शांती, दयाक्षमा शोभे चित्तीं' हे पद म्हणत तेव्हां पू. तात्यासाहेबांच्या डोळ्यातून पाणी येत असे. श्रीमहाराज म्हणत की तुम्ही मला सोडलेत तरी मी तुम्हांला सोडू शकत नाही. ही जीवांविषयीची करुणा! माझे गुरु म्हणजे मूर्तिमंत शांती आहेत. ज्ञानेश्वर महाराजही म्हणतात, 'शांतीची पैं शांती निवृत्ती दातारू'. आपल्याला शांतीची, समाधानाची कल्पनाच नाही. आपण कायमच अशांत असतो. नामस्मरणानेच शांती येऊ शकते. (श्री. वेर्लेकरांना) नामस्मरण करतांना देह सुखावला तो तुमचा अनुभव सांगा ना! ही सगळी आपलीच माणसं आहेत, तेव्हा संकोच करू नका. (श्री. वेर्लेकर तरीही गप्पच बसले म्हणून पू. बाबा पुढे म्हणाले) तुम्हाला काही मोठेपणा द्यायचा म्हणून मी तुम्हाला सांगायला सांगत नाही आणि तुम्ही तुमचे अनुभव सांगितलेत तरी हे कोणी तुमच्या पाया पडणार नाहीत ही मी हमी देतो. मग झालं ना?

**श्री. वेर्लेकर :** तसा म्हणजे मला सांगण्याचा सराव नाही. जवळ विद्या नाही, चांगली भाषा नाही, तरी पण आठवलं ते सांगतो. श्रीमहाराजांबद्दल

माझी वात्सल्याची भावना आहे. ते माझी आई आहेत - मायबाप आहेत आणि मी त्यांचं मूल आहे असं मला वाटतं. (हे सांगतांना ते गंहिवरले होते) मला नीट शब्दांनी सांगता येत नाही; पण एकदा गोंदवल्याला गेलो होतो. धूळभेट घेऊन पुढं जायचं म्हणून मंदिराच्या दारात गेलो तर श्रीमहाराज उठून आले आणि त्यांनी मला मिठीत घेतलं! मी त्यांच्या मांडीवर बसलो. माझ्या तोंडावरून हात फिरवून ते म्हणाले, बाळ, किती उशीर केलास? मी तुझी वाट बघत होतो. काय सांगू! आई काय प्रेम करील असे ते प्रेमळ शब्द होते. मानसपूजा करतो तेव्हा त्यांचे पाय - पावले दिसतात. टॉवेलसारख्या खरखरीत वस्त्राने त्यांचे पाय पुसवत नाहीत. काही वेळा पावले पुसतांना त्यांच्या पावलांवरचे केस दुखावतीलसे वाटते.

**पू. बाबा :** तो तुमच्या हृदयात नाम स्थिरावल्याचा अनुभव सांगा ना.

**श्री. वेर्लेकर :** त्या वेळी मी ग्रँट रोडला एका जवाहिऱ्याच्या पेढीवर काम करत होतो. संध्याकाळी कामावरून सुटलो की ग्रँट रोडहून लोकलने उलट चर्चगेटला जाऊन परत मालाडला येत असे. एक दिवस नेहमीप्रमाणे ग्रँट रोडला लोकलमध्ये चढलो. सर्वात शेवटी, समोर सीटस् नसलेल्या बाकावर मधे जागा मिळाली. जवळ माळ होती, नामस्मरण चालले होते. मनातल्या मनात नामस्मरण चालू असता माझ्या पुढे, उजव्या डाव्या बाजूस, मागे, सगळीकडे त्रयोदशाक्षरी मंत्राचा माझ्याभोवती अंडाकृती पिंजरा तयार झाला आणि त्याच्या आत बसून स्वस्थपणे माझे नामस्मरण चालू राहिले! किती वेळ हा पिंजरा होता कोणास ठाऊक; पण पाच मिनिटे तरी असावा. माझ्या मनात विचार आला की या पिंजऱ्यातून बाहेर कसे पडायचे, आणि मग तो पिंजरा नाहीसा झाला.

**साधक ग :** 'वज्रपंजर नामेदम्' असं रामरक्षेत म्हटलं आहे.

**पू. बाबा :** हा सूक्ष्म देहात नाम भरल्याचा अनुभव आहे. सूक्ष्म देह स्थूल देहाबाहेर अंडाकृती असतो आणि त्यांना हा पिंजरा मागेही आहे असं दिसलं.

**साधक ग :** हे दिसणं चर्मचक्षूंचं नव्हेच.

**पू. बाबा :** बरोबर.

**साधक ब (वेर्लेकरांना) :** तुम्ही किती वर्षं गोंदवल्याला जात आहात?

**श्री. वेर्लेकर :** तसा माझा पहिल्यापासून भक्तिमार्गाकडे ओढा. माझे एक आतेभाऊ घरी रात्री, पहाटे एकटेच एकतारीवर भजन करत आणि संध्याकाळी आरामखुर्चीत बसून नामस्मरण करीत असत. एकदा ते नामस्मरण करीत बसलेले असतांना मला त्यांच्या कपाळावर ढळढळीत प्रकाश असलेली ज्योत

काही वेळ दिसली. त्यांना त्याचा पत्ताही नव्हता. ह्या मार्गातली आवड असलेली मित्रमंडळी मला घेऊन ठिकठिकाणी जात. अक्कलकोटलाही गेलो होतो. पण कोठेच माझ्या मनाला समाधान वाटत नसे. मालाडला आलो आणि येथे श्रीमहाराजांना पाहताच समाधान झालं आणि आज मी जो काही आहे तो बाबांच्यामुळं आहे. त्यांच्या कृपेमुळं हे सगळं झालं आहे. मला समाधान आहे. शांतीची शांती तसं समाधानाचं समाधान आहे. गेली दहा-बारा वर्षं गोंदवल्याला जातो आहे.

**पू. बाबा :** हृदयात नाम स्थिर होऊन देह सुखावला ते सांगा.

**श्री. वेर्लेकर :** आता सांगायला बसलोच आहे तेव्हां सगळंच सांगतो. एकदा नामस्मरण करत बसलो होतो. काही वेळाने तेरा अक्षरी मंत्र फक्त हृदयात फिरत राहिला आणि देहभान नाहीसं झालं. एखादं मिनिटच असेल, पण अवर्णनीय आनंदात होतो. देहभान पुष्कळदा नाहीसं होतं, पण पुन्हा तसा अनुभव आला नाही.

**पू. बाबा :** हृदयात नाम स्थिर झालं पाहिजे. तेवढं झालं तरी या जन्माचं सार्थक झालं असं श्रीमहाराज म्हणत; ते यांच्याबाबतीत झालं आहे. आणखी काही अनुभव सांगा.

**श्री. वेर्लेकर :** तसे तर पुष्कळ अनुभव आहेत. सांसारिक संकटात त्यांची किती मदत होते. जुनी हकिगत आहे. आम्हां सोनारांना शेठकडून दागिने घडविण्यासाठी जोखमीवर सोनं मिळतं आणि त्याचा हिशोब वर्षातून दोनदा पुरा केला जातो. बहुतेक सोनार अडी-अडचणींच्या वेळी त्यातलं सोनं वापरतात आणि हिशोबापूर्वीच त्याची पूर्तता करतात. त्यात काही विशेष म्हणजे अनीति मानली जात नाही; इतकी ही पद्धत रूढ आहे. पण मी मात्र तसं करत नसे. एकदा दोन्ही मुलांची कॉलेजची टर्म फी एकदम भरायची होती. जवळ पैसे नव्हते त्यामुळं नाइलाजानं मला त्यातलं सोनं वापरावं लागलं. त्यानंतर एक दोन दिवसांनी आमचा शेठशी कामासंबंधी काही वाद झाला आणि सकाळी त्यानं सर्वांना हिशोबाला बोलावलं. इतरांचे हिशोब चालू होते. आता आपली अब्रू जाणार हे मला दिसत होतं पण काही करणंही शक्य नव्हतं. माझी हिशोबाची पाळी आली इतक्यात शेठचा इंग्लंडहून एक मित्र आला. तो शेठला घेऊन बाहेर गेला आणि पुढचा प्रसंग टळला! त्यावेळी जरी मी गोंदवल्याला जात नव्हतो तरी कुणी तरी अज्ञात शक्ती आपलं रक्षण करते असं मला वाटत असे. तथापि गुरुकृपा झाली की माणूस निर्भय होतो.

**पू. बाबा** : निर्भयता येणे हा खरा अनुभव.

**श्री वेर्लेकर (आम्हाला उद्देशून)** : तुम्हाला सांगतो, ही सगळी बाबांची कृपा आहे. त्यांना हे आवडणार नाही; पण खरं ते सांगतो. एकदा मी गोव्याला निघालो होतो. जाण्यापूर्वी नेहमीसारखा बाबांना भेटायला आलो तेव्हा ते म्हणाले की, शांतादुर्गेला आणि मंगेशाला माझा नमस्कार सांगा. गोव्याला गेलो की न विसरता हे करायचं मी ठरवलं. त्याप्रमाणे शांतादुर्गेच्या देवळात देवीचं दर्शन घेतल्यावर नांव घेऊन बाबांचा नमस्कार देवीला सांगितला तेव्हां देवीच्या चेहेऱ्याभोवती हळदीच्या रंगाचं पिवळं धमक तेजोवलय मला दिसलं. प्रथम मला वाटलं की काहीतरी नवीन लाइटिंग देवस्थानानं केलं असावं; पण तसं काही नव्हतं. सुमारे पाच मिनिटं ते तेजोवलय दिसलं आणि मग नाहीसं झालं. त्यानंतर अनेक वेळा पुन्हा तसं दिसतं का म्हणून पाहिलं पण दिसलं नाही. मंगेशालाही बाबांचा नमस्कार सांगितल्यावर सुमारे मिनिटभर तेजोवलय दिसलं पण रंगानं ते कमी पिवळं होतं. दोन भाग सोनं आणि एक भाग चांदी मिसळली की येतो तसा तो रंग होता.

**पू. बाबा** : पंढरपूरचे एक गृहस्थ गोंदवल्यास भेटले होते तेव्हा त्यांना मी पांडुरंगाला माझा नमस्कार सांगा म्हणून सांगितले; कारण पांडुरंग हेदेखील श्रीमहाराजांचे दैवत होते. ते वारकरी होते ना! त्या गृहस्थांनीही पांडुरंगाला नमस्कार सांगितल्यावर त्यांना तेजोवलय दिसलं म्हणून सांगितलं. काय आहे कोणास ठाऊक! पण मी नमस्कार सांगतो तो मात्र श्रीमहाराजांचे स्मरण करून सांगतो हे खरे. (श्री. वेर्लेकरांना) हृदयात नाम फिरत आहे असा अनुभव नेहमी येतो का?

**श्री. वेर्लेकर** : नाही; तो एकदाच आला. पुन्हा यावा असे वाटते पण येत नाही. ते सगळे त्यांच्या (श्रीमहाराजांच्या) हातात आहे. माझा संसार मोठा होता. पाच मुली आणि सहावी पुतणी. सर्वांची लग्ने झाली; मुलांची शिक्षणे झाली. अडचणी असत, पण कायम आपल्याला कोणाचा तरी आधार आहे असे वाटत असे. आता श्रीमहाराजच सर्व काही आहेत. आता नाम विसरेन अशी भीती वाटत नाही. पुष्कळ मृत्यू पाहिले. मरणापूर्वी माणसाची कशी विकल अवस्था होते ते पाहिले आहे. पण आता वाटते की, माझा शेवटचा श्वास नामातच थांबेल. एक प्रकारची निर्भयता आली आहे. आणि ही सगळी श्रीमहाराजांची कृपा आहे.

श्री. वेर्लेकर नमस्कार करून गेल्यावर आम्ही थोडा वेळ थांबलो होतो.

**पू. बाबा** : फार चांगले गृहस्थ आहेत. माणूस सरळ आहे. आत बाहेर नाही. थोडा संकोची स्वभाव आहे.

**साधक ज** : पहा ना! त्यांनी त्यांच्यावर फर्ममध्ये आलेला प्रसंग कसा मोकळेपणाने सांगितला.

**साधक ग** : श्रीमहाराजांनी म्हटले आहे ना की मी नेहमी तुमच्या बरोबर आहे. कसा ते विचारू नका.

**पू. बाबा** : होय, खरे आहे.

## |२१७| (९ ऑगस्ट १९९१)

**पू. बाबा** : एक जुनी हकिगत आठवली. आम्ही बनारसला गेलो होतो. बरोबरची मंडळी बिर्ला मंदिर पाहायला गेली होती. श्री. आण्णासाहेब मनोहर अर्धांगाने आजारी म्हणून गेले नव्हते. त्यांची मुलगी गोदूबाई आणि पू. तात्यासाहेबही गेले नव्हते. श्रीमहाराजांनी मला विचारले, तुम्ही नाही गेलात? मी म्हणालो, मला बाहेर जाऊन पाहण्यात विशेष रस नाही. तेव्हां त्यांनी विचारले, अशा तीर्थक्षेत्रात जाऊन काय पहायचे? भगवंताचे प्रेम असलेला माणूस शोधायचा; आणि तो ओळखायला आपल्याला भगवंताचे थोडे तरी प्रेम पाहिजे. एका नामाच्या बळावर मला माणूस समोर आला की त्याची आध्यात्मिक अवस्था काय आहे ते समजते. पू. बाबा आम्हाला म्हणाले, नामाचे हे बळ समजायला आपल्याला नाम खरे वाटते का? श्रीमहाराजांचे एक वचन आहे "जेथें नाम आहे, जो माझें नामस्मरण घेतो त्याच्या मागेंपुढें मी उभा आहे; मला तेथें जाणेंच भाग आहे." आपल्या गुरूंचे अस्तित्व आपल्याला का जाणवत नाही?

**साधक प** : आपल्या ज्ञानेंद्रियांना जे जाणवते ते आपण सत्य समजतो पण तेही खरे सत्य असतेच असे नाही. उदाहरणार्थ, आपण टीव्ही पाहतो तेव्हां वास्तविक विशिष्ट क्रमाने इलेक्ट्रॉनिक डॉट्स् हललेले असतात. जो कार्यक्रम पाहतो तोही पूर्वी केव्हांतरी रेकॉर्ड झालेला असतो. त्याचे कथानक काल्पनिक असते आणि त्यातली पात्रेही खोटाच अभिनय करतात. म्हणजे सगळे खोटेच असते आणि तरी त्यात आपण रंगून जातो. माझा मुद्दा अस्तित्वाच्या खरेपणाबद्दल आहे.

**साधक ज** : एखाद्या गोष्टीचे खरेपण हे आपल्या मनावर अवलंबून असते. श्रीमहाराज म्हटले की त्यांचा देह आपल्याला आठवतो आणि तो देह आता नाही हे लक्षात असूनही ते आहेत असे मनात कोठेतरी वाटते.

**पू. बाबा** : श्रीमहाराज देहात नसले तरी ते 'आहेत' असे आपण सगळेजण म्हणतो पण तो भाव कायम राहात नाही. नामात त्यांचे अस्तित्व जाणवत नाही. मी याच्यावर खूप विचार केला. हे Practice of Presence आहे. त्यासाठी पहिली गोष्ट म्हणजे ते जिवंत पाहिजे. नाम जिवंत वाटल्याखेरीज नामात श्रीमहाराज आहेत असे वाटणार नाही.

**साधक ब** : नाम जिवंत म्हणजे सत्स्वरूपच वाटले पाहिजे. त्यापुढे बाकी सगळे तुच्छ वाटले पाहिजे. तसे होत नाही.

**पू. बाबा** : सेंट टेरेसा किंवा ब्रदर लॉरेन्स यांनी प्रयत्नपूर्वक त्याला खरेपण आणले. किंवा वेर्लेकर म्हणाले की मानसपूजा करतांना श्रीमहाराजांची पावले खरी आहेत असे त्यांना जाणवते. म्हणून मला वाटते की आपल्या जाणिवेत बदल व्हायला पाहिजे.

**साधक प** : जाणिवेपेक्षाही मनात बदल झाला पाहिजे. जाणीव जास्त व्यापक आहे. प्रथम मन भारले गेले पाहिजे.

**पू. बाबा** : आपल्याला concept चे (संकल्पनेचे) खरेपण माहीत आहे. मोठमोठे शास्त्रज्ञ एखाद्या concept ने भारले की तिचे सत्यत्व त्यांना प्रतीत होते.

**साधक ज** : concept ला धरून ठेवायची मनाला सवय आहे. नाम किंवा श्रीमहाराजांचे सत्यत्व नुसती concept ही नाही.

**साधक ग** : श्रीमहाराज म्हणाले की मी नामात आहे. याचा नेमका अर्थ कळत नाही. हा अनुभवच असला पाहिजे; कारण ते 'आहेत' म्हणजे काय तेच माहीत नाही.

**पू. बाबा** : तसे नव्हे; आपण सर्वजण नाम घेतो म्हणजे त्यांच्याबद्दल काहीतरी खरेपण वाटतेच; पण मी नाही, तूच आहेस असे वाटायला पाहिजे. त्यासाठी माझे कर्तेपण गेले पाहिजे. म्हणूनच राम कर्ता हा भाव वाढवावा असे ते सांगतात. नाम घेतांना त्यांच्या अस्तित्वाची जाणीव जोपर्यंत होत नाही तोपर्यंत नामस्मरण वरवरचे राहते. त्याचा परिणाम होत नाही असे नाही. पण समजून नाम घेतले तर ते जास्त फलदायी होईल.

## |२१८| (१६ ऑगस्ट १९९१)

**पू. बाबा** : काल Roland नांवाचा एक अमेरिकन Psychiatrist (मानसोपचारतज्ञ) भेटायला आला होता. ज्यू आहे. काही वर्षांपूर्वी तो

माझ्याकडे आला होता तेव्हां मी त्याला ओंकाराचा जप करायला सांगितले होते. तो नियमितपणे जप करतो. तो म्हणाला की त्याच्याकडे येणाऱ्या पेशंटस्‌चे मन आता त्याला सहज समजते. आता त्याला ओंकाराचा प्रकाश भरलेला दिसतो!

नाम घेतांना भगवंताच्या किंवा श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव कशी ठेवायची हा आपला विषय चालला आहे. त्या संदर्भात मला आढळलेले श्रीमहाराजांचे वचन सांगतो. "सर्व माझ्या इच्छेनें घडत आहे व तुम्हीं जें करतां तें मीच करतों असें स्मरण ठेवावें." आपण जे करतो ते महाराजच करतात असे स्मरण ठेवणे आपल्याला कां जमत नाही? मला काय वाटते ते सांगतो. आपण नामस्मरण करतो पण ते मनासारखे होते असे आपल्यालाही वाटत नाही. मनात अगदी फालतू असे भलतेच विचार चालू असतात; ते थांबवता येत नाहीत. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन्हीही अवस्था अज्ञानाच्याच आहेत. त्यांपैकी जागृतीत तरी आपले नाम अखंड टिकते का? कारण जाणिवेच्या या पातळीत ते टिकले तर नंतर इतर दोन अवस्थांत उतरून तेथेही ते टिकण्याची शक्यता! श्रीमहाराज सर्व काही करतात; अगदी रोजचे माझे जीवन त्यांच्या सत्तेने चाललेले आहे असे कां वाटत नाही?

**साधक ग** : मी मागे म्हणालो तसे काही गोष्टी मला माझ्या आवाक्यातल्या वाटतात. त्यांचा मी कर्ता असतो आणि माझ्या आवाक्याबाहेरचा प्रसंग येतो तेव्हां 'महाराज, आता तुम्ही पहा' असे मी म्हणतो. जोपर्यंत माझे कर्तेपण जात नाही तोपर्यंत त्यांचे कर्तेपण सर्व गोष्टींत आहे हे जाणवणार नाही.

**पू. बाबा** : स्वत:ला कर्ते म्हणवतो पण आपण पहातो की कितीतरी गोष्टी आपल्या हातात नाहीत. माझा जन्म माझ्या हातात नाही, मृत्यू हातात नाही आणि या दोन टोकांमधील जीवनात मात्र माझे कर्तृत्व आहे असे वाटते हे विचित्र नाही कां?

**साधक ग** : तर्काला हे पटते; म्हणजेच बुद्धीला समजते पण खरे आतून तसे वाटत नाही.

**साधक क** : मला वाटते, माझ्या अपुरेपणाची खरी जाणीव मला होत नाही. त्या जाणिवेपर्यंत नाम जायला पाहिजे. त्याशिवाय त्यांच्या अस्तित्वाची जाणीव आपल्याला होणार नाही. आपल्या आजच्या विशेष (particular) जाणिवेतून आपल्याला सामान्य (universal) जाणिवेकडे गेले पाहिजे.

**पू. बाबा :** उदाहरण घेऊन सांगा ना.

**साधक क :** उदाहरणार्थ, आपण जेव्हा एखादी कृती करतो तेव्हा ती कृती केली म्हणजे नेमके काय केले याचा कधी विचार करत नाही. जाणीव स्वत:संबंधी विचार करू लागली की ती सामान्य होईल. आज माझ्या जाणिवेच्या मी मर्यादा ठरविलेल्या आहेत.

**पू. बाबा :** तेच मगाशी साधक ग नी वेगळ्या भाषेत सांगितले.

**साधक प :** नाम हे महाराजांचेच रूप आहे हे बुद्धीला पटले तरी तेवढ्याने काम होणार नाही. ते आचरणात येण्यासाठी तशी भावना झाली पाहिजे. मला वाटते की आम्ही भावनेत कमी पडतो.

**पू. बाबा :** म्हणजे शरणागतीशिवाय आणि प्रार्थनेशिवाय अस्तित्वाची जाणीव होणार नाही म्हणा ना! वास्तविक आपण पाहतो की झोप येणे आपल्या हातात नसते तसे जागे होणेही आपल्या हातात नसते. आपण जागे होत नाही; आपल्याला जाग येते. डोळ्यांनी बघतो, ध्वनी परिसतो असा काही तरी श्लोक आहे ना.

**साधक :** डोळ्यांनीं बघतो ध्वनी परिसतो कानीं, पदीं चालतो।
जिव्हेनें रस चाखितो मधुरही वाचें आम्ही बोलतो।
हातांनी बहुसाल काम करितो, विश्रांतिही घ्यावया।
घेतो झोंप, सुखें फिरूनि उठतो, ही ईश्वराची दया॥

**पू. बाबा :** पहा! मी काही करू शकत नाही. जे काही घडते ते त्याच्या कृपेने घडते आहे असे वाटले पाहिजे. नाम घेतो ते देखील त्याच्या कृपेने.

**साधक प :** म्हणून मला वाटते की नाम घेतांना व्यत्यय आले तरी ते त्यांनी पाठविले आहेत असा भाव आला तर नामस्मरण झाले नाही तरी त्यांची आठवण राहील.

**पू. बाबा :** तुम्ही म्हणता हे बरोबर आहे. आज नाम ही देखील कृती आहे आणि ती मी करतो असे वाटते.

**साधक प :** मी करतो ही भावना किंवा अहंकार हा वासनेतून येतो, तेव्हा वासना नाहीशी झाल्याखेरीज मी कर्ता नाही हे पटणार नाही.

**साधक ब :** वासना झाल्या तरी त्या देहाला धरून आहेत; तेव्हा वासना नाहीशा व्हावयाच्या म्हणजे देहबुद्धी नाहीशी झाली पाहिजे. मला माझ्या वासनांकडे वेगळेपणाने पाहता आले पाहिजे.

**साधक ज :** मनुष्य मरतो तेव्हा त्याचा देह नाहीसा होतो, पण तरी त्याच्या वासना राहतातच. शरीर नाहीसे झाले तरी वासना नाहीशा होतील असे वाटत नाही.

**साधक ब :** मी देहाबद्दल म्हणत नाही, देहबुद्धीसंबंधी म्हणतो आहे. आज आपण देहबुद्धीच्या पातळीवर आहोत त्यामुळे देहाला सुख मिळावे म्हणून ज्या वासना आहेत त्या देहबुद्धी गेली की राहणार नाहीत.

**साधक क :** आपल्या मनानेच, वासनांचे स्वरूप काय आहे? त्या कोठून येतात हे पाहिले तर त्या कमी होतील.

**साधक प :** हे होईल, करता येईल म्हणण्यापेक्षा मी आत्ता काय करू हे महत्त्वाचे आहे. काळ जातो आहे. जे काही करायचे त्याची सुरुवात आत्ताच झाली पाहिजे.

**साधक ग :** साधनासाठी जी तळमळ पाहिजे ती आमच्याजवळ नाही.

**साधक प :** असे म्हणून चालणार नाही. एकतर तळमळ लागली पाहिजे नाहीतर दुसरा मार्ग शोधला पाहिजे. नुसते बुद्धीने काम होत नाही. भावना कृतीला शक्ती देते; ती भावना कमी पडते.

**पू. बाबा :** श्रीरामकृष्ण म्हणाले नाहीत का की लोक प्रपंचासाठी घागरभर अश्रू गाळतात पण परमेश्वरासाठी दोन अश्रूही त्यांच्या डोळ्यात येत नाहीत. साधनाची निकड निर्माण होण्यासाठी, मला वाटते, शक्तिदर्शन झाले पाहिजे. म्हणजे असं की आपल्याला जगण्याची शक्ती माहीत आहे. पाहण्याची शक्ती क्षीण झाली, ऐकण्याची शक्ती क्षीण झाली असे आपण म्हणतो पण त्या शक्तीचा साक्षात्कार होत नाही.

**साधक ग :** पण शक्ती स्वतंत्रपणे राहू शकते का? ती कशाच्या तरी, कोणाच्या तरी आधाराने राहते. तो शक्तिमान कसा जाणायचा?

**साधक क :** तो पुढचा प्रश्न झाला. आज आधी शक्तीची जाणीव झाली पाहिजे. नाम शक्तिमय आहे ते कोणत्या अर्थाने याचा विचार केला पाहिजे.

**पू. बाबा :** श्रीमहाराज चौबळांना म्हणाले होते की मी तुमच्या बरोबर आहे. कसा आहे ते विचारू नका. म्हणजे शक्तीच त्यांच्या मागे होती असे नाही कां? मला वाटतं की असं शक्तीचं एकसारखं भान पाहिजे. शक्तीची खंडित कल्पना न करतां समग्र कल्पना यावयाला पाहिजे.

**|२१९|** (२३ ऑगस्ट १९९१)

**पू. बाबा :** नुकतेच डॉ. आप्पासाहेब आठवले आले होते. त्यांनी स्वामी स्वरूपानंदांच्या काही आठवणी सांगितल्या. त्यामुळे काही जुन्या गोष्टी आठवल्या त्या आधी सांगतो. डॉ. आठवले यांचे वडील श्री. भाऊराव आठवले यांचा पुष्कळ सत्पुरुषांशी संबंध आला. घरात दोन तीन पिढ्या नृसिंह सरस्वतींकडून आलेली उपासना होती. तसेच ते भगवान रमणांच्या अंतरंगातील मंडळींपैकी एक होते. त्यांचा आणि लेफ्टनंट कर्नल बेलसरे यांचा जे. कृष्णमूर्तींशीही खूप जवळचा संबंध होता. त्या वेळी म्हणजे सन १९३३ च्या सुमारास कृष्णमूर्ती पुण्यात आले की सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीत राहात असत. एकदा ते ले. क. बेलसरे यांच्याकडे जेवायला गेले होते. ते साधेच जेवण जेवत तथापि तऱ्हेतऱ्हेची लोणची त्यांना आवडत. श्री. भाऊराव आणि ले. क. बेलसरे त्यांना म्हणाले की संत सत्पुरुषांची शिकवण आमच्या रक्तात आहे. नामस्मरणाने आत्मदर्शन होते अशी संतांची ग्वाही आहे. मग तेच करायला काय हरकत आहे? कृष्णमूर्ती म्हणाले, तो मार्ग बरोबर असेलही; पण मी त्या मार्गाने गेलो नाही. रमण महर्षींचे एक छोटेसे पुस्तक (शीर्षक Who am I असावे) त्यांना वाचायला दिले होते. ते वाचून ते उद्गारले की मी तरी यापेक्षा दुसरे काय सांगतो?

कृष्णमूर्तींच्याबद्दल पू. बाबांनी आणखी दोन गोष्टी सांगितल्या. एकदा श्री. भाऊराव आठवले त्यांना मालीश करत होते तेव्हां जवळच एक टोळ येऊन बसला. भाऊराव त्याला मारणार होते. त्यांना थांबवून त्या टोळाकडे पहात कृष्णमूर्ती म्हणाले, पहा, याचे डोळे, पंख, रंग किती सुंदर आहे. अरे, हाच परमेश्वर आहे! हे सांगून पू. बाबा म्हणाले, खरा भक्त तरी वेगळे काय म्हणतो! त्यालाही जगात जिकडे तिकडे भगवंताचे सौंदर्यच भरलेले दिसते.

कृष्णमूर्तींच्या व्याख्यानाला एक माणूस नेहमी जात असे. काही दिवस तो दिसला नाही म्हणून कृष्णमूर्तींनी चौकशी केली तेव्हां त्याची कंबर धरली आहे त्यामुळे तो उठू शकत नाही असे त्यांना कोणीतरी सांगितले. कृष्णमूर्ती त्याच्या घरी गेले आणि त्याच्या पाठीवरून नुसता हात फिरवून त्यांनी त्याला बरे केले!

अशा काहीं जुन्या गोष्टी सांगितल्यानंतर पू. बाबा म्हणाले, आपली श्रीमहाराजांच्या अस्तित्वाच्या जाणिवेसंबंधी चर्चा चालली होती त्याबद्दल सांगा.

**साधक ब :** शक्तीची आपल्याला सतत जाणीव राहात नाही येथपर्यंत आपली चर्चा आली होती. आपल्याला शक्तीची समग्र कल्पना येत नाही. आपली कल्पना खंडित असते.

**पू. बाबा :** होय. शक्तीची जाणीव व्हायला पाहिजे. शक्तीचे चार प्रकार आहेत. (१) जडशक्ती : Physics (भौतिकी) मधील उष्णता, प्रकाश, ध्वनि, विद्युत आणि चुंबक शक्तींचा आपण विचार करतो. (२) दुसरी जीवनशक्ती : या शक्तीमुळे सचेतनांचे संवर्धन होते. (३) तिसरी मनाची शक्ती आणि (४) चवथी आत्मशक्ती. यांपैकी जडशक्तीची आपल्याला जास्त जाणीव असते; तसेच जीवनशक्तीचाही अनुभव असतो. आपण पाहतोच की साधन करतांना आपली मनाची शक्ती कमी पडते. आत्मशक्तीपर्यंत पोचणे दूर आहे. तथापि शक्तीचे भान राहिले तरी त्यातून श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचे भान येईलच असे नाही.

**साधक ब :** वास्तविक आज मी जो आहे तो त्यांच्यामुळे आहे. पण ती जाणीव राहात नाही.

**पू. बाबा :** मी यावर खूप विचार केला. मला असे वाटते की त्यांच्या अस्तित्वाची जाणीव ठेवायची म्हणतांना आपली एक चूक होते आहे. श्रीमहाराज आता देहात म्हणजे जडात नाहीत. ते सूक्ष्मात आहेत आणि आपण जडात आहोत. ते आणि आपण या दोन भिन्न पातळ्यांवर असल्यामुळे त्यांचे अस्तित्व जाणवणे अवघड आहे. ज्या प्रमाणात आपल्यामधला जडपणा कमी होऊन आपल्या मनाला सूक्ष्मता येईल त्या प्रमाणात आपल्याला त्यांच्या अस्तित्वाची जाणीव होईल. ही सूक्ष्मता आणायची म्हणजे काय करायचे? मला वाटते त्यासाठी देहाकडे वेगळेपणाने पाहता आले पाहिजे. याकरिता भक्ताचा मार्ग म्हणजे 'हा देह तुझा आहे' म्हणायचे. गोपींनी हे केले. त्यांच्याबद्दल स्वत: श्रीकृष्ण सांगतात की स्वत:चा देह देखील, ह्या गोपी माझा म्हणून सांभाळतात. त्यामुळे मी त्यांच्या गाढ प्रीतीचे भाजन - भांडे म्हणजे स्थान झालो आहे. श्लोक असा आहे.

निजांगमपि या गोप्यो ममेति समुपासते।
ताभ्यां परं न मे किंचित् निगूढं प्रेमभाजनम्॥

माझ्यासगट सगळे तुझे आहे म्हटले म्हणजे मी काही करत नाही. जे जे काही घडते ते ते सर्व तूच करतोस असे वाटायला लागेल. तुम्हाला काय वाटते? हे कां घडत नाही?

**साधक ग** : Physics मधे Resonance चा (अनुस्पंदन) एक प्रयोग करतात. ताण दिलेल्या एका तारेत आघातामुळे निर्माण होणारी ध्वनिकंपने दुसऱ्या तारांत निर्माण होण्यासाठी दुसऱ्या तारांनाही पहिल्या तारेशी जुळेल असा ताण द्यावा लागतो. तसे येथे श्रीमहाराज ही मूळ कंपने होणारी तार आहे आणि आपण बाकीच्या तारा आहोत. मूळ तारेतील कंपने आपल्यात यायला जो ताण द्यायला पाहिजे तो आपल्याला देता येत नाही आणि दिला तरी सहन होत नाही. क्वचित दिला गेला तरी तो टिकत नाही; पुन्हा ढिला पडतो.

**पू. बाबा** : होय; पण मनानेच सगळे त्यांना द्यायचे आहे. त्यात अडचण काय आहे?

**साधक प** : त्यांना देतांना माझे म्हणून जे आहे ते एकवेळ देता येईल पण मीच स्वत:ला कसा देणार?

**साधक ग** : एका प्रवचनात श्रीमहाराजांनी म्हटले आहे की एक वेळ 'सर्व' देता येईल पण 'स्व' देणे फार अवघड आहे.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता ते खरे आहे; पण आधी बाकीचे सर्व तरी त्यांना दिले पाहिजे ना? संसार, घरदार, मान-अपमान, जीवनात जे जे काही घडते ते ते त्यांच्या इच्छेने घडते आहे असे वाटले पाहिजे. जे घडते ते बरोबर आहे असे स्मरण तरी प्रतिक्षणी कुठे राहते? काहीही घडले तरी संत 'रामाची इच्छा' म्हणतात त्याला मोठा अर्थ आहे.

**साधक ड** : पंढरपूरला जाता आले नाही तरी वाटेवर तरी पडून राहिले पाहिजे ना?

**साधक प** : वाटेवर पडून राहतो म्हणण्यात देखील धोका आहे. वाट पहात राहणार असे एकदा म्हटले म्हणजे आज जे चालले आहे ते ठीक आहे असे वाटायची आणि आळस वाढायची शक्यता आहे.

**साधक ड** : वाटेवर पडणे देखील खरे तर आपल्या हातात नाही. पडून राहणे जमले तरच वाट पाहण्याचा धीर येईल या अर्थाने वाटेवर पडायचे.

**साधक ब** : जे चालले आहे ते ठीक आहे असे काही वेळा वाटते पण ते खरे नव्हे. वरवर पहाता वाटते की आता माझा संसार झाला. मी सगळ्यातून मोकळा झालो; पण खरा आत कोठे गुंतलो आहे ते सांगता येत नाही. साधन नीट होत नसले आणि ते का होत नाही याचा विचार केला की आपण कुठे कुठे गुंतलो आहोत ते बरोबर लक्षात येते असे वाटते. त्यातून सोडवण्याचे काम देखील तेच करत आहेत. खरोखर संसाराची खेंच विलक्षण आहे!

**पू. बाबा :** एकदा श्रीमहाराज नाशिकला गेले होते, तेव्हां पुष्कळ माणसे त्यांना भेटायला येत होती. कोणी काही, कोणी काही अशा आपल्या अडचणी लोक सांगत होते. बाजूला एक गृहस्थ ऐकत बसले होते. सगळी मंडळी गेल्यावर श्रीमहाराजांनी त्यांची विचारपूस केली, तेव्हां ते उद्गारले, काय हे! कसल्या प्रापंचिक मागण्या सगळे करतात! श्रीमहाराजांनी त्यांना विचारले की आपल्याला काही अडचण नाही का? ते म्हणाले, मला काहीही नको; आहे ते ठीक चालले आहे, ते टिकले म्हणजे झाले! तशी आपली गत आहे.

**साधक ग :** होय. ही खोटी आत्मसंतुष्टता आहे. ती भंगल्याशिवाय खरी तळमळ निर्माण होणार नाही.

**पू. बाबा :** ती कशी भंग व्हायची?

**साधक ब :** प्रपंचात ज्या अडचणी येतात त्या ही आत्मसंतुष्टता नाहीशी करण्याकरताच श्रीमहाराज आणतात. माझे साधन तेच करून घेतात हेच खरे आहे.

**पू. बाबा :** होय. इतके सत्पुरुष असतांना आपण अपघाताने श्रीमहाराजांकडे आलो असे तुम्हाला वाटते का? तसे नाही. अनेक जन्म आपल्या उद्धाराची त्यांची खटपट चाललेली आहे.

**साधक ग :** समर्थांनी म्हटले आहे ना, की आई एका जन्माचीच काळजी वाहते; गुरु जन्मोजन्मींची काळजी करतात.

**साधक क :** हे खरे असले तरी त्याची खूण पटली पाहिजे.

**साधक ब :** आपण रोज नामस्मरण करतो हीच प्रचीति आहे. आता आपण त्यांचे आहोत असे वाटणे देखील तेच करून घेणार आहेत.

**पू. बाबा :** पूर्णानंद म्हणायचे ते खरे आहे. तुमचा गुरु - श्रीमहाराज - बोलतो गोड, पण गिरमीट आहे. आंतडी बाहेर काढील.

**साधक ब :** त्याशिवाय होणारच नाही.

**साधक प :** आपल्याला ते सोसत नाही ना! सगळे त्यांच्यावर सोपवू म्हणण्यात गफलत होते. आत्ता, या क्षणापासून ते खरे खरे घडले पाहिजे. वर्षानुवर्षे हा विचार करत राहिलो आणि तो केवळ विचारच राहिला, कृती झाली नाही तर त्याला काही अर्थ नाही.

**पू. बाबा :** आत्मानात्मविवेक ही काही सोपी गोष्ट नाही. अनात्मवस्तूंचा त्याग केल्याखेरीज - देहबुद्धी पूर्णपणे गेल्याखेरीज - साधनासाठी लागणारी

सूक्ष्मता येणार नाही. आपल्या सगळ्या वासना देहबुद्धीतून आल्या आहेत. देहाकडे वेगळेपणाने पहाता आले पाहिजे.

**साधक ग** : गीतेत 'त्यागात् शांतिः' म्हटले आहे ते याच अर्थाने असावे.

**पू. बाबा** : होय, आणि तीही ताबडतोब - अनन्तरम्. त्यागाखेरीज परमार्थ नाही. मी तुझा आहे हे अनुसंधान पाहिजे. त्यात गोडी आहे.

**साधक ग** : मी तुझा आहे. समुद्राचा तरंग, तरंगाचा समुद्र नव्हे. बाबू जगन्नाथदास 'रत्नाकर' यांच्या 'उद्धवशतक' या काव्यात एक प्रसंग आहे. उद्धव गोपींना तुम्ही ब्रह्मस्वरूप आहात; योगमार्गाने त्या ब्रह्माशी मिसळून जा इत्यादी उपदेश करतो. तेव्हां गोपी म्हणतात की ब्रह्म महासागर आहे आणि आम्ही जीव पाण्याचे थेंब आहोत. आम्ही त्या ब्रह्मात - सागरात विलीन झालो तरी त्या ब्रह्माला त्याचे भानही असणार नाही पण आम्ही मात्र आमचा थेंबपणा - बूँदता हरवून बसू. त्यापेक्षा वेगळ्या राहून त्या मनमोहन कृष्णाचे स्मरण, चिंतन, प्रेम यातच आम्हाला खरी गोडी वाटते. तो जाईल कोठे? तो तर आमच्या हृदयातच आहे.

**पू. बाबा** : फार गोड भाव आहे.

**साधक ब** : साधन करतांना संसारात जास्त अडचणी आल्या तर ओळखावे की मी अजून जास्त गुंतलेला आहे आणि त्यातून मला बाहेर काढण्यासाठी सद्गुरूंनी त्या पाठविल्या आहेत. काट्यांवरचा कपडा ओढून काढतांना फाटतो तसे रक्तबंबाळ व्हावे लागेल.

**साधक प** : साधक ग नी resonance चे सतारींचे उदाहरण दिले ना, त्यात आधी एक तार बरोबर लागलेली असते, मग बाकीच्या तारांना योग्य तितका ताण देऊन जुळविता येतात. तसे ज्याची तार लागलेली आहे, ज्याला साधले आहे त्याचा सहवास पाहिजे.

**पू. बाबा** : होय, ती मोठीच गोष्ट आहे. पण ती कृपा व्हायला साधन करत राहणे आणि प्रार्थना यांखेरीज आपल्या हातात आज तरी काय आहे?

**साधक क** : करत राहणे आणि वाट पाहणे हेच खरे!

## |२२०| (३० ऑगस्ट १९९१)

आज सुरुवातीला पू. बाबांनी श्री. परचुरेशास्त्र्यांच्या काही आठवणी सांगितल्या. धाकटे राममंदिर बांधले त्यानंतर वाईचे वेदशास्त्रसंपन्न भाऊशास्त्री लेले यांनी श्रीमहाराजांच्या नामसाधना उपदेशाच्या विरोधात श्रीमहाराजांना

परचुरेशास्त्रीबोवांकडून एक पत्र लिहविले. 'वैदिक कर्म खरें महत्त्वाचें व पवित्र असतांना रामनामाचें बंड वाढविणें हे अवैदिक व अशास्त्रीय आहे' असा त्या पत्राचा भावार्थ होता. त्याचप्रमाणे श्रीमहाराज लोकांना उष्टे खायला घालून भ्रष्टाचार माजवितात असेही म्हटले होते. श्रीमहाराजांनी प्रत्येकाला हे पत्र दाखवायला सुरुवात केली आणि नंतर विप्रसभा बोलावून त्या सभेत रामनामाचे श्रेष्ठत्व सिद्ध केले. उष्टे खायला घालण्याच्या बाबतीतं पू. बाबा म्हणाले, असे होत असे की श्रीमहाराज जेवायला म्हणून पानावर बसले की प्रत्येकजण त्यांच्याकडे प्रसाद मागायला येत असे आणि जेवण सुरू करण्यापूर्वीच श्रीमहाराज त्यांच्या पानातले थोडे थोडे प्रत्येकाच्या हातावर ठेवीत असत. काही वेळा या गोष्टीचा इतका अतिरेक होई की शेवटी श्रीमहाराज अर्धपोटीच राहात!

श्री. परचुरेशास्त्र्यांना पुढे महारोग झाला. घरच्या लोकांनी गावाबाहेर झोपडी बांधून दिली तेथे राहात. तेथे जेवणाचा डबा जात असे. तथापि श्रीमहाराजांनी मात्र त्यांना जवळ केले. एकदा ते श्रीमहाराजांना म्हणाले, या हातांनी तुम्हाला दोष देणारे पत्र लिहिले म्हणून का मला ही शिक्षा झाली? हे ऐकतांच श्रीमहाराजांच्या डोळ्यांना पाणी आले आणि ते म्हणाले, 'नाहीं हो, शास्त्रीबोवा, मी इतका निर्दय नाही!' पुढे एकदा श्रीमहाराज त्यांना म्हणाले की साऱ्या जगाने दूर केले तरी मी तुम्हाला दूर करणार नाही.

एकदा परचुरेशास्त्र्यांना पुण्यात अंबूराव महाराजांचे गुरुबंधू श्री. लिमये यांचेकडे जायचे होते. त्यांचे घर दाखवायला मी त्यांच्याबरोबर गेलो होतो तेव्हां ते म्हणाले की एकेकाळी ह्या पुण्यात माझ्या गळ्यात किती हार पडत आणि आज लोक तोंड चुकवताहेत! मला त्यांच्या शेजारी जेवायला बसलेला पाहून कोणीतरी श्रीमहाराजांना म्हणाले, अहो, हा रोग सांसर्गिक आहे; तुम्ही त्या तरुणाला त्यांच्या शेजारी जेवायला कां बसू दिलेत? यावर श्रीमहाराज म्हणाले, असा आजार होत असता तर सगळ्या जगाला हा रोग झाला असता. जेवायला रोज गार भाताची ढेकळे मिळायची. त्या दिवशी गरम भात खातांना परचुरेशास्त्र्यांच्या डोळ्यात पाणी आले! ते पुढे म. गांधींच्या आश्रमात असत. त्यांनी म. गांधींना एकदा श्रीमहाराजांना भेटण्यासंबंधी सुचविले. म. गांधी ठीक म्हणाले म्हणून शास्त्रीबोवांनी तसे पत्र लिहून श्रीमहाराजांना (पू. तात्यासाहेब) कळवले. श्रीमहाराज म्हणाले, ते उद्योगात असतात; त्यांना वेळ मिळायचा नाही. म. गांधी मद्रासला गेले असतांना कोणी तरी त्यांना रमण महर्षींना भेटावे असे सुचविले. पण तीही भेट झाली नाही.

श्री. परचुरेशास्त्र्यांनी एकदा श्रीमहाराजांना विचारले की स्वानुभूति म्हणजे काय? प्रथम श्रीमहाराज त्यांना म्हणाले, आपण मोठे शास्त्री आणि मला तर संस्कृताचा गंधही नाही, तेव्हां मी काय सांगू? मी हे संभाषण ऐकतच होतो. माझ्या मनात विचार आला की ज्याचे उपनिषदात 'यत् ज्ञात्वा सर्वं विज्ञातं भवति' इत्यादि वर्णन आहे तीच स्वानुभूति. पण मी काही बोललो मात्र नाही. तथापि माझ्याकडे वळून श्रीमहाराज म्हणाले, आपण म्हणता ते ज्ञान वेगळे. नंतर त्यांनी शास्त्रीबोवांना विचारले, अनुभूति म्हणजे काय? ते म्हणाले, अनुभव. श्रीमहाराज म्हणाले, मग अर्थ स्पष्ट आहे. स्वत:चा अनुभव म्हणजे स्वानुभूति; तथापि ही कां होत नाही? आपल्या सगळ्या अनुभवांना दृश्याचा आधार आहे. मी म्हणालो, दृश्याचे आलंबन आहे. श्रीमहाराज म्हणाले, हा शब्द योग्य आहे. आपल्या अनुभवातील हा दृश्याचा आधार किंवा आलंबन नाहीसे झाले तर काय होईल? परचुरेशास्त्री म्हणाले की ती झोपेसारखी अवस्था होईल. श्रीमहाराज म्हणाले, म्हणजे पोकळी होईल. पण हे अज्ञानच म्हटले पाहिजे. ही काही 'स्व' ची अनुभूति नव्हे. म्हणून मन जेव्हां दृश्याचे आलंबन सोडून आत वळेल आणि 'मी कोण आहे' हा अनुभव घेणारा कोण आहे याचा विचार करू लागेल आणि जेव्हां दृश्यापलीकडच्या ह्या 'मी' ची त्याला जाणीव होईल तेव्हां दृश्य मावळून केवळ स्वानुभूति राहील. व्यावहारिक दृष्ट्या दृश्य राहील; त्यामधे सत्पुरुषाचे व्यवहारही चालतील पण तो त्या सगळ्यापासून वेगळा राहील.

हे सांगून पू. बाबांनी विचारले की ही अनुभूति कशी येईल? आपण कधी स्वत:संबंधी म्हणजे 'स्व' चा विचार करतो का?

कोणीच काही उत्तर दिले नाही तेव्हां पू. बाबा पुढे म्हणाले, असे पहा की आत्तापर्यंतचे आपले जीवन कसे गेले? त्यात आपण किती केले आणि किती घडत गेले याचा विचार केला तरी मी कर्ता हा भाव लटका पडतो. बरे, मी कर्ता नाही म्हणावे तर मी करतो म्हणून गोष्टी घडतात असेही वाटते. तथापि असे वाटणारा 'मी' कोण आहे याच्याकडे आपण कधी पाहतो का? संत कर्तेपण रामाकडे देतात आणि मी काहीच नाही असे म्हणतात. पण ही शरणागती आपल्याजवळ नाही. एकदा श्रीमहाराजांनी मला विचारले, तुम्ही रोज दाढी करतांना आरशात पाहतां तेव्हां त्या डोळ्यांतून कोण पाहते याच्यावर कधी विचार केला आहे का? आपण कधी 'स्व' चा विचार करतो का?

**साधक ग :** आपले सगळे विचार दृश्याला धरूनच असतात. तसेच आपण विचार करतांना मुख्यत: कार्यकारण भावाचा विचार करतो.

**पू. बाबा :** आपण विचार करतो म्हणजे नेमके काय करतो? आज मी जो आहे तो स्मृतिरूप आहे. माझे सगळे विचार, आत्तापर्यंतच्या माझ्या जीवनातल्या घटना, ऐकलेले, वाचलेले विचार इत्यादींचे बनलेले आहेत. मी स्वतंत्र विचार करतो हा एक भ्रमच आहे.

**साधक प :** दुसरे असे की आपला एकच विचार जास्त काळ टिकू शकत नाही. विशेषत: जोपर्यंत वृत्ती बहिर्मुख आहे तोपर्यंत माझे जीवन बाहेरच्या जगाशीच निगडीत राहणार. मला होणारे सुख-दु:ख हा बाह्य जगाचाच परिणाम वाटणार. हे सुख-दु:ख भोगतो कोण हा विचार मनात यावयाला वृत्ती अंतर्मुख झाली पाहिजे. तसेच विचार आणि अनुभूति यांमधे आपण गल्लत करतो आहोत. मी कोण याचा मला विचार नको, अनुभव पाहिजे.

**पू. बाबा :** होय; पण एकदम अनुभव येणे शक्य नसेल तर प्रथम विचार तरी यायला पाहिजे. टी. व्ही. वरला एखादा कार्यक्रम पाहतांना कसे आपण एकाग्र होतो; तसा स्वत:संबंधी एकाग्र होऊन विचार कां करता येऊ नये?

**साधक ब :** टी. व्ही. वरील कार्यक्रमाची मला आवड आहे. तो दृश्याला धरून आहे. आज माझे मन स्वत:ला जाणण्यापासून दूर पळते.

**पू. बाबा :** माझ्या मनात हा विचार का आला ते सांगतो. आपण पंचकोशांचे वर्णन करतो, अन्नमय, प्राणमय, मनोमय इत्यादी. हे एकाच्या आत दुसरा असे आहेत. नाम जर खोल जाऊ लागले तर प्रथम अन्नमय कोशात, मग प्राणमय कोशात असे आत जात जात त्या खऱ्या 'मी' पर्यंत जाऊन पोहोचेल. पण इच्छा असूनही हे कां होत नाही? उगीच शक्ती कमी पडते वगैरे ठराविक उत्तरे नकोत.

**साधक ग :** बाह्य जगापलीकडे जाऊन विचार करायची आम्हाला सवय नाही. 'मी' वर विचार करायचा तर स्थल, काल, कार्यकारणभाव इत्यादी उपाधी सुटल्या पाहिजेत.

**पू. बाबा :** श्रीमत् शंकराचार्यांनी विवेक चूडामणीमध्ये म्हटले आहे की -

बाह्ये निरुद्धे मनस: प्रसन्नता मन:प्रसादे परमात्मदर्शनम्।

तस्मिन्सुदृष्टे भवबन्धनाशो बहिर्निरोध: पदवी विमुक्त:॥ ३३७॥

बाह्य विषयांचा निरोध केल्याने मन प्रसन्न होते. मन प्रसन्न झाले की परमात्म्याचे ज्ञान होते. परमात्म्याचे ज्ञान झाले की संसारबंधाचा नाश होतो

म्हणून बाह्य विषयांचा निरोध करणे हा मुक्तीचा मार्ग होय. बाह्य जगाचा संबंध सोडून आत वळले पाहिजे. त्यासाठी बळकट धारणा लागते. भक्त काय करतो की जीवनात जे जे काही घडते ते ते राम करतो असे म्हणू लागतो. म्हणजे एका परीने खोट्या मी ला displace (स्थानभ्रष्ट) करायला आणि बाह्य जगाची ओढ कमी करायला राम कर्ता हा भाव वाढवला पाहिजे आणि ते सतत भान राहावे म्हणून अखंड नामस्मरण पाहिजे.

**साधक ड** : ज्ञानाच्या मार्गाने म्हणजे विचाराने किंवा भक्तीच्या मार्गाने म्हणजे नामस्मरणाने ही अनुभूति येईल; असेच ना?

**पू. बाबा** : आत्मानुभूति, स्वानुभूति किंवा आत्मदर्शन अजून दूरच राहील पण मन दृश्यातून आत वळेल. तथापि आपला बाह्य जगाचा निरोध होतो आहे ना हे कसे ओळखायचे?

**साधक प** : त्याकरिता आणखी काही लक्षणे शोधण्यापेक्षा नाम आणखी घ्यावे, आणखी घ्यावे असे वाटू लागले की समजावे की मन बाहरून आत वळू लागले आहे.

**पू. बाबा** : होय, असे म्हणता येईल. हे एक गमक ठरू शकेल. तथापि शेवटी द्रष्टा आणि दृश्य दोन्ही एकच आहेत; दृश्य असे वेगळे काही नाहीच हा अनुभव कसा यायचा?

**साधक प** : आज नाम घेतांना मला त्यापासून काहीतरी मिळावे, साधावे असे वाटते. ते काय याबद्दल माझी कल्पना स्पष्ट नसेल; इतकेच नव्हे तर आमच्यापैकी प्रत्येकाची कल्पना वेगळी असेल. ती कल्पना जाऊन केवळ नामाकरता नाम असे होईल तेव्हां हा भेद नाहीसा होईल. तोपर्यंत द्रष्टा आणि दृश्य हा भेद राहणारच.

**साधक ज** : साधन हेच शेवटी साध्य आहे हे समजले पाहिजे. आज तरी नाम हे दुसऱ्या कशाचे तरी साधन आहे.

**साधक प** : आरशातून कोण पाहतो या प्रश्नाचे उत्तर जाणीव असे साधक क म्हणत होते. ती जाणीव देखील कशाची तरी जाणीव, कोणाची तरी जाणीव अशी न राहता केवळ कोरी जाणीव म्हणून राहू शकत नाही. तसे जोपर्यंत कोरे नाम किंवा केवळ नामाकरता नाम होत नाही तोपर्यंत काहीतरी दृश्याचा आधार आहे हे उघड आहे.

**पू. बाबा** : आधार शब्दाचा अर्थ देखील सर्व बाजूंनी धरलेला - आ + धृ असाच आहे.

**साधक क** : नामस्मरण करतांना ते माझ्या हिताचे आहे, ते अखंड टिकले पाहिजे अशी जोपर्यंत urge (आंच) नाही तोपर्यंत नामस्मरणाने मन आत वळवता येणार नाही.

**साधक ब** : पण ती urge निर्माण करून मन आत वळवायचे काम देखील नामच करेल. त्यासाठी आवश्यक ती सफाई नामानेच होईल. आज माझे मन आत वळायचे टाळते कारण आत काय घाण भरली आहे ते त्याला चांगले माहीत आहे.

**साधक प** : मी आत वाईट आहे तसा चांगलाही आहे. म्हणून आणखी चांगला होईन हा भाव पाहिजे.

**पू. बाबा** : मला वाटते, एकूण urge नाही हेच खरे! साधन केले पाहिजे, आणखी केले पाहिजे असा ताण पाहिजे. श्रीमहाराज म्हणत की खरा साधक अंग धरणार नाही. साधन झाले पाहिजे हा ताण असतो ना! इतके नामस्मरण झाले पाहिजे की देहाची स्थिती काहीही होवो, शेवटचा श्वास नामातच जाईल याची खात्री वाटली पाहिजे. यासाठी भावनेची वाढ झाली पाहिजे, ती होत नाही. भावनेची वाढ व्हावी म्हणून श्रीमहाराजांची प्रार्थना करणे येवढेच आज आपल्या हाती आहे.

## |२२१| (६ सप्टेंबर १९९१)

**पू. बाबा** : श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव कशी होईल यासंबंधी आपली चर्चा चालू आहे. त्या संदर्भात श्रीमहाराजांची एक दोन वचनेही मी वाचून दाखवली होती. गेल्या आठवड्यात एक चांगले आणि महत्त्वाचे वचन सापडले ते आधी वाचतो,

"वास्तविक आपण भगवंताचेंच आहोंत, पण भ्रमानें मला मी विषयांचा आहे असें वाटूं लागलें. संत असें सांगतात कीं तूं विषयांचा नाहींस, भगवंताचा आहेस. हीच संतांची खरी कामगिरी व याकरितां ते नाम सांगतात. नाम घेणें म्हणजे मी विषयाचा नाहीं, भगवंताचा आहे असें मनाला सांगणें व मनांत तशी जाणीव उत्पन्न करणें. ही जाणीव टिकवण्याकरतां पुन: पुन: मनाला तेंच सांगणें म्हणजे सतत नाम घेणें."

श्रीमहाराजांच्या १७ एप्रिलच्या प्रवचनात हे वचन आहे. ह्या वचनात आलेले महत्त्वाचे मुद्दे असे :

(१) आपण भगवंताचेंच आहोत.

(२) भ्रमानें मला मी विषयांचा आहे असें वाटू लागलें.

(३) संत तूं विषयांचा नाहींस, भगवंताचा आहेस असें सांगतात व याकरितां नाम सांगतात.

(४) मी विषयांचा नाहीं, भगवंताचा आहे असें आपल्या मनाला सांगणें व मनांत तशी जाणीव उत्पन्न करणें.

(५) ही जाणीव टिकविण्यासाठी व मनांत ठसविण्यासाठीं अखंड नामस्मरण करणें.

येथे महाराजांनी मनाला सांगणे आणि सांगून मनात जाणीव उत्पन्न करणे असा भेद केला आहे. अशा तऱ्हेचा आपल्याला काही अनुभव आहे का?

**साधक ड :** लग्न ठरलं म्हणजे ते ठरलं असं मनाला सांगितलं जातं पण प्रत्यक्ष ते होतं तेव्हां त्याची जाणीव निर्माण होते.

**पू. बाबा :** तथापि हा मन आणि जाणिवेतला फरक म्हणता येईल का? आपण भगवंताचेच आहोत म्हणजे काय?

**साधक प :** प्रत्येक जीवाप्रमाणे खरे म्हणजे आपण भगवंताचे आहोत पण त्याला विसरून आज आपण विषयाचे झालेले आहोत, म्हणून विषयातच राहतो.

**पू. बाबा :** विषयात म्हणजे दृश्यात म्हणू. तथापि दृश्यात राहतो तो मी कोण आहे? तो दृश्यात राहतो म्हणजे काय?

**साधक ड :** दृश्यात म्हणजे रोजच्या जीवनात, व्यवहारात जे घडते तेच खरे वाटते.

**पू. बाबा :** म्हणजे भगवंताचे खरेपण वाटायला प्रथम दृश्याचे खरेपण गेले पाहिजे. आपण जगतो ते संबंधांवर जगतो. आपले अस्तित्वच संबंधांवर आधारलेले आहे. कृष्णमूर्ती यावर फार भर देतात.

**साधक क :** संबंधांशिवाय मी माझा विचारच करू शकत नाही. कशाशी तरी कोणाशी तरी असलेल्या संबंधातूनच मी स्वत:ला आणि इतरांना माहीत असतो.

**पू. बाबा :** वास्तविक माणूस एकटा आहे. तो जन्माला येतो तेव्हां एकटा असतो, मरतो तेव्हांही एकटाच असतो. असे असतांना त्याला एकटेपणाची भीती वाटते. माणसाला जेव्हां स्वत:च्या एकटेपणाची खरी जाणीव होईल तेव्हांच त्याची दृष्टी आत वळेल. आपण विषयातून सुख घेतो, म्हणजे सुख माझ्यात नाही, त्या त्या वस्तूत आहे असे वाटते. तसेच आज आपण

भावनेपेक्षा बुद्धीला जास्त महत्त्व देऊ लागलो आहोत. कृष्णमूर्ती म्हणाले ते खरें आहे. सध्या आपण मेंदूला फार महत्त्व देतो. श्रीमहाराज म्हणत की मूल गर्भात असतांना त्याचे पोषण बेंबीतून होते. ते वासनेचे स्थान आहे. खरे शिक्षण केवळ बुद्धीच्या वाढीकडे लक्ष न देता, वासना कमी करण्यासाठी दिले गेले पाहिजे.

**साधक ब** : वास्तविक गोष्टी घडत जातात पण त्या मी केल्या असे वाटते. त्यातला जो sense of achievment - मी मिळवले असा कर्तृत्वाचा भाव आहे तो जात नाही.

**पू. बाबा** : आज आपले जे अस्तित्व आहे ते स्मृतींवर आधारलेले आहे. समजा, ही सगळी स्मृतीच गेली तर?

**साधक प** : वेड्यासारखी स्थिती होईल. पुन्हा पहिल्यापासून सगळे शिकावे लागेल.

**साधक क** : काही वेळा आजारात वगैरे माणसाची स्मृती जाते ना! भाषेपासून सगळे त्याला परत शिकावे लागते.

**पू. बाबा** : सगळ्या स्मृतीचे राहू दे. व्यवहारातल्या आपल्या दैनंदिन जीवनाला लागणारी स्मृती राहिली पण ज्या स्मृतीतून सुख-दु:ख होते ती स्मृती गेली तर?

स्मृतीला एकंदर चार अंगे आहेत. (१) Learing - शिकणे (२) Retention - धारण (३) Recall - स्मरण (४) Recognition - ओळखणे. अगदी निवडक गोष्टी व घटनांचे retention व recall राहिले तर मेंदूवरचे ओझे कमी होईल.

**साधक क** : स्मृती देखील माझी म्हणून मला त्रास देते. माझे कर्तृत्व किंवा अपयश यांची ती आठवण असते.

**पू. बाबा** : वास्तविक गोष्टी घडत असतात. समजा तुम्ही दुसऱ्या एखाद्या चांगल्या कंपनीत नोकरीला लागला असता तर तुमच्या जीवनात असा काय विशेष फरक पडला असता? पण असे असतांना देखील आपण त्यात गुंतून राहतो त्यामुळे सगळा घोटाळा होतो. स्मृती त्रास देते आणि तीही केवळ ह्या जन्मातली नाही तर अनेक जन्मांतली. शंकराचार्य त्याचे वर्णन जन्मजन्मभ्रमसंस्कारश्रेणि असे करतात.

**साधक ड** : संसारात राहावे पण त्यात गुंतू नये.

**पू. बाबा** : याकरताच संत सांगतात की मी कर्ता हा भाव जायला राम कर्ता हा भाव आणला पाहिजे. जीवनात जे जे घडते ते ते तो करतो, आणि

त्याची आठवण राहावी म्हणून एकसारखे त्याचे नाम घ्यायचे. 'मी कोण' या विचारात गुंतण्यापेक्षा संत 'मी नाही; तूं आहेस' असे म्हणतात आणि ही जाणीव होण्यासाठी मनाला एकसारखे तेच सांगत राहतात. हे एक प्रकारे auto suggestion च (स्वयंसूचन) आहे. वास्तविक आपल्यासारखी किंवा आपल्यापेक्षा मोठी किती माणसे जगात होऊन गेली. तरीपण मी कोणीतरी आहे ही भावना जात नाही. Bradley ने म्हटल्याप्रमाणे Man is a bundle of contradictions हेच खरे. आपल्या जीवनात घडणाऱ्या किती तरी गोष्टी accidents म्हणजे आगंतुक असतात. त्यांना तसे महत्त्व नसते.

**साधक ग** : मला वाटते, मी विषयांचा नाही, भगवंताचा आहे हा भाव येण्यासाठी आपले एकूण व्यक्तिमत्त्वच बदलायला पाहिजे. मी आहे या कल्पनेवर आधारलेले व्यक्तिमत्त्व मी नाही, तू आहेस या भावावर आधारले जाणे फार कठीण आहे.

**पू. बाबा** : होय, हेच साधन आहे.

**साधक ज** : खरा मी कसा आहे इकडे वेगळेपणाने पाहू लागलो म्हणजे हे होईल.

**साधक क** : मला वाटते, आज विषयाचा असलेला आणि भगवंताचा व्हावा असे वाटणारा मी कोण हे शोधत बसण्यापेक्षा, जो कोणी मी आहे तो त्याचा आहे अशा श्रद्धेने नामस्मरण केले तर साधन सोपे होईल. विचारांपेक्षा भावना जास्त काम करू शकेल.

**साधक ग** : होय. ज्ञानापेक्षा भक्तीच्या दृष्टिकोनातूनच ह्या वचनाचा अर्थ लावला पाहिजे. श्रीमहाराजही भक्तीवर, प्रेमावर जास्त भर देत असत.

**पू. बाबा** : आपल्या मनाला स्वस्थता नाही आणि त्यामुळे देहालाही स्वस्थता नाही. हे मन आत वळवून नाम जाणिवेपर्यंत खोल गेले पाहिजे. आणि त्यासाठी अखंड नामस्मरणाचा आग्रह.

## |२२२| (१३ सप्टेंबर १९९१)

**पू. बाबा** : श्रीमहाराजांची बोधवचने वाचतांना काही वचनांचा अर्थ नीट समजला नाही; ती तुम्हाला वाचून दाखवतो.

बोधवचन ६८. "नामापरतें सत्य नाहीं असें ठाम वाटून त्याकरतां जगलें पाहिजे. नामाची गोडी आपल्याला लागली पाहिजे. आपण निरुपाधिक झालें

पाहिजे. पण ही इतकी उपाधि कशी काय जावी? ती सर्व उपाधि देहाची आहे. तेथें मनाची आसक्ति ही खरी उपाधि आहे. देहाची आसक्ति किंवा आपलेपणा काढून टाकला की सर्व उपाधि जाते. ही सुटणे कठीण खरें. पण भगवंताची उपाधि आपण जवळ ठेवूं. म्हणजे ती आपोआप जाईल."

बोधवचन ७२. "भगवंताचें प्रेम येण्यास नामासारखें निरुपाधिक साधन नाही."

बोधवचन ८०. "नाम हें सर्व सत्कर्मांचें लोणी आहे. नाम सर्वांत निरुपाधिक आहे. आपण त्याच्यासारखें निरुपाधिक झालें पाहिजे."

उपाधीचे कोशात निरनिराळे १८ अर्थ दिले आहेत. त्यांपैकी काही अर्थ उघडच लागू नाहीत. पण नाम निरुपाधिक आहे आणि आपण निरुपाधिक झाले पाहिजे म्हणजे साधनाच्या दृष्टीने विचार केला तर स्थल, काल आणि निमित्त किंवा कारण ही तीन बंधने किंवा उपाधी आहेत. ती टाळून साधन करणे शक्य आहे काय? ज्याला उपाधि नाही असे आपल्या जीवनात काही आहे का?

**साधक प** : आज माझ्या उपाधी कोणत्या आहेत याचा प्रथम विचार करावा लागेल आणि मग त्या दूर करायचा प्रयत्न करावा लागेल.

**साधक ग** : उपाधीचा सीमा किंवा नियामक गोष्ट असाही अर्थ घेता येईल. जोपर्यंत मी सीमित आहे आणि नामही मला सीमित वाटते म्हणजे मी घेतो तेव्हां ते असते आणि इतर वेळी नसते तोवर ते उपाधियुक्तच म्हणावे लागेल.

**साधक प** : 'मी आहे.' माझ्या असण्याला कोणतीही उपाधि नाही. हे जे केवळ 'असणे' आहे तेच नाम आहे. जोपर्यंत नामस्मरण ही कृती आहे तोपर्यंत इतर सर्व कृतींप्रमाणे नामस्मरणालाही उपाधी राहणारच.

**पू. बाबा** : कृष्णमूर्ती conditioning हा शब्द उपाधी या अर्थाने वापरतात तेव्हां निमित्त या संकल्पनेवर त्यांचा भर आहे. उपाधिरहित होऊन नाम घेणे आपल्याला शक्य आहे काय?

**साधक ड** : जोपर्यंत मी नामस्मरण 'करतो' म्हणतो तोपर्यंत ते शक्यच नाही. त्याऐवजी प्रत्यक्षात 'घडत' नसले तरी रोज नामस्मरण 'होते' आहे, 'घडते' आहे अशी मनाला शिकवण देत राहिलो तर कदाचित उपाधींचा अडसर दूर होईल; स्वत:ला विसरता येईल.

**साधक प :** आज जीवनात मी अनेक गोष्टी करतो. विचाराने आणि अनुभवाने त्या करण्याच्या काही पद्धती ठरल्या आहेत. आज नामस्मरण ही देखील कृतीच आहे. त्यांत जेवढा वेळ मी स्वत:ला विसरेन तेवढा वेळ नामस्मरण उपाधिरहित झाले म्हणता येईल. सुरुवातीला असे पाच-दहा मिनिटे झाले तरी पुरे. नाम घेणारा मी कोण आहे याचा शोध घेतांना माझ्या उपाधी कोणत्या आहेत हे लक्षात येईल आणि त्या हळू हळू दूर करता येतील.

**साधक ज :** म्हणजे मागच्या वेळी आपण म्हटले होते त्याप्रमाणे मी कोण याचा शोध घेणे म्हणजे उपाधिरहित होणे. तसे झाले तर मी आणि नाम वेगळे नाहीच हे समजेल.

**साधक प :** आज आपला साधन करतांनाचा जो भाव असेल तो मोडणे योग्य होणार नाही. तो भाव ठेवूनच निरुपाधिक होण्याचा प्रयत्न करावा.

**साधक ग :** मी जसा चोवीस तास 'आहे'; त्या असण्याला उपाधी नाही त्याप्रमाणे ज्याला निरुपाधिक होता आले त्याचे चोवीस तास नामस्मरण चालेल. अधून मधून तो व्यवहारात येईल आणि तेवढा व्यवहार झाला की पुन्हा सहजपणे नामात जाईल.

**पू. बाबा :** म्हणजे आज आपली जी स्थिती आहे त्याच्या नेमकी उलट स्थिती! हे आपल्याला कसे करता येईल? मला वाटते, आपली मुख्य उपाधी दृश्य खरें वाटते ही आहे. मी कर्ता हा भाव जाऊन राम कर्ता हा भाव येणे हे देहबुद्धी कमी करण्यासाठी आणि शेवटी नाहीशी करण्यासाठी आवश्यक आहे.

**साधक ग :** मी कर्ता हा भाव जाणे फार अवघड आहे. नामस्मरण जेव्हां चांगले होते तेव्हां हा माझ्या अभ्यासाचाच परिणाम आहे असे वाटते.

**साधक प :** असे जेव्हां वाटते तेव्हां दुसऱ्या दिवशी त्या वेळी, त्या ठिकाणी पुन्हा नामस्मरणाला बसून ते जमते का पहावे. जमले नाही तर लक्षात येईल की मी करतो म्हणून होणारी ही गोष्ट नाही. आणि समजा तुम्हाला पुन: पुन्हा तसे जमत असले तर नाम हुकमी झाले म्हणता येईल. तसे झाले तर ती छान गोष्ट आहे.

**साधक ड :** नामस्मरण जमणे कठीणच आहे. वास्तविक त्याचे महत्त्व पटलेले आहे. पण नामस्मरणाची intensity वाढावी तशी वाढत नाही.

**साधक प :** पाच वर्षांपूर्वी तुम्ही करत होता त्यात आज वाढ झाली ना? ती कशामुळे झाली?

**साधक ड :** मला वाटते, विचार आणि सत्संगतीचा हा परिणाम आहे.

**साधक प :** मग तेच पुढे चालू ठेवावे. सत्संगती मिळणे आणि ती सर्व काळ मिळणे आपल्या हाती नाही हे खरे; पण तशी इच्छा करायला काय हरकत आहे?

**पू. बाबा :** विचाराचा मार्ग कठीण आहे म्हणून संतांनी मनाला भक्तीकडे वळविले. मी तुझा आहे हा भाव वाढवता आला तर काम होईल. बरे, आपल्याजवळ प्रेमभावना नाही असेही म्हणता येत नाही. स्वत:वर आणि प्रपंचावर आपण प्रेम करतोच. ते इकडे वळवता आले पाहिजे. नाहीतर भाऊसाहेबांसारखे सगळे एकदम देऊन टाकता आले पाहिजे. पाहू, आपण पुढच्या शुक्रवारी यावर जास्त विचार करू.

## |२२३| (२० सप्टेंबर १९९१)

**साधक ब :** श्रीमहाराज म्हणाले की मी देहात आहे असे तुम्हांला वाटत होते तेव्हांही मी देहात नव्हतो आणि देह गेल्यानंतरही मी आहे कारण माझे अस्तित्व देहात नसून नामात आहे. त्यांच्या या नामातील असणेपणाचा फार मोठा आधार आहे; कारण देहात असतांना आणि नंतर, दोन्ही स्थितीत नाम आहेच आहे. या असणेपणाच्या गुणालाच नाम म्हणतात. या संदर्भात आणखी काही मुद्दे सांगता येतील.

(१) नाम हे रूपापेक्षा अधिक व्यापक, अधिक शक्तिमान आणि स्वतंत्र आहे.

(२) नाम हे दृश्यापलीकडे आणि सूक्ष्म असल्याने त्याला उत्पत्ती आणि विनाश नाही.

(३) नामाला कोणतेही विकार नाहीत.

(४) देहात असतांनासुद्धा श्रीमहाराजांचे अस्तित्व जर नामात होते आणि नाम हा जर असणेपणाचा गुण आहे तर आजही श्रीमहाराज देहात नसले तरी नामात निश्चितच आहेत. ही वस्तुस्थिती तर्कसंगत आहे.

(५) श्रीमहाराजांच्या अस्तित्वासंबंधी logical proof (तार्किक प्रमाण) प्रमाणे psychological proof (मानसशास्त्रीय प्रमाण) आणि ontological proof (सत्ताशास्त्रीय प्रमाण) ही देता येते. दृश्यामध्ये घट आणि कुंभार म्हणजे material cause (उपादान कारण) आणि efficient cause (निमित कारण) एक असू शकत नाहीत. पण परमेश्वर उपादान कारण आणि निमित

कारण दोन्हीही आहे. उदाहरणार्थ, वेंकटापूरचा श्रीव्यंकटेश स्वेच्छेने दगडातून प्रगट होत आहे.

**पू. बाबा** : नाम हे शब्दापलीकडेच आहे; पण शब्दापलीकडे जाता येत नाही म्हणून ओंकार हा सगुण आणि निर्गुण यांना जोडणारा पूल आहे. "अगुन सगुन बिच नाम सुसाखी। उभय प्रबोधक चतुर दुभाषी॥ १.२०.४॥" निर्गुण व सगुण यामध्ये नाम हे सुंदर साक्षी आहे आणि दोहोंचे यथार्थ ज्ञान करून देणारा तो चतुर दुभाषी आहे असे रामचरितमानसमध्ये तुलसीदासांनी म्हटले आहे. रसेलच्या Introduction to Mathematics मधे त्याने शून्य आणि उणे अंक सांगतांना म्हटले आहे की उणे अंकांनादेखील नाहीपणाने अस्तित्व आहे. तसे देह नसूनही श्रीमहाराज आहेत. काही वेळा त्यांच्या अस्तित्वाचा भाव येतो तो टिकवता आला पाहिजे. आपण स्वत:ला विसरलो तरच त्यांचे अस्तित्व जाणवेल.

**साधक ब** : असणेपणा म्हणजेच Being.

**पू. बाबा** : ह्या Being ला स्वत:लाच Becoming व्हावयाचे असते. त्यामुळे परमार्थात स्वत:लाच सर्व काही करावे लागते. स्वयंसूचनेने मन वळविता येते, तसा प्रचारानेही माणसाच्या मनात बदल करता येतो. वर्तमानपत्रातील आणि रस्त्यावरील पदार्थांच्या (साबण, सिगारेट इत्यादी) जाहिराती पाहून लोकांना ते घेण्याची इच्छा होते. त्यांचे वर्णन the silent persuaders असे केले आहे. गुरजिफ नावांच्या एका कॉकेशियन साधकाने आपल्या मनाचा मेंढ्यांच्या मनावर आघात करून त्यांना रागीट, गरीब किंवा मारकुट्या बनवले! माणसाचे मन प्राण्यांच्या मनापेक्षा प्रगत असल्याने माणसाचा स्वभाव बदलणे, त्याच्या मनाला वळण देणे कठीण जाते.

नाम किती खोल गेले पाहिजे हे सांगताना पू. बाबा म्हणाले, आपले पाच कोश आहेत. त्यातील प्रत्येक कोशाचे प्रधान अंग किंवा कार्य असून त्याचा तदनुरूप आहार आहे. देहाचे किंवा जड शरीराचे - अन्नमय कोशाचे अन्न धान्य, वनस्पती इत्यादी आहे. सूक्ष्म शरीराचे एकाहून एक सूक्ष्म असे तीन कोश आहेत. प्राणमय कोशाचे हालचाल हे अंग असून विकार हा त्याचा आहार आहे. मनोमय कोशाचे मन हे अंग आहे. विचार हा त्याचा आहार आहे. विचार शब्दांनी चालतात म्हणून त्या मनाला शब्दात म्हणजे नामात गुंतवून ठेवले तर ते आणि त्याच्या बाहेरचे दोन्ही कोश - अन्न आणि प्राण -

ताब्यात येतात. मन काही प्रमाणात जड व सूक्ष्म दोन्ही आहे. ध्यान हे विज्ञानमय कोशाचे अंग असून आनंदमय कोशात समाधी आहे. निदान मनोमय कोशापर्यंत तरी नाम पोचलेच पाहिजे. सिंधुदुर्ग किल्ल्यावर पाण्याचे आघात होऊ नयेत म्हणून सभोवती भिंत उभारली आहे तसे मनावर कसलेही आघात होऊ नयेत म्हणून नामाची भिंत उभी केली पाहिजे. यासाठी तुकाराम महाराजांच्या 'रात्रीं दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन॥' या अभंगातील वीरभाव घेण्यासारखा आहे.

नामस्मरणासाठी विरक्ति पाहिजे, तळमळ पाहिजे. निदान- आता आयुष्याच्या शेवटी तरी हे व्हावे. एक साधक वारले तेव्हां श्रीमहाराजांनी मेणबत्ती घेऊन त्यांचे डोळे थिजलेले आहेत हे दाखवले आणि त्याचवेळी माळ फिरवत असल्यासारखी त्यांची बोटे हालत होती हेही दाखवले! शांताश्रम स्वामी बारा वर्षे काशीला होते. पुढे कऱ्हाडला होते. त्यांनी नामस्मरणाचा इतका अभ्यास केला की पुढे एका नामाखेरीज बाकीची भाषा ते विसरले! नामस्मरण विचाराने करावे, नाहीतर श्रद्धेने करावे किंवा भाऊसाहेबांसारखी शरणागती असावी. ते आपले आदर्श आहेत.

**साधक ब :** हे मनच आपला घात करते. पण एक चांगली गोष्ट म्हणजे ते flexible - लवचिक आहे. त्यामुळे तेच आपल्याला सोडवणार आहे.

**पू. बाबा :** होय. तुमचा **flexible** हा शब्द आवडला. ह्या मनालाच योग्य वळण लावून पुढे गेले पाहिजे. त्यासाठी सतत अभ्यास केला पाहिजे. अभ्यासाने जमत नाही हे जाणवले म्हणजे शरणागती येईल.

## ।२२४। (२७ सप्टेंबर १९९१)

**पू. बाबा :** आपली उपाधीसंबंधी चर्चा चालू होती. त्याबद्दल काही पाहिलेत का?

**साधक ग :** सध्या श्रीमहाराजांची वचने वाचतो आहे. त्यात त्यांनी म्हटले आहे की सर्व उपाधी देहबुद्धीतून येतात. तेव्हां देहबुद्धी हीच मुख्य उपाधि आहे.

**पू. बाबा :** मी याच्यावर बराच विचार केला. ज्ञानेश्वर महाराजांनीही उपाधीवर बराच भर दिला आहे. गीतेच्या दुसऱ्या अध्यायात अर्जुन म्हणतो : 'कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढ चेताः।' कार्पण्य - कृपणता म्हणजे संकुचितपणा. संकुचितपणाच्या या दोषाने माझा मूळ क्षत्रिय स्वभाव

उपहत झाला आहे. उप + हन् या धातूपासून उपहत होतो. याचा अर्थ जवळ जवळ मारून टाकलेला, नष्ट केलेला किंवा नष्ट झालेला असा आहे. अर्जुनाच्या क्षत्रिय वृत्तीला दयेने जवळ जवळ नष्ट केले आहे. उपाधींचा परिणामही असाच होतो. वेदान्ताच्या दृष्टीने विचार करायचा तर ईशसृष्टी आणि जीवसृष्टी अशा दोन सृष्टी आहेत. त्यांपैकी ईशसृष्टी म्हणजे परमेश्वराने निर्माण केलेली सृष्टी म्हणजेच **objective world.** जीवसृष्टीत जीव ईशसृष्टीकडे वेगळेपणाने पाहतो आणि आपल्या बुद्धीने, कल्पनेने तिचा अर्थ लावतो. ईशसृष्टीप्रमाणे जीवसृष्टीही अपार आहे. वासनांतून निर्माण झालेल्या देहबुद्धीमुळे आत्मा झाकला जाऊन जीव सुखदु:खांचा भोक्ता बनला. त्यामुळे जोपर्यंत वासनाक्षय होत नाही, देहबुद्धी नाहीशी होत नाही तोपर्यंत नामाचा खरा अर्थ कळणार नाही. तो कळण्यासाठी उपाधीमुक्त झाले पाहिजे. स्थूल मानाने स्थल, काल आणि निमित्त असे उपाधींचे वर्गीकरण करता येईल. या उपाधींमधे आपल्याला आपले अस्तित्व जाणवते. त्याच्या बाहेर जायचे म्हणजे काय करायचे ? स्थळाचीच उपाधी घ्या. नाम अमुक ठिकाणी अमुक आसनात घेतले पाहिजे असे नाही. ते कोठेही आणि कसेही घ्यावे. दारूत मस्त असणाऱ्या माणसाला जसा दारूचा कैफ असतो, तिचा कंटाळा येत नाही तसा नामाचा कंटाळा येता कामा नये. आजचे नामस्मरण झाले अशा प्रकारचा भाव नसावा. नामात मस्त राहावे.

कालाची उपाधी ओलांडायची म्हणजे अमुक वेळेला नाम घ्यायचे असे न करता थोडी जरी सवड मिळाली तरी लगेच नामात बुडी मारावी; मग ती दोन-चार मिनिटे का असेनात. जेवतांना देखील प्रत्येक घासाबरोबर रामनाम घ्यावे. तुकाराम महाराजांनी म्हटले आहे, 'नाम घेई ग्रासोग्रासी। तो नर जेविला उपवासी॥'

तिसरी उपाधी निमित्त म्हणजे कारणाची. खरे म्हणजे आपल्या अस्वस्थतेला कारणच लागत नाही. पण काळजी, भीती, कल्पना, विचार इत्यादींमध्ये आपला किती वेळ फुकट जातो. म्हणून भीती वाटली तर नामच मला या भीतीपासून सोडवील, काळजीतून मुक्त करील असा भाव ठेवावा. विचार करायचा तो नामाचा, कल्पना करायची ती नामाची असा अभ्यास केला तर ह्या उपाधीतून बाहेर पडता येईल.

मला हे सुचायचे कारण म्हणजे माझ्याकडे पुष्कळ माणसे येतात. त्यांच्या अडचणी असतात; बहुतेक सगळ्या प्रापंचिकच असतात. पण त्याचा परिणाम

असा होतो कीं, नाम घेताना जी सूक्ष्मता आलेली असते ती नाहीशी होते. नाम पुन्हा जड होते, उपाधींनी झाकले जाते. म्हणून खरे म्हणजे एकांतसेवनच पाहिजे. पण एकतर ते शक्य नाही आणि दुसरे म्हणजे ते पचले पाहिजे.

**साधक प** : एकांत सोसणे कठीण आहे. आपण सारखे कशाला तरी धरून असतो. ते आधार सुटू लागले तर, आणि आपली तितकी तयारी झाली नसेल तर घाबरायला होईल.

**साधक ब** : उपाधीरहित झाल्याखेरीज उपाधीरहित नामाच्या पातळीवर जाता येणार नाही.

**पू. बाबा** : उपाधी टाळता येत नाहीत तेव्हां त्यांना योग्य दिशेला वळवणे आवश्यक असते. जुनी १९३२-३३ सालची गोष्ट आहे. एक दिवस श्रीमहाराजांनी विचारले की, सध्या काय वाचता? मी ज्ञानेश्वरी वाचतो म्हणून सांगितले. तेव्हा श्रीमहाराजांनी विचारले, तुकारामांची गाथा वाचली आहे का? मी नाही म्हटल्यावर म्हणाले की एकदा वाचावी आणि महत्त्वाच्या भागांवर खुणा कराव्या. अहो! शेवटी सगळे पुस्तकच खुणांनी निळे झाले. माझी वाचनाची आवड लक्षात घेऊन त्यांनी तिला योग्य दिशा दिली. अशा प्रकारे channelise करूनही भक्ती वाढवता येईल. शेवटी आपण पूर्ण निरुपाधिक होऊ तेव्हाच श्रीमहाराजांचे अस्तित्व पूर्णपणे जाणवेल.

## |२२५| (४ ऑक्टोबर १९९१)

पू. बाबांनी Encyclopaedia of Ignorance नांवाचा एक ग्रंथ दाखवला आणि ते म्हणाले, रसेलने माणूस किती चुकीच्या कल्पना करतो यावर एक निबंध लिहिला आहे. हा ग्रंथही तसाच असेल असे वाटले होते. यात अनेक विद्वानांनी - त्यातले काही F.R.C.S. आहेत. - सध्याचे ज्ञान कसे तोकडे आहे यावर लिहिले आहे. ज्ञानाला जर सागराची उपमा दिली तर सध्याचे ज्ञान एखाद्या डबक्यासारखे आहे असे मानावे लागेल. यात एक लेख झोप या विषयावर आहे. लेखकाने म्हटले आहे की आपल्याला झोपेसंबंधी फारच थोडी माहिती आहे. श्रीमहाराजही एकदा म्हणाले होते की, रोजच्या जीवनातील साध्या गोष्टी, नित्य परिचयाच्या असूनही गूढ असतात; त्या आपल्याला कळत नाहीत. झोप म्हणजे काय? ती काय अवस्था आहे?

पू. बाबा पुढे सांगू लागले. १९४२ साली श्रीमहाराजांनी सध्या काय वाचत आहात म्हणून विचारले आणि उपनिषदे वाचा म्हणून सांगितले. काही

दिवसांनी वाचन सुरू आहे ना अशी चौकशीही केली. मी होय म्हणालो. महाराजांनी विचारले, माण्डूक्य उपनिषद वाचले का? मी हो म्हटल्यावर त्यांनी विचारले की, ते इतके महत्त्वाचे का आहे? पुढे म्हणाले, वेदान्ताचे मर्म समजायचे असेल तर अवस्थात्रय समजणे आवश्यक आहे. ते या उपनिषदात सांगितलेले आहे. तीन्ही अवस्थांमधे अनुस्यूतपणे सातत्याने अनुभवास येणारी 'मी आहे' ही जाणीव हेच आत्म्याचे खरे स्वरूप आहे. श्रीमहाराज स्वत:हून क्वचितच वाचायला सांगत असत; उलट बरेचदा वाचणे कमी करायला सांगत. ते असो. झोप म्हणजे काय?

**साधक प** : झोपेवर बरेच संशोधन झालेले आहे. probes लावून झोपेत होणाऱ्या बुबुळांच्या हालचालींवरून असे आढळून आले आहे की, खरी गाढ झोप तीन-साडेतीन तासच असते व त्यात तीन-चार उपअवस्थांची चक्रावृत्ती (cycle) असते.

**पू. बाबा** : झोप ही आनंदाची अवस्था आहे. पण अशी गाढ झोप क्वचितच लागते.

**साधक क** : झोपेची प्रत (quality) आणि नाम यांचा संबंध आहे असे वाटते. नामस्मरण चांगले झालेले असेल तर गाढ झोप लागून उठतांना स्थलकालाचे भान गेलेले असते.

**पू. बाबा** : झोपेचे असू द्या; त्यावर आपला ताबा नाही. पण जागृतीत तरी घडणाऱ्या घटनांसंबंधी आपल्या ज्या प्रतिक्रिया असतात त्यांवर ताबा कसा आणता येईल?

**साधक क** : जागृतीत होणाऱ्या अनेक घटनांत आणि अनुभवांत जागेपणाची जाणीव ही सामान्य (universal) असते. त्या जाणिवेचे भान ठेवले तर प्रतिक्रिया ताब्यात येतील.

**पू. बाबा** : त्यापेक्षा सर्व घटनांमधे आपल्या सद्गुरूंचा संबंध असावा. म्हणजेच सर्व घटना त्यांच्या इच्छेने होत आहेत हाच एक स्थिर प्रतिक्रियाभाव असावा. यासाठी भावना हवी. हे जमले तर हा राजमार्ग (Royal road) आहे.

**साधक ब** : दर तासा-दोन तासांनी त्यांचे स्मरण करावे, चरित्रातला काही भाग वाचावा.

**साधक क** : दिवसामधे पुष्कळ वेळा मी भगवंताकरता जगतो आहे अशी स्वयंसूचना द्यावी.

**पू. बाबा :** त्याचबरोबर क्षुद्र प्रापंचिक गोष्टींसाठी मी नाही असे वाटावे. जीवनात रोज एरवी क्षुद्र असणारी कर्मे करावी लागणारच. पण त्यात मनाने गुंतू नये. थळचे एक साधक मुंबईत राहात होते. त्यांचे थळ येथील घर विकायचे बरेच दिवस चालले होते. श्रीमहाराजांशी बोलतांना ते पुन्हा पुन्हा त्यासंबंधी बोलत. शेवटी एकदा श्रीमहाराज त्यांना म्हणाले, "मी याच्यासाठी आहे का?" तेव्हा ते म्हणाले, महाराज, तुम्ही यासाठी नाही हे मला कळते पण मला ते आवरत नाही. असे होऊ नये. खरे म्हणजे आपण क्षुद्र प्रपंचासाठी नसून भगवंताकरता आहोत हे कळणे व त्यानुसार कृती होणे महत्त्वाचे आहे.

एखादी घटना घडल्यानंतर त्यात आपण किती गुंतायचे - involve व्हायचे, त्या घटनेला किती किंमत द्यायची ते ठरवावे म्हणजे त्याचा परिणाम कमी होईल. कारण तसे त्या घटनेला महत्त्व नसते. आणि ह्याहीपेक्षा आपल्या मनात अयोग्य विचार किंवा संकल्प आल्यास हे श्रीमहाराजांना आवडणार नाही; असे करणे म्हणजे त्यांना दुखवणे आहे अशी भावना व्हावी म्हणजे हातून वाईट गोष्ट घडणार नाही.

## **।२२६।** (११ ऑक्टोबर १९९१)

आम्ही गेलो तेव्हां पू. बाबांकडे बरीच माणसे आलेली होती म्हणून आम्ही मागे बसून राहिलो. ती माणसे गेल्यावर पू. बाबांनी सुमारे सात वाजता आम्हांला पुढे येऊन बसण्यास सांगितले.

**पू. बाबा :** काय करावे! लोकांच्या सांसारिक अडचणी असतात त्यामुळे पुन्हा पुन्हा तेच ते सांगत बसतात; ऐकावे लागते. त्यांचा कल पाहून व्यावहारिक मार्ग सुचवायचा! तुम्हाला मागे बसून कंटाळा आला, बरे झाले. शांतपणे ऐकून घ्यायचे मी श्रीमहाराजांपासून शिकलो. मला त्याचे क्रेडिट आहे! लोकांच्या अडचणी ऐकल्या की वाटते की प्रारब्धाचा सिद्धांत पटला तर माणूस आज जी काळजी करतो ती करणार नाही. पण हा सिद्धांत पटणे कठीण आहे. त्यापेक्षा 'तुझी इच्छा' असे मनापासून वाटू लागले तरी मन शांत राहील. नाद ऐकू येणे, प्रकाश दिसणे अशांसारख्या अनुभवांपेक्षा मन:शांती वाढणे हा नामाचा खरा अनुभव आहे. अगदी लहान सहान गोष्टींनी आपली मन:शांती बिघडते. पहाटे चांगला जप झाला होता आणि सकाळी भय्याने दूध महागले म्हणून सांगितले आणि सरकारला नांवे ठेवण्यापर्यंत अनेक विचार मनात येऊन गेले! खरोखर विषयाची ओढ अनावर असते. विषय हा शब्द

श्रीमहाराज नेहमी उच्चारत असत म्हणून त्यांना त्याचा अर्थ विचारला. तेव्हां ते म्हणाले, भगवंताशिवाय जे सर्व तो विषय. पुढे म्हणाले की ज्ञानेंद्रियांनी जे जाणले जाते ते, म्हणजे सर्व दृश्य हे विषय होय. त्यापासून विरक्त होऊन नाम घेतले पाहिजे, कारण ते सूक्ष्म आहे.

**साधक क :** विषयी लोक येत आहेत असे समजले की साधनकालात श्रीरामकृष्ण लपून बसत! इतके ते स्वत:ला सांभाळत. खरोखर चित्त शुद्ध झाल्याखेरीज नामात आनंद येणार नाही.

**पू. बाबा :** श्री. भीमराव गाडगुळी मोठे साधक होते. श्रीमहाराज त्यांना म्हणाले की मी जितका खरा वाटतो तितके नाम खरे वाटू लागले म्हणजे साधकाचे काम झाले. आपण 'मी आहे' असे म्हणतो तेव्हां देहाहून वेगळा कोणीतरी 'मी' आहे ही जाणीव आत असते. देह येतो, जातो पण 'मी' आहेच; तसे नाम आहे. आणि या अर्थानेच महाराज म्हणाले की तुम्ही मला देहात पहात होता तेव्हांही मी देहात नव्हतोच.

**साधक प :** आपल्या देहतादात्म्यामुळे आपल्याला श्रीमहाराज होते असे वाटते.

**पू. बाबा :** श्री. भीमरावांना श्रीमहाराजांनी पत्र लिहिले होते - मीच लिहून घेतले होते - की आता तीन तपे वकिली झाली तेव्हां ती बंद करून उरलेले जीवन भगवंतासाठी आहे हे समजून राहावे. ज्या दिवशी हे पत्र पोचले त्या दिवशी त्यांनी वकिली बंद केली. त्या दिवशीच्या तारखेसाठी देखील कोर्टात गेले नाहीत! खरोखर, अगदी झोपेतून उठवून विचारले की तुम्ही कशासाठी जगता? तर नामासाठी असे आतून उत्तर आले पाहिजे. सांगायचा उद्देश, इतके ते subconscious मधे (अंतर्मनात) गेले पाहिजे. आपले साधन होत नाही याचे कारण आपले ध्येय निश्चित झालेले नाही हेच आहे.

**साधक ब :** नाम हेच परमात्मस्वरूप आहे आणि परमात्मा आनंदरूप आहे; तेव्हां नाम आनंदमय असलेच पाहिजे. नामातून त्या आनंदाची थोडी जरी प्रचीती आली तर मनुष्य नामामागेच लागेल. कारण माणूस जीवनात आनंदच शोधतो आहे. पण आज आपले मन जडातून आनंद शोधते त्यामुळे ते जड झाले आहे. ते जसजसे सूक्ष्म होईल तसतसा नामात आनंद वाटू लागेल. जिथे आनंद मिळतो तिथे चिकटायची आपल्या मनाला सवय आहे. या सवयीचाच आपल्याला उपयोग करून घेता येईल.

**साधक प** : निसर्गदत्त महाराजांना विचारले की आत्मज्ञान झाल्यावर तुमच्यात काय बदल झाला? विचारायचे कारण ते चहा पीत बिड्या ओढत असत. प्रश्न ऐकून ते म्हणाले की त्यानंतर माझी कल्पना गेली. चहा बिडी यांबद्दल विचारले तेव्हां म्हणाले की देह ते भोग घेतो; माझा त्याच्याशी संबंध नाही. देहाकडे इतके वेगळेपणे पहाता आले पाहिजे.

**पू. बाबा** : डॉ. पाथरकर तंबाखू खात. अगदी आजारी होते तेव्हांही त्यांचा मुलगा त्यांना तंबाखू मळून देई. त्याबाबत श्रीमहाराज म्हणाले की असल्या गोष्टी खऱ्या साधकाच्या आड येत नाहीत.

**साधक ड** : देहाकडे इतके वेगळेपणाने पहाता येणे शक्य आह का?

**साधक प** : का शक्य नाही? माझ्या अंगात सदरा आहे पण मी सदरा नव्हे हे जितके उघड आहे तितकेच मी देहात आहे पण देह नव्हे हे उघड आहे.

**साधक ड** : तथापि सदऱ्याप्रमाणे देहाकडे इतके वेगळेपणाने पहाता येण्यासाठी आधी मी कोण हे समजले पाहिजे ना?

**पू. बाबा** : त्यासाठीच उपाधिरहित व्हायला पाहिजे. ह्यासाठीच सत्संग पाहिजे. भीमरावांची श्रीमहाराजांवर अपार श्रद्धा होती. 'जी' म्हणून पुढे उभे राहात. त्यांच्यासमोर बसत नसत, आणि काही विचारायचे झाले तरी खाली वाकून विचारत. नाणावलेले वकील होते आणि घरची जमीनदारीही होती. त्यामुळे तिजोरी नोटांनी भरलेली असे. श्रीमहाराज त्यांच्याकडे गेले की न मोजता खिशात आणि पिशवीत खर्चासाठी नोटा भरून घेत. त्यांना त्याबद्दल विचारले तेव्हा म्हणाले की श्रीमहाराजांसारखे सत्पुरुष सहज बेहिशोबी असतात. त्यांच्यासाठी आपण समजून बेहिशोबी व्हावे! काही म्हणा, नामस्मरण वाढले पाहिजे. आपण अजून के. जी. क्लासमधे नाहीतर नर्सरीत आहोत असे वाटते.

**साधक क** : नाम म्हणजे काहीतरी दिव्य भव्य पवित्र आहे असा भाव नाम घेतांना आला पाहिजे.

**पू. बाबा** : आपल्याजवळ नाम आहे म्हणजे सर्व जग तुच्छ वाटावे इतका अमूल्य ठेवा आहे असे वाटले पाहिजे. (आमच्यापैकी एका साधकांकडे पाहून) तुमची प्रकृती चांगली नसते ते एका अर्थी चांगलेच आहे. तुम्ही लक्षात ठेवा, श्रीमहाराज म्हणत की ज्याची प्रकृती कायम चांगली आहे तो उत्तम साधक होणे कठीण आहे; कारण त्याचे साहजिकच देहतादात्म्य

असते. आपण आजारी पडलो तर मला बरे वाटावे असे वाटणे देखील चुकीचे आहे कारण हे वाटणे देखील देहबुद्धीतूनच येते. त्याची इच्छा असेल तसे तो ठेवील असे वाटले पाहिजे असे श्रीमहाराज म्हणत. खऱ्या साधकाच्या आड प्रकृती येत नाही याचे उत्तम उदाहरण म्हणजे गुरुदेव रानडे. साधक कसा असावा हे त्यांच्याकडे शिकावे असे श्रीमहाराज म्हणत. गुरुदेव रानडे म्हणालेले मी ऐकले आहे - ते म्हणाले, गेल्या चाळीस वर्षांत मला असा एक दिवसही आठवत नाही की जेव्हां माझी प्रकृती चांगली होती; पण ते माझ्या साधनाच्या आड आले नाही.

## |२२७| (१८ ऑक्टोबर १९९१)

**पू. बाबा :** ह्या आठवड्यात मला एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांनी वज्रेश्वरी (गणेशपुरी) येथील नित्यानंदांचे शिष्य जनानंद यांच्याकडून अनुग्रह घेतला होता. जनानंदांची समाधी कान्हनगडला आहे. आनंदाश्रमापासून दोन मैलांवर हे ठिकाण आहे. मला भेटायला आलेल्या गृहस्थांबरोबर कुलकर्णी म्हणून एक गृहस्थ आणि त्यांची बायको आले होते. सुमारे १९४२-४३ पासून ते आनंदाश्रमात जातात. रामनामाचा त्रयोदशाक्षरी जप करतात. त्यांनी एकदा पपांना म्हणजे स्वामी रामदासांना म्हटले की नाम घ्यायला मदत मिळावी. तेव्हां स्वामींनी त्यांना विचारले की तुम्ही कधी गोंदवल्याला गेला आहात का? त्यांनी नाही म्हणून सांगितल्यावर एकदा जाऊन या, म्हणाले. त्याप्रमाणे काही दिवसांनी ते व त्यांची पत्नी गोंदवल्याला गेले. श्री. जगन्नाथपंत आठवले तेव्हां पंच होते, इतकी जुनी गोष्ट आहे. नित्याच्या काही कार्यक्रमानंतर श्री. कुलकर्णी सभामंडपातच जप करीत बसले होते आणि एकाएकी त्यांना आसमंत पांढऱ्या प्रकाशाने भरलेला दिसू लागला! ढग वाहात असावेत तसा तो प्रकाश वाहात होता. थोड्या वेळाने तो कमी झाला. कान्हनगडला गेल्यावर त्यांनी हा अनुभव स्वामी रामदासांना सांगितला. ते म्हणाले, हा भक्तीचा प्रकाश आहे. भक्तीचा रंग पांढरा आहे. हा प्रकाश आणखी शंभर वर्षे तरी टिकेल. श्री गोंदवलेकर महाराज हे साक्षात् नामावतार होते. त्यांच्या सहवासात नामाचे पोषण होते. ते टॉनिक आहे. आम्ही (म्हणजे स्वामी स्वत:) नाम घेऊन तयार झालो, ते तयारच होते म्हणून नामावतार.

**साधक प :** रामावतार, कृष्णावतार सारखाच हा नामावतार! योगानंद म्हणत असत की त्यांच्या गुरूंचा ध्यानावतार होता आणि त्यांचा स्वत:चा /ज्ञा

प्रेमावतार होता. आपल्या शरीरावरचे केस किती आहेत हे जसे आपल्यालाच माहीत नसते तसे भगवंतालाही त्याचे अवतार माहीत नसतात.

**साधक ग :** गीतेत भगवंतांनी सांगितलेच आहे की "नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप।" १०.४०. हा नामावतार. मी नामात आहे असे श्रीमहाराज म्हणत असत ते याच अर्थाने असावे.

**पू. बाबा :** आनंदाश्रमात माताजी कृष्णाबाई होत्या त्यांना श्री. कुलकर्णी यांनी एकदा नामाच्या अनुभवाबद्दल विचारले होते. तेव्हां त्या म्हणाल्या की नामाचा पहिला अनुभव म्हणजे आपले अवगुण आपल्या लक्षात येऊ लागतात.

द्वारकानाथ नांवाचे धुळ्याकडचे एक गुजराथी गृहस्थ पूर्वी निरूपणाला येत असत. त्यावेळी श्रीमहाराजांच्या चरित्राची पहिली आवृत्ती प्रकाशित झालेली होती. चरित्र वाचून झाल्यावर ते म्हणाले की दुसरी आवृत्ती काढतांना आपण श्रीमहाराजांचा उल्लेख नामावतार या विशेषणाने म्हणजे 'नामावतार सद्गुरु गोंदवलेकर महाराज' असा करा.

**साधक ब :** नामावतार ही कल्पनाच किती भव्य आहे! मी नामात आहे असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. हा जो असणेपणाचा गुण आमच्या बुद्धीला समजतो तो जाणिवेपर्यंत गेला पाहिजे. मग नाम घेतांना श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवेल.

**साधक ग :** नाम हे इतके व्यापक आहे की नाम म्हणजे श्रीमहाराज हे आमच्या कल्पनेच्याही आवाक्यात येऊ शकत नाही.

**साधक प :** नाम हे जाणिवेच्याही पलीकडे आहे. ते जाणिवेत येणे कसे शक्य आहे?

**साधक ब :** नाम जाणिवेपलीकडे आहे, पण ते घेतांना मी अस्तित्वाच्या जवळ जातो आहे असे वाटले पाहिजे. उजेडाचे कारण जसे सूर्याचे असणे तसे अंधाराचे कारण सूर्याचे नसणे. म्हणजे दोन्हींचेही कारण सूर्यच. मी जेव्हां माझ्या इच्छेनुसार काही करतो किंवा घडावे असे म्हणतो तेव्हां नाम विसरलेला असतो; म्हणजेच अंधारात किंवा अज्ञानात असतो. नाम घेतो तेव्हां सर्व त्याच्या इच्छेवर सोपवलेले असते. आपण कर्माशिवाय राहू शकत नाही. तथापि कर्मापेक्षा कर्माचा हेतू बाधक होतो कारण हेतू हे वासनेचेच रूप आहे. नामस्मरण हे कर्म म्हणून सुरू केले तरी ते बंधनाला कारण होऊ शकत नाही कारण नाम कर्माच्या पलीकडेच आहे. नामामुळे वासनेचा क्षय होतो आणि राम कर्ता ही भावना दृढ होते.

**साधक प** : तथापि नामस्मरण चांगले व्हावे ही इच्छा असतेच. मला वाटते की श्रीमहाराजांच्या अस्तित्वाबद्दल आता आपल्यापैकी कोणालाही शंका नाही. बुद्धीला ते पटलेले आहे, येवढेच नव्हे तर तशी श्रद्धा आहे (म्हणजे संशय नाही). तथापि भावनेने जो ओलावा, जी ओढ निर्माण व्हावयाला पाहिजे ती अद्यापि होत नाही. नित्य विचारांनी भावना प्रदीप्त करणे शक्य आहे का?

**पू. बाबा** : विचार मोठे असले तर माणूस त्यात रमून जातो. ते थांबावे असे वाटत नाही. त्यांच्याबद्दल आपलेपणा म्हणजेच प्रेम निर्माण होते. म्हणजे विचारातून प्रेम निर्माण होऊ शकते. उदाहरणार्थ, लो. टिळकांनी गीतारहस्याच्या प्रस्तावनेत शेवटी म्हटले आहे "ज्या विषयाच्या विचारांत आज पुष्कळ वर्षें घालविलीं व ज्याच्या नित्य सहवासानें व चिंतनानें मनाचें समाधान होऊन आनंद होत गेला, तो विषय ग्रंथरूपानें हातानिराळा होणार म्हणून वाईट वाटत असलें तरी हे विचार - साधल्यास सव्याज, नाहींपेक्षा निदान जसेच्या तसे - पुढील पिढीतील लोकांस देण्यासाठींच आम्हांस प्राप्त झाले असल्यामुळे... प्रेमोदकपूर्वक आम्ही होतकरू वाचकांच्या हवालीं करितो." पहा, विचारांचा प्रभाव देखील किती विलक्षण असतो. विचारांपेक्षाही नामाच्या अस्तित्वाचा भाव जागृत करावा. नाम हे केवळ सर्वव्यापी नाही. ते शक्तिरूप आहे. ते स्फुरण आहे. आनंद उसळून यावा तसे ते आहे. ती नामामृताची उकळी आहे. म्हणून आपण एकसारखे नामाच्याच विचारात राहिलो तर नामाचे प्रेम येईलच. विचारांना प्रार्थनेची जोड दिली तर हे सोपे जाईल. श्रीमहाराज माझ्या कुटुंबातील एक आहेत, नव्हे, ते कुटुंबप्रमुख आहेत; त्यांच्या इच्छेनुसार सर्व काही होते असा भाव यावा अशी प्रार्थना करावी. प्रार्थनेत तळमळ वाढू लागली की नकळत नामाची संगत निर्माण होईल.

**साधक प** : नामस्मरण करत राहावे असे वाटते. त्यातच खरें हित आहे हे बुद्धीला पटते. पण आतमध्ये संसाराचे प्रेम भरलेले आहे त्यामुळे नामाला तेथे जागा नाही. मला गरज पडली तर, आजारी पडलो तर घरातल्याच माणसांची मदत होणार आहे असे वाटते. त्यामुळे नामस्मरणाला जोर येत नाही.

**पू. बाबा** : एकंदर दृश्याचे प्रेम कमी होत नाही म्हणा! मला वाटते, ध्येय निश्चित झाले पाहिजे. तुम्हाला सांगतो, वैराग्य आणि शरणागति यांखेरीज हे होणार नाही.

## ।२२८। (२५ ऑक्टोबर १९९१)

**पू. बाबा** : परवा बुधवारी काकड आरती चालू झाली. काल नवीनच येऊ लागलेल्या एका गृहस्थांनी विचारले की सर्व संत - त्यात श्रीमहाराजही आले - सांगतात की कर्तेपणाचा अभिमान सोडा. म्हणजे नेमके काय? मी त्यांना नंतर सांगतो म्हणून सांगितले; पण हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कोणतेही कार्य म्हटले म्हणजे त्याला प्रथम ते करणारा म्हणजे कर्ता लागतो. त्याच्या हातून कर्म घडण्यासाठी साधने म्हणजे करण - instruments लागतात. वेदान्ताच्या भाषेत याला कारणसामग्री म्हणतात. कोणतेही कार्य घडायचे झाले तर त्यासाठी अनेक गोष्टी एकाच वेळी असणे आवश्यक असते. कर्ता, कर्म आणि करण ह्या essential conditions (अत्यावश्यक अटी) आहेतच पण त्याखेरीजही पुष्कळ गोष्टी लागतात आणि मग कार्य सिद्ध होते. यालाच आपण Totality of causes म्हणतो. या सर्वांमध्ये कर्त्याचा भाग किती आणि त्याने अभिमान सोडायचा म्हणजे काय करायचे?

अभिमान शब्दाचा अर्थ पाहू. मान म्हणजे मोजणे. माया - जी अनंताला मोजमापात आणते ती. अभि म्हणजे सर्व बाजूंनी किंवा जास्त. आपण आहोत त्यापेक्षा स्वत:ला जो मोठेपणाने मोजतो तो अभिमान. हा अभिमान सोडा असे सांगतात. जगात कर्म राहणारच; आणि त्याबरोबर कर्ताही असणारच. कर्त्याला इंग्रजीत Agent म्हणतात. त्याला हा अभिमान सोडायला संत कां सांगतात?

**साधक ब** : मी कर्म करतो तेव्हां मला समजत असते की हे कर्म पूर्ण नाही. त्यामुळे त्यातून मला पूर्ण समाधान मिळणार नाही. आणि तरीही मी हे करीनच अशा निर्धाराने आपण ते करत असतो. नामस्मरण ही देखील आपल्या दृष्टीने कृतीच असते आणि मी इतके नामस्मरण केले किंवा करेन असे आपण म्हणतो. पण इच्छा असूनही जेव्हां प्रत्यक्षात ते घडत नाही तेव्हां माझे कर्तेपण लंगडे आहे हे लक्षात येते.

**साधक प** : मला वाटते, कर्तेपणाचा अभिमान नामाला लावू नये. कारण नामस्मरण हे जसे साधन आहे तसे ते साध्यही आहे. साधन जेव्हां साध्य होते तेव्हांच खरे नामस्मरण घडते. ते पूर्ण आहे आणि म्हणून पूर्ण समाधान देणारे आहे.

**पू. बाबा :** नामस्मरणाचे राहू द्या; इतर व्यवहारात तरी कर्तेपणाच्या अभिमानावर संतांचा इतका कटाक्ष कां आहे?

**साधक ग :** मला वाटते, आपल्या व्याकरणकर्त्यांनीही यावर खूप विचार केला आहे असे विभक्तिविचारावरून दिसते. कोणतेही कार्य घडायचे म्हणजे प्रथम कर्ता पाहिजे म्हणून त्याची प्रथमा विभक्ति. नंतर जे कर्म घडायचे त्याची द्वितीया आणि ते करावयासाठी लागणाऱ्या साधनांची म्हणजे करणाची तृतीया विभक्ति. जेव्हां हे कर्म आपण अर्पण करू - त्याचा अभिमान बाळगणार नाही तेव्हांच ते खरे कर्म होईल; बंधनाला कारण होणार नाही म्हणून संप्रदानाची चतुर्थी.

**पू. बाबा :** उदाहरण घेऊन मुद्दा आणखी थोडा स्पष्ट करा.

**साधक ग :** समजा, मला काही कार्य करायचे आहे. परीक्षेला बसायचे आहे किंवा गावाला जायचे आहे. हे कार्य करणारा मी कर्ता म्हणजे Agent आहे. पण जेव्हां मी Agent नसून Controller - नियामक आहे असे स्वत:ला समजू लागतो तेव्हां कर्तेपणाचा अभिमान निर्माण होतो. वास्तविक एकूण कारणसामग्रीतला मी केवळ एक घटक आहे.

**पू. बाबा :** This is an intelligent one! तुम्ही म्हणता त्यात तथ्य आहे.

**साधक ज :** म्हणजे आपण मुनीम आहोत, मालक नाही याचे एकसारखे भान पाहिजे.

**साधक ग :** किंवा श्रीरामकृष्णांनी दासीचे उदाहरण दिले आहे ना! ती धन्याच्या मुलाचे सर्व करते पण हे आपले नव्हे हे मनोमन जाणून असते.

**पू. बाबा :** म्हणजे अनासक्त वृत्तीने कर्म केले पाहिजे.

**साधक प :** अभिमान आणि आसक्ति वेगळे आहेत. त्या दासीजवळ आसक्ति नसेल पण मी त्या मुलाचे सर्व काही करते असा अभिमान असू शकतो. म्हणून एकवेळ आसक्ति जाणे सोपे म्हणता येईल, पण अभिमान जास्त खोल आहे.

**पू. बाबा :** कर्म करा पण त्याचा अभिमान नको. आणखी एक म्हणजे फळाची आशा न ठेवता कर्म करा. वास्तविक समोर फळ दिसत असते म्हणून आपण कर्म करतो.

**साधक ब :** फळाकडे लक्ष ठेवून केल्यामुळे कर्म जसे घडायला पाहिजे तसे होत नाही. खरे तर कर्म करणे हेच महत्त्वाचे आहे.

**साधक प** : कर्मातील प्रत्येक क्षण नवा असतो. आपण जेव्हां उत्कटतेने कर्म करतो तेव्हां कर्मातच आनंद आहे हे लक्षात येते.

**पू. बाबा** : पण फर्स्ट क्लास मिळणे हे फळ ठरवून आपण अभ्यास करतो त्यामुळेच त्या कर्माला जोर येतो.

**साधक प** : मला वाटते, अकर्तात्मता यासाठीच सांगितली असावी. मी केले की कर्म घडेलच अशी खात्री नसते.

**साधक ड** : तथापि केवळ कर्म करणेच आपल्या हातात आहे.

**साधक ज** : तेही नेहमी असतेच असे नाही. तथापि 'यत्न कसून करिन मी, यश दे रामा, न दे, तुझी सत्ता' ही वृत्ती ठेवावी.

**पू. बाबा (आमच्यापैकी एकांना)** : तुम्हाला कदाचित आठवत असेल; तुमची नात आजारी होती तेव्हां मी तुम्हाला म्हणालो की महाराजांच्या कानावर घाला, ठीक होईल. पण हे सांगितल्यावर माझ्याच मनात विचार आला की आपण हे त्यांना सांगतो आहोत पण पटेल की नाही कोणास ठाऊक! म्हणजे सर्व काही तो करतो आहे यावर ऐकणाराचा विश्वास बसो अगर न बसो, सांगणारालाही त्याबद्दल शंका वाटावी इतका व्यक्तीचा कर्तेपणा आपल्याला खरा वाटतो.

**साधक ज** : नियतीने जे घडायचे ते घडणार यावर विश्वास असला तर हे सोपे होईल.

**साधक क** : प्रारब्धाचा सिद्धान्त ठसणे अवघड आहे. त्यापेक्षा भक्ताचा भाव आचरणात आणायला सोपा आहे. भक्त म्हणतो की माझ्या जीवनात जे जे काही घडते आहे ते ते तो घडवतो आहे आणि ते माझ्या हिताचेच असणार, कारण मला माझे हित समजत नाही. ज्याला असे वाटेल त्याला मी करतो हा अभिमान राहणारच नाही.

**पू. बाबा** : एक वेळ आजाऱ्याची समजूत घालायला 'त्याच्या' इच्छेप्रमाणे घडते असे सांगता येईल; पण स्वत: आजाऱ्याला तसे वाटणे अवघड आहे. व्यवहारदृष्ट्या आपल्या वाट्याला आलेले कर्म कर्ता म्हणूनच केले पाहिजे, पण त्याचा अभिमान नको. गीतेची सुरुवातच मुळी तेथून झाली आहे. ज्ञानेश्वरीत भगवंत म्हणतात, अर्जुना, जगाची व्यवस्था चालविणारा कोणी आहे की नाही? की आता ते तुझ्यावर सोपवले आहे आणि म्हणून मी मारणारा आणि हे मरणारे असे तुला वाटू लागले आहे? ''एथ समर्थु एक आथी। तयापासूनि भूतें होती। तरी हें वांयाचि काय बोलती। जगामाजीं॥ २.९६॥ हो कां सांप्रत

ऐसें जहालें। जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिले। आणि नाशु पावे नाशिले। तुझेनि कायी॥ २.९७॥"

**साधक प** : अभिमान आणि अहंकार यात काय फरक आहे? दोन्हींपैकी आधी काय जाईल?

**पू. बाबा** : अहंकार म्हणजे ego हा जास्त खोल आहे. तो नंतर जाईल.

**साधक प** : मला वाटते, अहंकारापेक्षा अभिमान जास्त सूक्ष्म आहे.

**साधक ज** : दासीला किंवा मुनीमाला मी करतो हा अभिमान असतो की अहंकार?

**पू. बाबा** : मी केले नाही तर हे कसे होईल हे अहंकारामधे येते.

**साधक ग** : मला वाटते, अहंकार हा जास्त वरचा म्हणजे superficial आहे. तो प्रथम जाईल. अहं करोमि - मी करतो हा अहंकार आहे. पण माझ्या कर्तृत्वाचा अभिमान जास्त खोल आहे.

**साधक क** : अहंकार असो किंवा अभिमान; कोणते आधी जाईल याला महत्त्व नाही, दोन्ही गेले पाहिजेत. आणि ते नामस्मरणानेच जातील. नामस्मरण करू लागले की त्याला पोषक असे भाव आपोआप येऊ लागतील.

**साधक ग** : मी तेरा कोटी जप करणार असे अहंकाराने ठरवून जरी जप सुरू केला तरी जप करतांना येणाऱ्या अडचणीच सर्व काही शिकवतील. सद्गुरूंनी कृपा केली तरच हा संकल्प सिद्धीला जाईल हे साधकाला समजून येईल.

**पू. बाबा** : सर्व काही त्यांच्यावर सोपवता आले पाहिजे. देऊन टाकता आले पाहिजे. तसे झाले तर मग अमुक व्हावे किंवा होऊ नये अशा विचारांनी चलबिचल होणार नाही आणि साधन चांगले होईल. दासबोधातील विसाव्या दशकातील शेवटच्या समासात समर्थांनी विचारले आहे - 'सकळ करणे जगदीशाचे। आणि कवित्व काय मानुषाचे।' सत्पुरुषांचे हे विचारणे कृत्रिम नसते. त्यांना आतून जाणवते की कर्ता तो आहे. श्री. गणपतराव दामल्यांनी एकदा बारामतीच्या पूर्णानंदांना गुरूशी कसे वागावे असे विचारले, तेव्हां ते म्हणाले, दरवेशाच्या अस्वलासारखे. त्या अस्वलाच्या नाकात एक कडे घातलेले असते आणि ते अस्वल दरवेशाच्या मागे मुकाट्याने जाते आणि तो सांगेल तसे उठते, बसते. तसे सदैव गुरूच्या आज्ञेत राहावे.

**साधक ग** : श्री भाऊसाहेबांनी ते केले. नाम का घेता? तर श्रीमहाराजांना आवडते म्हणून. इतके त्यांनी साधन सोपे केले. साधनाचा अभिमान नाही आणि फळाची आशा नाही!

**पू. बाबा** : होय बुवा, ही माणसंच वेगळी असतात! आपणही त्यांच्यापासून शिकलं पाहिजे. मग काय ठरलं; आपल्या वाट्याला आलेले कर्म करावे पण त्यात आसक्त होऊ नये आणि त्याचा अभिमानही बाळगू नये. सर्व काही त्याच्या इच्छेवर सोपवावे.

**साधक ग** : आपण ज्ञानेश्वर महाराजांच्या "माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें।" या ओवीचा उल्लेख करता ते हे आहे.

**पू. बाबा** : आपल्या जीवनात जे जे घडते ते सर्व त्यांच्या इच्छेने घडते आहे. ती शक्ती सर्व काही करते आहे अशी दृढ श्रद्धा पाहिजे. पू. तात्यासाहेबांना एकदा माइल्ड हार्ट ॲटॅक आला. नंतर स्वस्थ पडलेले असतांना ते म्हणाले की हार्ट ॲटॅक आल्यावर महाराजांना विसरलो. प्रकृतीची काळजी वाटू लागली. मी सुचवले की याबद्दल आपण श्रीमहाराजांना विचारू. नंतर त्याप्रमाणे श्रीमहाराजांना (पेटीवर) विचारल्यावर ते म्हणाले, त्याला (म्हणजे पू. तात्यासाहेबांना) विचारा की त्याच्या काळजीत मी नाही कां? भावार्थ असा की त्यांच्या जीवनात जे जे घडत आहे त्यात काळजीही आली. त्या सर्वामागे श्रीमहाराजच आहेत ही खात्री झाली की साधन हे साधन न राहता साध्यच होईल; कर्तेपण नांवाला राहील.

## |२२९| (१ नोव्हेंबर १९९१)

**पू. बाबा** : आपली अभिमान म्हणजे काय यावर बरीच चर्चा झाली तरीपण नक्की काय ते समजत नव्हते. आज सकाळी जपाच्या वेळी असे दिसले : शाळा किंवा कॉलेजमधे वर्गात असतो तसा मोठा फळा होता. त्यावर अभिमान हा शब्द, त्याची व्युत्पत्ती, त्याचे वेगवेगळे अर्थ वगैरे लिहिलेले होते. पण लक्षात आले की हे आपल्याच मनाचे projection (प्रक्षेपण) आहे. त्यामुळे समाधान झाले नाही. नंतर हे दृश्य नाहीसे झाले आणि सूर्य किंवा पूर्ण चंद्र दिसावा तसा मोठा चकचकीत गोल आकार दिसला. हा गोल लहान लहान होत प्रतिपदेची कोर असावी तसा लहान झाला. हा अभिमान क्षीण झालेला जाणिवेचा प्रकाश म्हणजेच अभिमानसहित जीव असावा.

नुकतेच स्वामी स्वरूपानंदांचे एक शिष्य भेटून गेले. ते म्हणाले, स्वामींनी मला सांगितले ते तुम्हाला सांगावेसे वाटते. सद्गुरु किंवा भगवंताला सर्व देण्याबद्दल स्वामींनी सांगितले आणि यासाठी स्वत:चे उदाहरण दिले. स्वामींना लोक विचारत असत की आपल्याला कसे साधले? स्वामी म्हणाले, ते

त्यांच्या गुरूंकडे गेल्यावर गुरूंनी विचारले की तू आयुष्यात महत्त्वाचे असे काय केलेस? यावर स्वामी म्हणाले, देशसेवा, समाजसेवा इत्यादी. तेव्हां त्यांचे गुरु म्हणाले की ते सर्व मला देऊन टाक. स्वामींनी विचारले की ते कसे द्यायचे? गुरु म्हणाले "'मी' तें केलें" हे विसरून जा; पुन्हा त्याची आठवण नको.

कान्हनगडच्या स्वामी रामदासांनी श्रीमहाराजांना नामावतार म्हटले आहे. Gospel of Swami Ramdas मधे त्याचा उल्लेख आला आहे काय हे पाहण्यासाठी ते पुस्तक चाळले. त्या पुस्तकात ऑगस्ट १९५१ पासूनची संभाषणे आहेत. मला पाहिजे होता तो संदर्भ मिळाला नाही, पण पुस्तक चाळतांना त्यातील एक उतारा अतिशय आवडला. स्वामी रामदास कृष्णाबाईंना म्हणाले की नाम हे अमृत आहे पण ते सोडून लोक इतर गोष्टींच्या मागे लागतात. श्री सच्चिदानंदांनी पुढे पपांचे वर्णन केले आहे की ते इतके आनंदाने बोलत होते की वाटले आता ते आनंदाने नाचू लागतील. पुढे ते म्हणाले, चालतांना रामनाम, खातांना रामनाम, पितांना रामनाम, बोलायला रामनाम, ऐकायला रामनाम, रामनाम, रामनाम, रामनाम; त्यातच बुडून जावे. मूळ उताराच वाचतो; ऐका.

Papa (to Mataji) : "Ramnam is the nectarine pill. But who knows about it ? Leaving this nectar behind, many go after siddhis which only help them to strengthen their ego. He who was once saying 'I am a householder,' after becoming a Sadhu, says, 'I am a Sannyasi.' In both cases 'I' is there. One who takes to Ramnam becomes so humble, sweet and blissful from the very beginning of his sadhana. But none wants it---.

Papa was speaking this with so much joy that it looked as if he would be dancing about soon.

Continuing he said, Walking, Ramnam; sitting, Ramnam; eating, Ramnam; drinking, Ramnam; talking, Ramnam; hearing, Ramnam; seeing, Ramnam; always, Ramnam, Ramnam, Ramnam. Let us plunge in the nectarine sea of Ramnam. We shall not die by plunging

into that sea. But we will become immortal." (The Gospel of Swami Ramdas by Swami Satchidananda. chapter xxi)

उतारा वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले, मला अगदी असेच श्रीमहाराजांचे सांगणे आठवते. श्री. काशीकरांचा अड्डसष्टावा वाढदिवस होता. जवळ जवळ ह्याच शब्दांत रामनामाचे महत्त्व सांगून श्रीमहाराज म्हणाले, असा रामनामाचा अभ्यास होणे ही खरी वाढ आहे; एरवी वाढदिवस काय कामाचा ? नामाचे महत्त्व सांगून झाल्यावर श्रीमहाराज म्हणाले, मला नामाबद्दल पुढे बोलवत नाही.

**साधक प** : नामाचे खरेपण (Reality) जाणवल्यामुळे असे होते. वैद्य कासेगावकरांच्या आठवणीत असाच प्रसंग दिला आहे. तुम्हाला आणि तुमच्या कुटुंबाला काही सांगायचे आहे म्हणून श्रीमहाराजांनी त्या दोघांना बोलवून जवळ बसवून घेतले आणि एकाएकी त्यांच्या डोळ्यांना पाणी आले आणि सद्गदित स्वरात ते एवढेच म्हणाले, "श्रीरामाच्या स्मरणात राहावे; नाम घ्यावे." Name is Reality. इतर गोष्टी काही प्रमाणात कळतात. जाणीव आहे हेही कळते; पण नामाबद्दल काही कळत नाही. नामाचा दृश्याशी संबंधच नाही. त्याला दृश्याचे काहीच लागू पडत नाही.

**पू. बाबा** : नामाचे ज्ञान तादात्म्यानेच होऊ शकेल. आपण नामासारखे उपाधिरहित होऊ तेव्हांच ते कळेल.

पू. बाबांनी काळाचा मुद्दा उपस्थित केला. ते म्हणाले, काळाचा ओघ आपल्याला समजत नाही. कधीही जावे लागेल याचे भान नाही. ते कसे राहील ?

**साधक ड** : ते राहात नाही खरे! पण इतरांचे देहदु:ख पाहून वाटते की आपले नाम देहदु:खात टिकणार नाही तेव्हां आत्ता देह ठीक असतांना ते घ्यावे. आणि ते इतके घ्यावे की देहदु:ख असतांनाही ते टिकावे.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणाले होतेच की परमार्थाची खरी परीक्षा दारिद्र्य आणि देहदु:खात होते.

आपण नाम हे कर्म समजतो. त्यामुळे फळाची अपेक्षा इत्यादी आलेच. नामाच्या फळाबद्दल, परमार्थाच्या फळाबद्दल आपण उगीच कल्पना करत बसतो. श्रीमहाराज एकदा म्हणाले होते की माझे काम झाले असे जो म्हणेल त्याचे नाम निष्काम होईल. श्री. भाऊसाहेबांचे तसे होते. श्रीमहाराज भेटले;

आता त्यांना आवडते म्हणून नाम घेतो असे वाटले पाहिजे. आपल्याला असे वाटते का?

**साधक क :** असे जरी वाटले नाही तरी काही वेळा आपल्याला श्रीमहाराजांसारखे गुरु लाभले याबद्दल धन्यता वाटते.

**पू. बाबा :** मी अल्पमति. मी श्रीमहाराजांना (पेटीवर) विचारले. 'आपण अशा अवस्थेत आणि या प्रकारे कसे आलात? त्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'कंसाच्या वेळी जशी आकाशवाणी झाली तशीच ही अशरीरी वाणी आहे. ही ईश्वराचीच वाणी होय.' श्रीमहाराजांचे चरित्र लिहून झाले त्यानंतरचा प्रसंग आजही माझ्या डोळ्यांसमोर आहे. त्यावेळी मी म्हणालो की आपल्या देहाची रक्षा जरी कपाळाला लावता आली असती तरी धन्य वाटले असते. हे ऐकून श्रीमहाराजांचा घसा दाटून आला. ते म्हणाले, 'असे कां म्हणता? मी माझा प्राण तुम्हाला दिलेला आहे.' नाम हा त्यांचा प्राण आहे. तो आपण आपल्या प्राणांपलीकडे सांभाळला पाहिजे.

## |२३०| (७ नोव्हेंबर १९९१)

मुक्काम हेब्बळ्ळी.

संध्याकाळी ७ वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो. आज संध्याकाळच्या निरूपणात त्यांनी तुकाराम महाराजांचा अभंग घेतला होता. अभंग असा :

येतील अंतरीं शिष्टाचे अनुभव। तळमळी जीव तया सुखा॥ १॥
आतां माझा जीव घेऊनियां बळी। बैसवावें ओळी संताचिये॥ २॥
विस्तारिली वाचा फळेंविण वेल। कोरडेचि बोल फोस वांझे॥ ३॥
तुका म्हणे आलो निर्वाणाचे वरी। राहों नेदी उरी नारायणा॥ ४॥

निरूपणात पू. बाबा म्हणाले होते की जडामध्ये दृश्याचे ज्ञान द्रष्ट्याला वेगळेपणाने होते. पण शिष्टांना ते तादात्म्याने होते. हा संदर्भ देऊन साधक ब यांनी विचारले की तादात्म्याने होणाऱ्या ज्ञानाचे स्वरूप काय असते? ते विचारांच्या पातळीवरचे असते काय?

**पू. बाबा :** या ज्ञानाला दृश्यातले नियम लागू पडतीलच असे नाही. दृश्यामध्ये दोन आणि दोन, चार होतात; पण येथे ते होतीलच असे नाही. मनाच्या चार पातळ्या सांगता येतील. (१) व्यक्तिगत पातळी. (२) सर्व प्राणिमात्रांची पातळी. (३) होऊन गेलेल्या व पुढे होणाऱ्या जीवांची पातळी

आणि (४) सर्वांना व्यापून राहणारे विश्वमन. तादात्म्याने होणारे ज्ञान हे शेवटच्या म्हणजे विश्वमनाच्या पातळीवरचे असते.

**साधक ब :** visions (दृष्टान्त) वगैरे येतात त्यांची पातळी कोणती?

**पू. बाबा :** शरीराचे जे पंचकोश सांगतात त्यांपैकी तिसऱ्या म्हणजे मनोमय कोशात ही असतात. यामधे कोणाला काही दर्शन होऊन किंवा नाद अथवा शब्द ऐकून ज्ञान होईल. या दृश्याबद्दल किंवा नादाबद्दल अथवा शब्दाबद्दल कोणतीही शंका राहात नाही. तथापि द्रष्टा आणि दृश्य हा भेद राहतोच. दृश्य जगात येणारा हा अनुभव तादात्म्यात नसतो.

खरं सांगू का? या सगळ्या भानगडीत पडण्यापेक्षा सरळ विश्वास ठेवून नाम घ्यावे; गुरुआज्ञा पाळावी. विचाराचा मार्ग कठीण आहे आणि सत्संगती दुर्मिळ आहे. आणि ती मिळाली तरी आपल्याला त्या पातळीवर जाता आले पाहिजे ना? मोठमोठ्यांना ते जमत नाही. सत्संगती पचवणे सोपे नाही.

श्रीमहाराजांचा अनुग्रह घेतलेले एक गृहस्थ आहेत. इथे आले आहेत. त्यांनी विचारले, श्रीमहाराज आईला न सांगता घरातून निघून गेले हे कितपत योग्य होते? त्यांनी आईच्या मनाचा विचारच केला नाही. त्यांचे हे म्हणणे मला आवडले नाही. आपल्या सगळ्या शंका देहबुद्धीतून येतात आणि त्यामुळे आधीच दुबळी असलेली श्रद्धा आणखी डळमळीत होते. महाराजांच्या या वागण्याबद्दल तुम्हाला काय वाटते?

आम्ही काहीच बोललो नाही. इतक्यात श्री. दत्ताण्णा तेथे आले म्हणून पू. बाबा त्यांना म्हणाले, तुम्हीच सांगा, श्रीमहाराज न सांगता घरातून निघून गेले हे कितपत योग्य होते? समर्थ रामदास लग्नमंडपातून पळाले हे कितपत योग्य होते?

श्री. दत्ताण्णाही कॉलेज सोडून घरातून निघून गेले होते. त्यामुळे त्यांचे याबाबतचे विचार ऐकण्यास सर्वजण उत्सुक होते.

**श्री. दत्ताण्णा :** मीराबाईला जेव्हां तिचा दीर त्रास देऊ लागला तेव्हां कृष्णप्रेमाने वेडी झालेल्या मीरेला वृंदावनात जावेसे वाटू लागले. पण ती राजघराण्यातली विधवा! तिचा निश्चय होईना म्हणून तिने संत तुलसीदासांना पत्र लिहून त्यांचा सल्ला विचारला. तिच्या पत्राला उत्तर लिहितांना तुलसीदासांनी म्हटले आहे, ''जाको प्रिय न रामबैदेही। त्यजिये कोटि कोटि बैरीसम जद्यपि परम सनेही॥ पिता त्यजो प्रल्हाद, भरत महतारी। बली त्यजो गुरु'' इत्यादी. तेव्हां ज्याला आत्मोद्धार करून घ्यायचा असेल त्याला अशा त्यागाचा दोष नाही.

'आत्मार्थे पृथिवीं त्यजेत्।'' वैराग्य हे निष्ठुर असते. मी घर सोडून गेलो तेव्हां माझे आईवडील देखील त्यांचा मुलगा म्हणून माझे कर्तव्य मी पार पाडले पाहिजे असे म्हणत होतेच. मी त्यांना म्हणालो, मी आत्मोद्धारासाठी घर सोडले आहे. मी भीक मागून धर्मशाळेत राहिलो तर भिक्षेतला मोठा वाटा तुम्हाला खाऊ घालून मग खाणे हे कर्तव्यपालनच होईल. मी सुखात राहून तुम्हाला कष्ट दिले तर मात्र कर्तव्य न केल्याचा दोष मला लागेल. दुर्गासप्तशतीत सुरुवातीलाच एक कथा आहे. एका राजाला त्याची बायको आणि मुले यांनी घराबाहेर काढले म्हणून तो अरण्यात आला होता. तेथे तशाच अवस्थेत आलेला एक वैश्य त्याला भेटला. परस्परांच्या परिस्थितीबद्दल बोलतांना वाणी म्हणाला की येथे वनात असतांनाही माझ्या बायकोमुलांचे कसे चालले असेल याची मला चिंता वाटते. वास्तविक त्यांनीच याला घराबाहेर काढले होते. अशा स्थितीत त्यांची चिंता हे कर्तव्य नसून उघडच व्यामोह होता. आत्मोद्धारासाठी मुलगा आईला सोडेल किंवा आईला आत्मोद्धाराची तळमळ लागली तर ती मुलाबाळांचा, संसाराचा त्याग करेल आणि तिची ही कृति दोषास्पद म्हणता येणार नाही.

### |२३१| (८ नोव्हेंबर १९९१)

**पू. बाबा :** आज संध्याकाळच्या निरूपणात ब्रह्मानंद महाराजांना अर्जुनापेक्षा मोठे म्हणायचे मी धाडसच केले. पण एका दृष्टीने माझे म्हणणे बरोबर आहे. श्रीमहाराज भेटल्यावर ब्रह्मानंद महाराजांनी आपली सर्व विद्या म्हणजे सर्वस्वच महाराजांना देऊन टाकले. अर्जुनाला काय करू, लढू की नको असा संभ्रम निर्माण झाला. चांगले आणि वाईट हे समाजाचे, संस्कृतीचे देणे आहे. पण सत्य आणि असत्य हे माणसाला आतून समजते. प्राण्यांना देखील काय खावे आणि काय खाऊ नये हे आतून समजते. पण ते फक्त physical level वर (शारीरिक पातळीवर) असते. त्याच्यापुढे ते जात नाहीत.

**साधक ग :** पण मग Ethical values (नैतिक मूल्ये) कशा ठरतात?

**पू. बाबा :** Ethical values च्या बाबतीत देखील कांट, ब्रॅडले वगैरे म्हणतात त्याप्रमाणे तीन प्रकार सांगता येतील (१) Idealists म्हणजे चिद्वादी किंवा अध्यात्मवादी (२) Sensate संवेदनवादी किंवा दृश्यवादी आणि (३) Ideo-ethical (अध्यात्म-नीतिवादी)

प्रत्येक संस्कृतीचा मूळ गाभा (Major premise) असतो. भारतीय संस्कृती दृश्यापलीकडे पाहते, म्हणून फक्त पहिला प्रकार पूर्ण आहे. बाकीचे

दोन अपूर्णच राहतात. Sensate दृश्यापलीकडे जात नाहीत. संस्कृती सामान्यत: पहिल्या दोन प्रकारांत आंदोलित होते. काही वेळा पहिल्या प्रकाराचा तर काही वेळा दुसऱ्याचा पगडा असतो. बुद्धाने Ideo-ethical प्रकारातील नीतीवर भर दिला आहे. पण असे करतांना आपण Reality पर्यंत पोचत नाही. केवळ ethical values समाधान देऊ शकत नाहीत असे डॉ. राधाकृष्णननी त्यांच्या याविषयीच्या निबंधात म्हटले आहे. मनुष्य चांगला म्हणजे नीतिमान असला तरी समाधानी असेलच असे नाही. समाधान केवळ भगवंत देईल असे श्रीमहाराज म्हणत. तथापि हे म्हणणे त्यांनी विस्ताराने सांगितलेले नाही.

**साधक क :** धर्माशिवाय नीति पोरकी आहे असे श्रीमहाराज म्हणत.

**पू. बाबा :** प्रख्यात बोलिंजर केस तुम्हाला माहीत आहेच. अपंग लहान मुलाला डॉक्टरनी मारले ते योग्य की अयोग्य? मनूंनी एक उदाहरण दिले आहे. तुम्ही उभे आहात त्या रस्त्यातून एक गाय गेली आणि कसायाने येऊन ती कोणीकडे गेली म्हणून तुम्हाला विचारले तर काय करावे? मनु म्हणतात की अशा वेळी वेड्यासारखे वागावे. श्रीमहाराज म्हणत की अशा वेळी मूर्खासारखे वागावे, काही तरी निरर्थक बडबडावे - talk nonsense. स्वातंत्र्यवीर सावरकरांनीही एक उदाहरण दिले आहे. एका घरात बरीच माणसे झोपलेली आहेत आणि तेथे एक साप शिरला तर त्याने तुमचा काहीही अपराध केलेला नसतानाही त्याला मारणेच योग्य ठरते. प्रत्यक्ष युद्धाला रणभूमीवर येऊन उभा राहिल्यावर अर्जुनाला मोह झाला. नातलगांना मारावे लागणार हे बुद्धीच्या पातळीवर त्याला माहीत होतेच. पण ते दृश्य समोर पाहून केवळ कल्पनेने तो व्यथित झाला.

**साधक ग :** युद्धापूर्वी धृतराष्ट्राने संजयाला युधिष्ठिराकडे पाठवून युद्ध टाळण्यासाठी जो युक्तिवाद केला होता त्याचाच हा impact (आघात) होता. ब्रह्मानंद महाराज ब्राह्मण होते. त्यांना त्याग साहजिक होता. पण अर्जुन क्षत्रिय होता. लढणे हाच त्याचा धर्म होता; म्हणून मी नीतीचा प्रश्न काढला.

**पू. बाबा :** Reality पुढे सर्व तुच्छ आहे. 'देव जोडे तरी करावा अधर्म' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. मी एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की सर्व जग नियमाने चालते. भगवंताचे आणि सत्पुरुषांचे जीवन देखील नियमाने बद्ध असलेच पाहिजे. यावर श्रीमहाराज जरा कडकपणे म्हणाले, 'हे सर्व विचार तुमच्या अति शहाणपणातून येतात. सत्पुरुषांना किंवा भगवंताला कसले

नियम आले आहेत?' भगवंत आणि सत्पुरुषांप्रमाणे आपल्या गुरूंबद्दल कोणी काही बोलू लागले तर ते ऐकून घेऊ नये. त्याबाबतीत कोणताही **compromise** (तडजोड) असतां कामा नये.

## |२३२| (९ नोव्हेंबर १९९१)

**पू. बाबा :** श्रीमहाराजांना एकदा विचारले की ब्रह्मानंद महाराज आणि आनंदसागरांप्रमाणे पूर्णतेला पोचलेले त्यांचे एकूण किती शिष्य होते? तेव्हां त्यांनी सांगितले की त्यांचे तेरा शिष्य पूर्णतेला पोचले. तथापि पहिल्या दोहोंप्रमाणे इतर प्रकाशात आले नाहीत.

पू. बाबांना ते श्रीमहाराजांकडे कसे आले म्हणून विचारले तेव्हां ते म्हणाले, मी मुंबईला आलो तेव्हां लोकांचे माझ्याबद्दल चांगले मत नव्हते, कारण दोन वेळा मी घरातून पळून गेलो होतो. त्यामुळे मीही लोकांना टाळत असे. माझ्या संगतीने त्यांची मुले बिघडतील असे लोकांना वाटत असे. पण श्रीमहाराजांकडे (पू. तात्यासाहेबांकडे) आलो त्या दिवशीच त्यांनी इतके प्रेमाने वागवले आणि वेळ मिळाला की इकडे यावे म्हणून इतके आवर्जून सांगितले की मी विरघळलो आणि त्यांना चिकटलो.

श्रीमहाराजांनी मला सांगितले की लोकांना नामाला लावावे. तेव्हां मी म्हणालो की पण माझा तसा अधिकार नाही. मी लोकांना काय सांगू? यावर श्रीमहाराज म्हणाले, तुम्ही तुमचे काम करा; बाकीचे सगळे मी पाहीन.

## |२३३| (१५ नोव्हेंबर १९९१)

मालाड.

सुरुवातीचा काही वेळ हेबळ्ळीचे वातावरण उपासनेला कसे अनुकूल आहे यासंबंधी बोलणे झाले. पू. बाबा म्हणाले की तेथे त्यांना फार प्रसन्न वाटले. दोन वर्षांपूर्वी ते गेले होते तेव्हां जप करण्यासाठी पादुकांजवळ जाऊन बसले होते तेव्हां आणि नंतर पादुकांची पूजा करतांना त्यांची तंद्री लागली होती. यावेळी मात्र खोलीत बसून जप करतांनाही तशी तंद्री लागत होती. इतक्या लोकांचे एकसारखे येणे जाणे चालू असूनही अखंड नामस्मरण झाले असे ते म्हणाले. ते म्हणाले की ते ठिकाण येथून थोडे लांब आहे. पण तुम्ही मंडळी मुद्दाम तेथे चार-आठ दिवस जपासाठी जा. तेथे साधनाची तीव्र स्पंदने

आहेत. अतिशय पवित्र ठिकाण आहे. आज तुमच्यासाठी श्रीमहाराजांचे एक वचन काढून ठेवले आहे. वचन असे :

"(एक) 'महाराज! आपली भेट झाली, आतां मला कांहीं करायचं उरलं नाही' असं म्हणणारा मनुष्य मला सर्वांत आवडतो. त्याचं कर्तेपण गेल्यामुळें त्याची काळजी मला लागते. तो सर्वांत नंबर पहिला."

"(दोन) मी सांगितलेलं नाम तेवढं मनापासून घेतो तो नंबर दोन. त्याला स्वस्थपणें चैन पडत नाहीं, कांहींतरीं करावेसें वाटतें. म्हणून मी त्याला नाम घ्यायला सांगतो."

"(तीन) मी सांगितलेलं नुसतं नाम न घेतां जो कमी किंवा जास्त कांहींतरी करतो, तो अगदी हीन प्रतीचा होय."

वचन वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले की यांपैकी कोणत्या प्रकारात आपण आहोत ते तुम्हीच ठरवा.

**साधक ब व ड (एकदम)** : उघडच आहे. पहिल्या दोन्हींचा विचारच नको!

**साधक ज** : तिसऱ्याच्या खाली प्रकार सांगितलेला नाही म्हणून तिसरा म्हणायचे!

**पू. बाबा** : होय; महाराजांनी त्याला हीन प्रतीचा म्हटलेलं आहे. असं कां होतं? श्रीमहाराजांनी नाम दिलेलं आहे ते तसं न घेतां श्वासावर कसे घ्यावे, बैठक कोणती असावी इत्यादी काहीतरी जोड देण्याचा आपण प्रयत्न करतो कारण नामस्मरण हे आपल्या दृष्टीने एक कर्म आहे.

**साधक प** : जे खरे निरुपाधिक आहे त्याला आपण उपाधी लावतो कारण उपाधींशिवाय आपल्याला जगताच येत नाही.

**साधक ग** : नाम पूर्ण आहे हे आपल्याला कळलेलं नाही, आणि महाराजांनी सांगितलेलं आहे ना, मग तेवढं करायचं अशी निष्ठा नाही त्यामुळे आपण नामाला काहीतरी जोड द्यायचा प्रयत्न करतो. ती जोड दिली की नामस्मरण चांगले होईल असे आपल्याला वाटते.

**साधक ब** : पण अशी जोड देऊनही त्यांची इच्छा असेल तेव्हांच चांगले जमते हेही लक्षात येते.

**साधक प** : मला वाटते, नाम घेणारा जो मी आहे त्या मी कडे वेगळेपणाने पाहता आलं तर पुष्कळसा गुंता सुटेल. उदाहरणार्थ, मुलगा किंवा मुलगी

परीक्षेत नापास झाली तर जो राग येतो त्याकडे आपण वेगळेपणाने पाहू शकतो आणि त्यामुळे तो राग कमी होतो, तसे स्वतःच्या अपयशाकडे, यशाकडे, कशाकडेही म्हणा वेगळेपणाने पाहता आले पाहिजे.

**पू. बाबा :** नाम घेण्यापेक्षा नामस्मरण झाले पाहिजे आणि त्यासाठी माझे जीवन त्यांच्यावर अवलंबून आहे, माझे कर्तेपण नाहीच असे वाटले पाहिजे; म्हणजे जीवनातल्या बऱ्यावाईट घटनांनी जिवाची जी उलघाल होते ती होणार नाही. काहीही झाले तरी ते श्रीमहाराजांनी केलेले आहे आणि ते बरोबरच असणार अशी वृत्ती निर्माण होऊन नामस्मरणाकडे लक्ष लागेल. आज चिंता, काळजी, भय यांनी आपण जे वाहवत जातो तसे होणार नाही.

**साधक प :** मला वाटते की जगात जी शक्ती आहे त्या शक्तीशी आपण जोडलेले आहोत ही जाणीव झाली म्हणजे चिंता, भीती इत्यादी नाहीशी होतील. शास्त्रज्ञांनी आता प्रयोग करून सिद्ध केले आहे की समूहाला मन असून त्या मनातून विचारांचे संक्रमण होते. उदाहरणार्थ, माकडांचा एक समूह (टोळी) घेतला आणि त्यांना काही गोष्टी शिकवल्या तर जगातल्या दुसऱ्या भागातील त्या जातीच्या माकडांचा समूह त्या गोष्टी लवकर शिकतो. किंवा उंदरांच्या एका समूहाला विशिष्ट प्रकारच्या पिंजऱ्याचे खटके उघडून पुढे कसे जायचे हे माहीत झाले तर त्यांच्याशी संबंध नसलेल्या, जगातील दुसऱ्या कोणत्याही उंदरांच्या समूहाला ती गोष्ट पटकन करता येते. म्हणजे जगात एक माकडपण (Monkeyness) अथवा उंदीरपण (Ratness) म्हणून जे आहे त्यामध्ये या ज्ञानाचे संक्रमण होते. म्हणून एखादा सत्पुरुष जरी पूर्णतेला पोहोचला तरी त्याचा फायदा सगळ्या जगाला मिळतो. तो जगाकरिता काही करत नाही असे दृश्यात वाटले तरी ते तसे नसते.

**साधक ज :** तुम्ही म्हणता ते माकडांच्या किंवा उंदरांच्या बाबतीत खरे असेल; पण माणूस स्वतंत्रपणे विचार करणारा असल्यामुळे तो सत्पुरुषांच्या विचारांना अडथळे निर्माण करतो. त्यामुळे माणसांवर सत्पुरुषांच्या ज्ञानाचा विशेष परिणाम होत नसावा.

**साधक ग (पू. बाबांना) :** आपण मागे मेंढ्यांवर केलेल्या एका प्रयोगाची हकिगत सांगितली होती. मेंढ्यांवर विचारांचा आघात करून त्यांना गरीब किंवा रागीट बनविले होते. (पहा संवाद क्र. २२३)

**साधक प :** एखादे माकड किंवा एखादा उंदीर नवीन गोष्ट शिकला तर जगातील सगळी माकडे किंवा सगळे उंदीर ती गोष्ट शिकणार नाहीत.

त्यासाठी विशिष्ट संख्या (critical number) पाहिजे. ॲटम बॉम्बसाठी देखील विशिष्ट वस्तुमान (critical mass) लागते. आपण जगाकडे पाहतो तेव्हां हे दृश्य जग ज्ञात करून देणारा कोणता तरी प्रकाश आपल्या मेंदूमागे आहे हे आपल्या लक्षात येत नाही. त्या प्रकाशाची जर जाणीव झाली तर मी खरे नामस्मरण करत नाही हे सहजच समजेल.

**पू. बाबा :** बरोबर आहे. डोळ्यांना जग दिसत असले तरी त्या जगाला सूर्य प्रकाशित करतो त्याप्रमाणे आत राहणारा आत्मा सर्व काही प्रकाशित करतो हे समजले की कामच झाले.

**साधक प :** बाहेर असलेली दृष्टी आत वळली पाहिजे. मग दृश्य जग आहे तसेच राहील पण त्याचा अर्थ बदलेल.

**साधक म :** ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे की "मावळवीत विश्वाभासु। नवल उदयला चंडांशु।" विश्वाचा भास नाहीसा होईल.

**साधक प :** नाथभागवताच्या ११व्या अध्यायात भक्ताची लक्षणे दिलेली आहेत. देहात असूनही तो देहातीत असतो आणि कर्म करूनही त्याचे कर्तेपण त्याच्याकडे नसते. यालाच नाथांनी अकर्तात्मयोग म्हटले आहे.

**साधक ज :** नामस्मरण करतांना संकल्प विकल्प नाहीसे होणे महत्त्वाचे आहे.

**साधक ब :** साधक प म्हणतात त्याप्रमाणे आतल्या प्रकाशाची जाणीव व्हावयाला स्वत:कडे वेगळेपणाने पहाता आले पाहिजे.

**पू. बाबा :** मला वाटते, यापेक्षा भक्ताची दृष्टी किंवा भूमिका जास्त चांगली. माझ्या जीवनात जे काही घडते ते तू करतो आहेस. आज मला ते सहन होत नाही पण ते योग्यच आहे असे वाटले पाहिजे.

**साधक ग :** ही वृत्ती बनण्याआधी अशी एक पायरी येईल की, महाराज! मला अमुक पाहिजे, ते तुम्ही मला द्या. त्यासाठी कदाचित मी लायक नसेन; पण तरीही ते पाहिजे म्हणून तुमच्याजवळ रडेन; दुसरीकडे जाणार नाही आणि दिले नाहीत तरी तुम्हाला दोष देणार नाही. हीच निष्ठा.

**साधक ब :** निष्ठा असेलच असे नाही. कदाचित इतर अनेक उपायांप्रमाणे महाराजांकडे मागणे हा एक उपाय असेल. खरी निष्ठा ही ज्याची त्यालाच तपासावी लागेल. आणि त्यासाठी स्वत:कडे वेगळेपणाने पहावे लागेल.

**पू. बाबा :** साधक ग म्हणतात ते थोडे खरे आहे. पूर्ण निष्ठा निर्माण होण्याआधी मागेन ते श्रीमहाराजांजवळच अशी पायरी येईल. पूर्ण निर्वासन होणे ही शेवटची अवस्था आहे आणि मग आत्मानुभव दूर नाही.

## |२३४| (२२ नोव्हेंबर १९९१)

**पू. बाब :** हेबळ्ळीला श्री. दत्ताण्णा मला म्हणाले की मी येथे हा इतका व्याप करतो आहे पण अजूनही मला श्रीमहाराजांचे होता आले नाही. सर्व व्याप श्रीमहाराजांच्या सत्तेने चालू आहे याची त्यांना जाणीव आहे; पण तरीदेखील ही अपूर्णता आहेच. महाराजांचे होणे म्हणजे काय? प्रथम श्रीमहाराजांनी याबाबतीत काय म्हटले आहे ते वाचतो.

''मला वाटतें की तुम्ही माझें झाल्याशिवाय मला तुमचें होतां येणार नाहीं. तरी तुम्ही माझें व्हा.''

माझे व्हा म्हणजे काय ते पुढे सांगतात :

''नामाला न विसरतां माझी आठवण सार्वत्रिक ठेवणें यालाच माझें होणें म्हणतात.''

आपण अनुग्रह घेतला तेव्हांच त्यांनी आपल्याला त्यांचे म्हटले आहे, पण आपल्याला त्यांचे कां होता येत नाही? आपल्याला तसे वाटल्याशिवाय ते आपले आहेत हे समजणार नाही. आपल्याला sense of belonging (त्यांचे आहोत हा भाव) कां येत नाही?

**साधक ग :** मला वाटते, आपल्याला पूर्णपणे कोणाचे तरी होणे माहीतच नाही. नोकरी करतो त्या ठिकाणी हे माझे ऑफिस म्हटले तरी ते सर्वस्व आहे असे वाटत नाही. किंवा अगदी प्रपंचातही बायको मुले म्हटले तरी ते सर्वस्व वाटत नाही. त्यांच्याही पलीकडे आपण असतोच.

**पू. बाबा :** हे खरं का? आपल्याला दुसऱ्याचे होणे माहीत नाही का?

**साधक ड :** दुसऱ्याचे होणे माहीत असले तरी पूर्णपणे दुसऱ्याचे होणे माहीत नाही.

**पू. बाबा :** बरोबर आहे. पूर्णत्व नसल्यामुळे खरी निष्ठा निर्माण होत नाही. पण आपल्याला हे कां करता येऊ नये?

**साधक ब :** मी कर्ता हा भाव जात नाही तोपर्यंत त्यांचे होता येणार नाही.

**पू. बाबा :** म्हणजे काय हो! मी नाहीसा झाल्याखेरीज त्यांचे होता येणार नाही. एक जुनी गोष्ट आठवली ती सांगतो. श्री. भीमराव गाडगुळी एकदा गोंदवल्याला गेले होते. तेथून परतण्यापूर्वी ते श्रीमहाराजांना नमस्कार करायला आणि त्यांची आज्ञा घ्यायला गेले. दुसऱ्या दिवशी कोर्टात केस असल्यामुळे

लगेच निघणे जरूरीचे होते, पण श्रीमहाराज त्यांना निरोप देईनात. त्यामुळे ते काहीसे बेचैन झाले. शेवटी सुमारे तीन-चार तासांनी 'अरे, तुम्हाला जायचं आहे नाही का! म्हणून श्रीमहाराजांनी त्यांना निरोप दिला. गाडी गेलेलीच असणार तथापि दुसरी कोणती गाडी आहे का पाहू म्हणून ते कोरेगाव स्टेशनवर गेले आणि त्या दिवशी नेहमीची गाडी चार तास उशीरा आली. त्यामुळे वेळेवर गदगला पोचून दुसऱ्या दिवशी ते कोर्टात जाऊ शकले.

त्यावेळी झालेल्या मनाच्या अस्वस्थतेबद्दल पुढे एकदा त्यांनी श्रीमहाराजांना असे कां झाले म्हणून विचारले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, याचे कारण मी तुमचा झालो असलो तरी तुम्ही अद्यापि माझे झाला नाहीत. ते काही बोलले नाहीत पण नंतर त्यांनी त्यांच्या चुलत्यांना - ब्रह्मानंद महाराजांना श्रीमहाराजांचे होणे म्हणजे काय आणि ते कसे व्हायचे असे विचारले. ब्रह्मानंद महाराज म्हणाले, 'मी' नाहीसा झाल्याखेरीज 'त्यांचे' होता येणार नाही. म्हणून प्रथम मी नाहीसा झाला पाहिजे. माझी इच्छा अशी वेगळी राहताच कामा नये. त्यांची इच्छा तीच माझी इच्छा.

पू. बाबा म्हणाले, याचाच अर्थ असा की कर्म राहील पण त्यापासून अमुक फळ मिळेलच किंवा मिळावे ही आशा राहणार नाही. मी कर्म केले; आता ते करतील ते खरे - नव्हे घडेल ते बरोबरच असे वाटले पाहिजे. महाराज माझे व्हा म्हणून सांगतात आणि माझे होणे म्हणजे काय तेही सांगतात. माझी आठवण सार्वत्रिक ठेवणे यालाच माझे होणे म्हणतात.

**साधक प** : त्या आधी त्यांनी नामाला न विसरतां माझी आठवण सार्वत्रिक ठेवणे असे म्हटले आहे. इतके नामाला महत्त्व आहे.

**साधक ब** : नामाला महत्त्व आहेच; पण ते मी घेतो हा मीपणा गेला पाहिजे. नामस्मरण करीत नाही आणि महाराजांची आठवण आहे या म्हणण्याला काही अर्थ नाही; कारण नाम आणि महाराज वेगळे नाहीत. नामातच ते आहेत.

**पू. बाबा** : पण आपल्याला तसे वाटते का? आणि आठवण सार्वत्रिक ठेवणे म्हणजे काय?

**साधक ज** : सार्वत्रिक म्हणजे सर्व ठिकाणी आणि सर्वकाळ. श्रीमहाराजांच्या आठवणीला स्थळकाळाचे बंधन नाही.

**साधक ड** : त्याचप्रमाणे अवस्थेचेही बंधन नाही. तीन्ही अवस्थांत ती राहणे हा आदर्श आहे.

**पू. बाबा :** म्हणजेच ती आठवण स्थलकालाच्या पलीकडे गेली पाहिजे. असे झाले तर मी राहणारच नाही. मग कोणी कोणाचे व्हायचे? नामस्मरण कसे व्हावे हे सांगतांना श्रीमहाराज प्रल्हादाचे उदाहरण देत असत. भागवतात प्रल्हादाबद्दल म्हटले आहे की

आसीन: पर्यटन्नश्नन् शयान: प्रपिबन् ब्रुवन्।
नानुसन्धत्त एतानि गोविन्दपरिरम्भित:॥७-४-३८॥

परिरम्भित: म्हणजे सर्व बाजूंनी वेढला गेलेला. भगवंताने सर्व बाजूंनी वेढलेल्या (आलिंगन दिलेल्या) त्या प्रल्हादाचे बसणे, फिरणे, खाणे, निजणे, पिणे, बोलणे इत्यादी क्रियांकडे लक्षच नसे; इतका तो भगवत् चिंतनात स्वत:ला विसरून जात असे. पण काय हो! हे शक्य आहे का? शक्य असणारच. त्याशिवाय श्रीमहाराजांनी सांगितलेच नसते. पण हे कसे जमावे?

**साधक प :** मला पूर्णपणे कोणाचेही होता येत नाही असे साधक ग म्हणतात पण ते तितकेसे खरे नाही. मी माझ्या देहाचा आहे ना! त्याचा मला विसर पडत नाही. महाराजांचे होण्यासाठी देहाशी असलेले तादात्म्य नाहीसे झाले पाहिजे हे उघड आहे.

**साधक ज :** देहापेक्षाही मी वासनांचा आहे. वासना गेल्याखेरीज त्यांचे होता येणार नाही.

**साधक ब :** आपला जन्मच वासनांतून आहे. मी देहाचा आहे म्हणणे काय आणि वासनांचा आहे म्हणणे काय, दोन्ही एकच आहे. देहबुद्धी कमी व्हावी म्हणून नामस्मरण सांगितले आहे. आज जरी ते देहबुद्धीतून होत असले तरी तेच आपल्याला देहबुद्धीच्या बाहेर नेईल.

**साधक ड :** सार्वत्रिक आठवण ठेवायची ती नामाची की श्रीमहाराजांची? ते सर्वव्यापी आहेत हे समजायचे कसे?

**साधक प :** नामाची किंवा श्रीमहाराजांची आठवण एकच. महाराज म्हणजे नाम आणि नाम म्हणजे महाराज.

**साधक ड :** तथापि नामापेक्षा महाराजांची आठवण ठेवणे सोपे आहे; अर्थात तेही तसे सोपे नाहीच.

**साधक ग :** शेवटी नामच खरे असले तरी आज श्रीमहाराज जास्त खरे वाटतात. तथापि नामाची आठवण अशासाठी की ते सर्वव्यापी आणि सर्वशक्तिसमन्वित आहे. तेच श्रीमहाराज आहे.

**पू. बाबा :** बरोबर आहे.

**साधक प** : श्रीमहाराज सर्वत्र आहेत म्हटले तरी गोंदवल्याला किंवा हेबळ्ळीला त्यांचे अस्तित्व जास्त जाणवते. साधन करणारी पुष्कळ माणसे जमलेली असल्यामुळे एकूण वातावरण त्यांच्या अस्तित्वाचा भाव जागृत करणारे असते. श्रीरामकृष्णांनी एक छान उदाहरण दिलेले आहे. ते म्हणाले, गाईच्या सगळ्या शरीरातून दूध येते. तथापि ते मिळते मात्र तिच्या आचळातून. तसे श्रीमहाराज सर्वत्र असले तरी तेथे जास्त जाणवतात.

**सर्वजण** : वा! फार छान उदाहरण आहे.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांचे होण्यासंबंधी त्यांचे हे आणखी एक वचन पहा. ''माझे होणे म्हणजे मी सर्वत्र आहे हें ओळखून जगात व्यवहार करणें.'' ज्याला त्यांचे होता आले त्याची स्थिती कशी असेल? व्यवहारातील सर्व कर्मे तो करीलच पण ती करतांना त्याच्या मनाची अवस्था काय असेल?

**साधक प** : त्याची काळजी नाहीशी होईल. सर्व घडते ते त्यांच्या इच्छेने म्हटल्यावर काळजीचे कारणच नाहीसे झाले. मी करतो; मी अपूर्ण असल्याने माझे कर्मही अपूर्ण आहे. त्यामुळे काळजी उत्पन्न होते.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. महाराजांनी पुढे म्हटलेच आहे - ''मी तुम्हाला एकच सांगतो की तुम्ही माझे झाला आहात. तुम्हाला कसली काळजी करण्याचे कारण नाही.'' ते म्हणत की तुम्ही श्रीमंत बापाची मुले आहात; तुम्हाला काळजी करण्याचे कारण नाही. पण आपल्याला आपण त्यांची मुले आहोत असे वाटत नाही ना! तीच तर पंचाईत आहे. बरे, नाही म्हणावे तर त्यांनी सांगितलेले नामस्मरण करतो. मग त्यांचे का होता येत नाही?

**साधक प** : देहबुद्धी हेच कारण आहे. ती विचाराने आणि साधनाने कमी करावी लागेल. काळजी कमी करावी लागेल.

**साधक ब** : तसे पाहिले तर खास अशी कसली काळजी नसते.

**साधक प** : काळजी नाही म्हणता कारण आता सगळे ठीक आहे. आत्ता हात हलवता येतो आहे पण पुढच्या क्षणी हलेनासा झाला तर? काहीही होऊ शकते. स्टेशनवरून चालत घरी जाऊ असे वाटते पण तसे होईलच अशी खात्री आहे का?

**साधक ग** : काही मर्यादेपर्यंत आपले कर्तृत्व वाटते आणि त्यापलीकडे महाराज, तुम्ही करा असे आपण म्हणतो.

**पू. बाबा** : हा अहंकार गेला पाहिजे. माणूस जितका मोठा तितका त्याचा अहंकार जास्त.

**साधक ग :** तथापि प्रत्येकाला बुडवायला पुरेसा अहंकार त्याच्याजवळ असतो असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे.

**पू. बाबा :** हा अहंकार सुटल्याशिवाय त्यांचे होता येणार नाही. हे कसे घडायचे ?

**साधक क :** विचारापेक्षा हे भक्तीने सोपे होईल.

**साधक भ :** (पू. बाबांना) तुम्हीच सिमॉन दी बोव्हाच्या The Second sex मधील उदाहरण दिले होते. त्याला जे जे आवडते ते ते सर्व तिला आवडते हे सांगून तिने म्हटले आहे की She is he ! तसे करायला हवे. विचार, भावना, कल्पना, सर्व काही श्रीमहाराजांवर केंद्रित केले तर त्यांचे होणे सोपे जाईल. श्री. भाऊसाहेबांसारखे पाहिजे. नाम त्यांना आवडते म्हणून घेतो. म्हणजे त्यांच्या लेखी नामाला तशी वेगळी किंमत नाही. त्यांना आवडते ते खायचे, त्यांना आवडते ते पांघरायचे म्हणजे सर्व जीवन त्यांना दिल्यासारखेच आहे.

**पू. बाबा :** हे बरोबर आहे. ही शरणागतीच आहे. मी नाहीसा होणे आणि शरण जाणे, दोन्ही एकाच वेळी होतात. श्रीमहाराज म्हणत, "भाविकपणें जो मला शरण आला तो माझ्या भावाप्रमाणें मी मानतो - म्हणजे मी व तो यांत अंतर राहात नाहीं." तथापि त्याचबरोबर लगेच त्यांनी नामाचे महत्त्वही सांगितले आहे. ते म्हणतात, "मला वाटतें तुम्ही माझें आहात, पण तुम्हाला हें ठाऊक असले पाहिजे की तुम्ही माझे असला तरी नामाला विसरून चालणार नाही." ज्याला श्रीमहाराजांचे होता आले त्याची अवस्था काय असेल ?

**साधक ड :** तो शांत होईल.

**साधक प :** आपल्याला खरी शांती माहीतच नाही. ती शांतता येण्यापूर्वी काळजी नाहीशी होईल आणि सर्व मनोव्यापार श्रीमहाराजांनी भरून जातील.

**पू. बाबा :** हे जमले पाहिजे. करत रहा. निराश होऊन चालणार नाही. हा एक चॅलेंज आहे.

पू. बाबांनी नंतर आणखी तीन वचने वाचून दाखवली. ती अशी :

"नामाला मी माझा प्राण समजतो."

"नामाशिवाय वेळ फुकट घालविणे म्हणज माझी अवज्ञा करणें आहे."

"तुम्ही माझे झालात म्हणजे मला वाटतें की तुम्ही व मी दोघे एकत्र राहू."

**।२३५।** (२९ नोव्हेंबर १९९१)

पू. बाबांच्या उजव्या पायाच्या अंगठ्याला काही दिवसांपूर्वी जखम झाली होती. अजून पट्टी बांधलेली आहे म्हणून चौकशी केल्यावर ते म्हणाले की जखम भरली आहे पण धूळ आणि पाणी लागू नये म्हणून पट्टी बांधली आहे. उजव्या पावलावरची सूजही कमी झाली आहे.

**पू. बाबा :** कृष्णमूर्तींचे Meeting Life नांवाचे एक पुस्तक अलिकडेच प्रसिद्ध झाले आहे. त्यात पृष्ठ ६२-६३ वर on Meditation म्हणून भाग आहे तो तुम्हाला वाचून दाखवतो; पण त्यापूर्वी एक जुनी हकिगत आठवली ती सांगतो. खारच्या रामकृष्ण मिशनमधील गुणातीतानंद नांवाचे एक तरुण संन्यासी श्रीमहाराजांना भेटायला आले होते. स्वामी विरजानंदांनी त्यांना संन्यास दिला होता. पूर्वाश्रमात गुणातीतानंदांनी M. A. (Philosophy) ला फर्स्ट क्लास मिळविला होता. ते असो. श्रीमहाराजांनी गुणातीतानंदांना नांव विचारल्यावर ते म्हणाले, मी आता संन्यासी आहे. (भावार्थ पूर्वजीवनाशी व नांवाशी संबंध राहिलेला नाही) पुढे बोलण्याच्या ओघात त्यांनी श्रीमहाराजांच्या नांवगावाची चौकशी केल्यावर श्रीमहाराज म्हणाले की लक्षात असूनही आपण पूर्वाश्रमीचे नांव सांगत नाही तर ज्याला दृश्याचा विसर पडला आणि जो आता देहातही नाही तो मी कोण हे कसे सांगणार? श्रीमहाराज बोलण्यात चतुर होते ते असे! नंतर श्रीमहाराजांनी त्यांना साधन काय करता म्हणून विचारले तेव्हां ते नामस्मरण करतो म्हणाले. किती वेळ म्हणून विचारल्यावर सोयीने होईल तेवढे करतो म्हणाले. यावर श्रीमहाराज म्हणाले, परमार्थ सोयीचा नाही, बाकी सगळे व्याप करून वेळ मिळाला तर नामस्मरण करेन असे म्हणून कसे चालेल? त्याची निकड लागली पाहिजे.

पुण्याला एक गृहस्थ श्रीमहाराजांना म्हणाले की मी सवड मिळेल तेव्हां नाम घेतो. तेव्हां श्रीमहाराज उसळून म्हणाले, नाम घेणेच महत्त्वाचे आहे आणि आपण ते सवडीवर ठेवले आहे. श्रीमहाराजांनी गुणातीतानंदांना आपण नामस्मरण कशासाठी करता म्हणून विचारल्यावर ते म्हणाले, शांतीसाठी - माझ्या गुरूंनी सांगितले आहे की परमार्थात शांती मुख्य आहे. मनावर कोणतेही तरंग न उठता ते शांत राहिले पाहिजे कारण खरी शांती मनाच्या पलीकडे गेल्यावरच आहे. विरजानंदांचे वागणेही शांत होते. आजूबाजूला

कितीही कोलाहल चाललेला असतांनाही ते शांत असत. सत्पुरुषांचे शरीर देखील थंड असते. श्रीमहाराजांची पावले नेहमी थंड असत. असे कां होते?

**साधक प :** रक्ताभिसरण हळू होते आणि रक्तदाबही कमी होतो.

**साधक ग :** संताप आला की शरीर तापते आणि रक्तदाबही वाढतो. याउलट मनुष्य शांत झाला की शरीर थंड होते आणि रक्तदाबही कमी होतो.

**पू. बाबा :** बरोबर आहे. मनुष्य शांत झाला की तो स्वत:कडेही साक्षीभावाने पाहू लागतो. आता कृष्णमूर्ती काय म्हणतात पहा. त्यांना एका श्रोत्याने विचारले की तुम्ही नेहमी Meditation वर भर देता, पण त्याचा अर्थ काय? डिक्शनरीत contemplation, deep thinking असे अर्थ दिलेले आहेत. विचार शब्दाशिवाय होऊ शकत नाही, तेव्हां आपणांस नेमके काय म्हणायचे आहे? कृष्णमूर्ती म्हणाले की तुम्ही त्रयस्थपणे - साक्षीभावाने स्वत:च्या मनाकडे, विचारांकडे पहा. असे पाहतानाच तुम्हाला विचारशून्य अवस्था प्राप्त होईल. Meditation is emptying the mind. विचारशून्य अवस्थेत साक्षीभावाने स्वत:कडे पहात राहणे म्हणजेच Meditation. काय हो! हे शक्य आहे का? आणि हे कसे करायचे? मनातले सर्व विचार बाजूला कसे सारायचे?

**साधक प :** यासाठी प्रथम स्वत:च्या मनाकडे पाहता आले पाहिजे.

**साधक ग :** मन निर्विचार करण्यापेक्षा त्यात नामाचा विचार टिकवणे चांगले नाही का?

**पू. बाबा :** पण ते तरी कसे करायचे?

**साधक ग :** उदाहरण देऊन सांगायचे तर असे म्हणता येईल की एका भांड्यात पाणी आहे (प्रापंचिक विचार) आणि ते पाणी काढून त्या भांड्यात दूध (नामाचा विचार) ठेवायचे आहे. हे दोन प्रकारांनी करता येईल. एक म्हणजे भांड्यातले पाणी ओतायचे म्हणजे कृष्णमूर्ती म्हणतात तसे मन निर्विचार करायचे आणि मग त्यात दूध भरायचे. माझ्या मते हा बलवानांचा मार्ग आहे. दुसरा प्रकार म्हणजे भांड्यातील पाण्यातच दूध ओतायला सुरुवात करायची म्हणजे दूध मिसळलेले पाणी भांड्यातून बाहेर सांडू लागेल. हळूहळू भांड्यातील पाण्याचे प्रमाण कमी होऊन दुधाचे प्रमाण वाढू लागेल आणि शेवटी भांड्यात फक्त दूध राहील. मन निर्विचार करणे कठीण आहे म्हणून त्यामध्ये नाम इतके ओतावे की शेवटी मनात नामाखेरीज दुसरा विचारच राहणार नाही.

**साधक प :** उदाहरण म्हणून हे ठीक आहे. पण मनाच्या बाबतीत असे घडेलच असे नाही. कदाचित काही विचार, विकार दबून राहतील आणि संधी मिळाली की पुन्हा उफाळून बाहेर येतील. मनाचे व्यापार मोठे गुंतागुंतीचे आहेत.

**पू. बाबा :** होय, हे खरे आहे. नामात रंगून गेलेल्या संतांना देखील स्मृती असतेच.

**साधक प :** होय, पण त्या स्मृतीत मीपणा नसतो.

**पू. बाबा :** हे बरोबर आहे. तथापि साधक ग म्हणतात त्याप्रमाणे मनाला बाजूला ठेवायसाठी नाम सतत टिकले पाहिजे. नामाचे खरेपण जाणवले पाहिजे.

**साधक प :** 'मी' नाम घेतो यात सगळा घोटाळा होतो. हा मी पणा गेल्याखेरीज खरे नामस्मरण होणार नाही.

**साधक क :** पण आज तरी माझे देहात असणे खरे आहे. देहाचे जेवढे खरेपण वाटते तेवढे तरी नामाचे खरेपण वाटावे.

**साधक प :** मागे एकदा साधक ज म्हणाले होते की मी नाम घेतो म्हणण्याऐवजी माझ्यातून नाम येते असा भाव वाढवावा. वास्तविक नाम शाश्वत आहे. मी त्या नामातून आलो आहे. असे असतांना आपण मी नाम घेतो असे म्हणतो.

**पू. बाबा :** अविद्या किंवा अज्ञान ते हेच.

**साधक ज :** नाम घेतो असा भाव धरण्याऐवजी माझ्या हृदयातून नाम येते आहे आणि ते श्रीमहाराज ऐकत आहेत असा भाव धरता आला तर नामस्मरण चांगले होते असा अनुभव आहे.

**साधक ड :** साधक ज म्हणतात तसे महाराज नामस्मरण करवून घेत आहेत; मी सर्वस्वी त्यांच्यावर अवलंबून आहे हे जाणवले तर नामस्मरण चांगले होईल.

**साधक ग :** मागे आपण श्रीमहाराजांचे अस्तित्व खरे वाटत नाही यावर चर्चा केली. देहबुद्धी गेली तरच ते खरे वाटतील आणि ते 'आहेत' असे वाटू लागले की नामही खरे वाटेल. आज आपल्याला नामाचा अर्थ कोठे माहीत आहे?

**साधक प :** अर्थाचे जाऊ द्या! मुळात नाम कोठे खरे वाटते?

**साधक ग :** मला काही वेळा वाटते की दरवर्षी आपण श्रीमहाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव करतो आणि त्यायोगे ते होते, आता नाहीत हा भाव बळकट होतो.

**पू. बाबा :** तुम्ही म्हणता त्यात अर्थ वाटतो.

**साधक प :** आपल्याला नामाची निकड वाटली पाहिजे. ते मुख्य आहे. भाऊसाहेबांना श्रीमहाराजांची अत्यंत गरज भासत होती. आपल्याला तशी नड वाटत नाही. आपण सर्व काही manage करू असे वाटते.

**साधक क :** तळमळ नाहीं हेच खरे. शांतीसंबंधी बोलतांना निसर्गदत्त महाराज म्हणाले की मनच शांती नष्ट करते. मनाच्या पलीकडे गेल्याखेरीज शांती मिळणे शक्य नाही.

**साधक प :** बाहेरची संकटे आली की आपण श्रीमहाराजांची आठवण करतो. पण खरें संकट आतच आहे. आपले मन हेच मोठे संकट आहे. तथापि आपल्याला तसे वाटत नाही. ते वाटू लागले की नामाची निकड जाणवेल. जपाची निकड वाटायला ती supreme value झाली पाहिजे.

**साधक ग :** श्रीरामकृष्ण नाही का! साधनकालात आजही आईचे दर्शन झाले नाही म्हणून व्याकूळ होऊन मातीत तोंड घासत.

**साधक क :** या निकडीपेक्षाही मला वाटते की सर्वांना आनंद पाहिजे. वस्तूंतून पूर्ण आणि शाश्वत आनंद मिळत नाही हे पटेल आणि श्रीमहाराजांच्या सहवासात, नामस्मरणात आनंद मिळाला तर माणूस त्या मागेच लागेल. मग त्याला नाम घे म्हणून सांगावे लागणार नाही.

**साधक ज :** आनंद पाहिजे हे positive झाले. त्याआधी दु:ख नको म्हणून मी नामस्मरण करीन.

**साधक क :** होय; पण यापेक्षा positive approach चांगला.

**साधक ज :** तत्त्वज्ञानाचा जन्मच दु:खातून झाला ना!

**साधक प :** आपण नाम बाहेरून घेतो; त्याऐवजी नाम शरीरातून आले पाहिजे. हृदयातून किंवा मेंदूतून आले पाहिजे. नामाची 'मी'च्या जागी स्थापना झाली पाहिजे.

**पू. बाबा :** साक्षीभाव ठेवणे काय किंवा अखंड नामस्मरण करणे काय दोन्हीही सारखेच अवघड आहे. ज्याला हे करायचे आहे तो किती alert (सावध) राहील. महाराज म्हणायचे की खरा साधक अंग धरणार नाही. साधनाचे tension (ताण) राहील ना! काही म्हणा, हे केले पाहिजे. लहान सहान घटनांनी (उदाहरणार्थ, टाकीतले पाणी संपले!) आपण खाली येतो ते होता कामा नये. वेळ मिळाला - अगदी पाच मिनिटे का होईना - की नाम सुरू झाले पाहिजे. त्याचा हव्यास वाटला पाहिजे.

**साधक प** : आवड निर्माण झाली की मग कोणी नाम घे म्हणून सांगायला नको. यासाठीच सत्संगाची आवश्यकता आहे. आपण काही अपेक्षा, इच्छा ठेवून नाम घेतो ते बरोबर नाही. तरी पण शुभेच्छा ठेवावी लागेलच. उदाहरणार्थ, मला भगवंताचे दर्शन हवे. पण मुख्य मुद्दा असा की नाम बाहेर नसून आत आहे. म्हणूनच नामाच्या संगतीला बाहेरचे काहीही आड येऊ शकत नाही.

**पू. बाबा** : नाम हे स्फुरणरूप आहे, हे नाम आत चालले म्हणजे कळेल.

**साधक क** : आज मला दृश्य सोडून पलीकडे कशाला सत्यत्व आहे?

**साधक प** : तसा मी खरा आहे. हृदयात धडधड चालू आहे असे जे जाणवते आणि अगदी अस्पष्टपणे का होईना, मी दृश्यापलीकडे आहे असे सत्यत्वाने वाटते तेच खरे.

**पू. बाबा** : माझ्याइतके सत्यत्व नामाला देणे, ती पातळी येणे ही खरी नामाची संगती आहे. तिथे गेल्यावर नाम आणि श्रीमहाराज एकच आहेत हे कळेल आणि 'मला नामांत पहा' असे जे श्रीमहाराज म्हणतात त्याचा अर्थ समजेल. ते स्फुरणरूप आहे. एकूण आत जावे लागेलच. हा अभ्यास करावाच लागेल. स्वस्थ बसून नाम चालू आहे हे पहावे. ते घ्यायचे नाही; केवळ आत लक्ष द्यावे. नामाने आपोआप साक्षीभाव येतो. नाम हे स्वत: दृश्यापलीकडे असल्यामुळे नामाच्या आधाराने दृश्याच्या पलीकडे जाता येईल. ह्या अभ्यासासाठी फार सावधानता लागेल.

आत जायचा अभ्यास करायचा तो असा : आपण स्वत: आत कुठे आहोत ते पाहावे. उदाहरणार्थ, आपले अस्तित्व हृदयात आहे; नाम तिथे आहे अशी भावना करावी, म्हणजे अभ्यासाने खरोखर तसा स्पष्ट अनुभव येईल. हीच, एका प्रकारे, आपले देहापलीकडचे अस्तित्व अनुभवायची पद्धत आहे. यानेच नाम खोल जाईल. हीच नामाची संगत होय. या नामातच श्रीमहाराज आहेत. गोपी आपला देह श्रीकृष्णाचा आहे म्हणून सांभाळत; यातील मथितार्थ हाच की त्यांच्या हृदयातला श्रीकृष्ण त्यांनी ओळखला होता.

श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचा अनुभव कित्येकांना येतो. पण त्यामुळे त्यांची साधनाची तळमळ वाढतेच असे नाही. तूर्यावस्थेतील किंवा समाधीतील सुख आणि रोजच्या व्यवहारात येणारे श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचे अनुभव या वेगळ्या गोष्टी आहेत. नामाची संगत हुकमी झाली

की साधक नित्य येणाऱ्या श्रीमहाराजांच्या अस्तित्वाच्या अनुभवात गुंतून न राहाता खऱ्या अर्थाने आत्मरत, आत्मक्रीड होतो.

### |२३६| (६ डिसेंबर १९९१)

पू. बाबांनी आज गीतेच्या सोळाव्या अध्यायातील दैवी व आसुरी संपत्तीच्या संदर्भात चर्चा सुरू केली.

**पू. बाबा** : ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायातील टिपणे वाचतांना लक्षात आले की दैवी संपत्ती आणि केवळ नीतिमान आचरण यात फरक आहे. दैवी संपत्तीसाठी उत्तम नीतिमान आचरण पाहिजे. पण केवळ नीतिमान आचरण आत्मदर्शन करून देण्यास अपुरे पडते. दैवी संपत्तीला अध्यात्माची पार्श्वभूमी आहे. आसुरी संपत्ती नसलेला माणूस नीतिमान असेल; पण म्हणून त्याला आत्मज्ञान होणार नाही. श्रीमहाराज एकदा म्हणाले, वर्णाश्रमधर्माप्रमाणे स्नान संध्यादि सर्व कर्मे चोखपणे करणारा ब्राह्मण असला तर त्याला चांगला म्हणावेच लागेल; पण म्हणून तो तेवढ्याने ब्रह्मज्ञानी होणार नाही. कदाचित तो कर्मठ असेल.

**साधक म** : कर्मठपणामध्ये फक्त शिस्त असते; आत्मा नसतो.

**साधक ग** : श्रीमहाराज म्हणाले होते त्याप्रमाणे अशी माणसे उंबऱ्यापर्यंत पोचतात पण आत जाऊ शकत नाहीत.

**पू. बाबा** : ह्या अध्यायात अभय हा पहिला दैवी गुण सांगितला आहे. हे अभय कसे यायचे?

**साधक ग** : हा पहिला सांगितलेला असला तरी शेवटी बाणणारा गुण आहे.

**साधक प** : असुरक्षितता हे भीतीचे मूळ आहे. त्यामुळे ज्यात सुरक्षितता मिळेल असे वाटते, त्याच्यामागे आपण लागतो.

उदाहरणार्थ, पैसा असला की सुरक्षित होऊ असे वाटते. पण तोही पूर्ण सुरक्षितता देत नाहीच.

**साधक ज** : काळजी, चिंता इत्यादी गेल्याशिवाय अभय येणार नाही. त्यांच्या मुळाशीही असुरक्षितता आहे. नामात सुरक्षितता वाटू लागली तरच हे शक्य आहे.

**पू. बाबा** : अभयाप्रमाणेच सत्त्वशुद्धीबद्दल ज्ञानेश्वर महाराजांनी जसे सांगितले आहे तसे कोणीही सांगितलेले नाही. बुद्धी एकदा शुद्ध झाली की राख

जशी पुन्हा पेटविता येत नाही तशी शुद्ध झालेली बुद्धी पुन्हा मलिन होणार नाही. (कारण ती प्रपंच जाळून उरलेली असते) ते म्हणतात

आतां सत्वशुद्धि जे म्हणिजे। ते ऐशा चिन्हीं जाणिजे।
तरी जळे ना विझे। राखोंडी जैसी॥ १६-७४॥...
गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु।
भलतेंसणी हानिलाभु। न मनी जेवीं॥ १६.७९॥

पतिविरह झालेल्या पतिव्रतेचे जसे संसारातील नफानुकसानीकडे लक्ष नसते तसे

तेविं सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धीं जें ऐसें अनन्य होणें।
ते सत्वशुद्धि म्हणे। केशिहंता॥ १६-८०॥

रुचलेपणें हा शब्द मोठा मार्मिक आहे. रुचि म्हणजे interest. सत्स्वरूपात स्थिर झालेली बुद्धी इकडे तिकडे जात नाही, संसारात रमत नाही.

विनोबा म्हणतात की अभय हा पहिला गुण आणि नातिमानिता म्हणजे अमानित्व हा शेवटचा गुण या दोहोंमधें बाकीचे गुण सामावलेले आहेत. अभयासाठी काय करावे?

**साधक प :** साधक ज म्हणतात त्याप्रमाणे भीती कशाची वाटते ते समजून घेऊन ती कारणे नाहीशी करायचा प्रयत्न केला तर निर्भयता येईल. अभय हे त्याच्याही पुढे आहे. त्यासाठी सत्त्वशुद्धी पाहिजे. सत्स्वरूप रुचण्यासाठी Reality ची जाणीव झाली पाहिजे. मग भीती राहणार नाही.

**साधक क :** जाणीव म्हणजेच अस्तित्वाची भावना. मागचे काही शुक्रवार आपण श्रीमहाराजांचे अस्तित्व कसे जाणवेल यावर चर्चा केली. मला वाटते की हे बुद्धीला कधीच समजणार नाही. नामस्मरण करीत राहिले की ते सगळे आपोआप होईल. आपण जगाकडे भेददृष्टीने पाहतो त्यामुळे भीती वाटते.

**पू. बाबा :** विभूतींबद्दल बोलतांना एकदा श्रीमहाराज म्हणाले होते. की जो विशेष रूपाने अनेक ठिकाणी असतो तो सर्वव्यापी नसेल का? वास्तविक तोच सर्वत्र आहे.

**साधक प :** तथापि आमच्या आजच्या जाणिवेच्या पातळीवर आम्ही त्याला खंडितपणे पाहतो.

**साधक ग :** म्हटलेच आहे की द्वितीयात् भयम्। द्वैत नाहीसे झाले की भीती कोणाला आणि कोणापासून?

**पू. बाबा :** शब्दजालं महारण्यम्। त्यात हरवून न जाता जीव ओतून नाम घ्यावे; बाकीचे श्रीमहाराज पाहतील.

**|२३७|** (१३ डिसेंबर १९९१)

**पू. बाबा :** जुनी गोष्ट आहे. १९५५ किंवा ५६ साल असावे. घरची सर्वजण पुण्याला गेलेली होती त्यामुळे घरी एकटाच होतो. रात्री मच्छरदाणी लावून आत नाम घेत बसलो असतांना एकाएकी छान जुळलेल्या तंबोऱ्याचा आवाज ऐकू येऊ लागला. प्रथम मला वाटले की जवळपास कोठेतरी गाणे चालू असेल. पण काही वेळाने लक्षात आले की माझ्यामधूनच तो ध्वनी ऐकू येत होता. सुमारे तीन तास हा ध्वनी ऐकू आला. दुसरे दिवशी सकाळी कॉलेजला जायचे होते म्हणून तो आवाज थांबावा अशी श्रीमहाराजांची प्रार्थना केल्यावर तो आवाज हळूहळू थांबला. दुसऱ्या दिवशी ही घटना श्रीमहाराजांना सांगितल्यावर ते म्हणाले की साधनात असे टप्पे येतात, पण साधकाला ते सोसले पाहिजेत.

त्यानंतरच्या काळात साधनात पुष्कळदा कमी जास्त होत राहिले, पण एकंदरीत पाऊल पुढे पडत होते. परवा हेबळ्ळीत संडास, बाथरूमची खूप गैरसोय होती. एकसारखी माणसे भेटायला येत होती, पण तरीदेखील नामस्मरण चांगले झाले. हेबळ्ळीला दुपारी दोनच्या सुमारास पोचताच (बुधवार दि. ६ नोव्हेंबर) दत्ताण्णांबरोबर पादुकांचे दर्शन घ्यायला गेलो आणि मंदिरात अतिशय तेजस्वी प्रकाश दिसू लागला. त्याला थोडी निळसर झाक होती. तो प्रकाश सहन न होऊन पडतो की काय असे वाटू लागले म्हणून दत्ताण्णाला धरून ठेवायला सांगितले आणि मग सुमारे पंधरा मिनिटे तेथेच बसलो.

हेबळ्ळीहून परत येतांना पहाटे गाडीत झोप लागली आणि त्यामुळे नेहमीसारखे नामस्मरण झाले नाही. साधन कमी पडू लागले की मी श्रीमहाराजांची वचने वाचतो. त्यात श्रीमहाराजांनी साधकांना आश्वासन दिलेले आहे की ते सदैव साधन करणाऱ्याच्या मागे उभे आहेत.

पू. बाबा पुढे सांगू लागले, मी पूर्वी फार रागीट होतो. स्वभावात उतावळेपणा होता. एकदा येथे येणाऱ्या एका ज्येष्ठ साधकांचे व माझे भांडण झाले आणि मी त्यांना नको ते बोललो. नंतर मला पश्चात्ताप झाला आणि मी ते श्रीमहाराजांच्या कानावर घातले. श्रीमहाराजांनी विचारले, या पापातून मुक्त

व्हायचे आहे का? मी हो म्हटल्यावर ते म्हणाले की त्यांच्या घरी जाऊन त्यांचे पाय धरा आणि क्षमा मागा. मी त्यांच्या घरी गेलो. ते त्यांच्या मुलाला शिकवत बसलेले होते. मी जाऊन त्यांचे पाय धरले आणि मी चुकलो, तुम्हाला असे बोलायला नको होते; मला क्षमा करा असे म्हणालो.

पू. बाबा म्हणाले, एकीकडे आपण साधन करत असतो आणि त्याच वेळी मनाच्या, विकारांच्या आधीन होतो त्यामुळे केलेले साधन फुकट जाते; म्हणून साधकाने फार सावध राहिले पाहिजे. एकसारखे नाम जरी घेतले नाही तरी सतत अनुसंधान पाहिजे. 'मी'चे जसे आपल्याला भान असते, त्याचे विस्मरण होत नाही तसे नामाचे, सद्गुरूंचे अनुसंधान राहिले पाहिजे. यासाठी मनावर ताबा ठेवणे आवश्यक आहे. हे कसे करायचे?

**साधक प** : मला वाटते की मनाच्या पलीकडे जायचे असेल तर हे मन बाजूलाच ठेवले पाहिजे. म्हणून एक तर, गुरूंनी दिलेले नाम मी घेतो आहे म्हणजे माझा परमात्म्याशी संबंध जोडला गेलेला आहे. आता मला दुसरे काही करायचे राहिलेले नाही अशा निष्ठेने नाम घेतले पाहिजे; नाहीतर नामस्मरणासाठी आवश्यक ती चित्तशुद्धी, अनुसंधान इत्यादी थोड्या लांबच्या मार्गाने गेले पाहिजे. तथापि कोणत्याही मार्गाने जा, मन बाजूला ठेवूनच पुढे जावे लागेल.

**साधक ब** : हे मनच आपला घात करते. शिवाय लोक काय म्हणतील यासारखी बंधने आपण लावून घेतलेली असतात. विशेषत: घरातून टीका झाली की मन शांत राहणं अवघड जातं.

**साधक प** : लोक काय म्हणतील असं आपणच म्हणत असतो. वास्तविक लोकांना तुमच्यामधे इतकं इंटरेस्ट नसतं. घरातल्या लोकांशी वागतांना मात्र थोडं कौशल्य दाखवावं लागेल.

**साधक ज** : ते एक नाटकच आहे.

**साधक ड** : ते करताना धोका असतो. तो म्हणजे नाटक म्हणून सुरुवात करून नकळत आपण त्यात रमतो.

**पू. बाबा** : कारण आपण खरे त्या बाजूचेच असतो. ओढून ताणून बाहेर पडायचा प्रयत्न चालू असतो. ज्यांची देहबुद्धी गेली त्यांचा व्यवहार कसा चालत असेल?

**साधक प** : एका माणसाने निसर्गदत्त महाराजांना हा प्रश्न विचारला होता. तुमची देहबुद्धी गेलेली आहे, मग तहान भूक इत्यादी व्यवहार तुम्ही कसे करता

असे त्याने विचारले. ते म्हणाले की मी इतर लोकांप्रमाणेच वागतो. देहबुद्धी गेली म्हणजे काही देह गेलेला नाही; तहान भूक लागतेच. पण मी देह नाही हे माझे भान अखंड असते.

**पू. बाबा :** हे मात्र खरे. तथापि शरीरदु:ख असतांना हे भान टिकवणे कठीण आहे. तरीदेखील तुम्हाला एक सांगतो. मधे मी आजारी होतो तेव्हा शरीराला पीडा होती पण नाम मात्र छान चालू होते. कबीराचा एक दोहा आहे, त्यात त्याने म्हटले आहे की 'दुखमें सुमिरन सब करें सुखमें करें न कोय।' तुम्हाला दु:खातून बाहेर काढणे का गुरूंना शक्य नसते? त्यांच्या मनात आले तर ते क्षणात तुमची देहबुद्धी नाहीशी करतील. पण जीवाला ते सहन झाले पाहिजे ना? म्हणून दु:खात अनुसंधान टिकले, स्मरण राहिले तर मग दु:ख येईना का, अशी वृत्ती ठेवावी. नामस्मरणात मी ला विसरण्याची ताकत आहे. माझ्या जीवनात जे काही बरेवाईट घडते ते त्यांच्या इच्छेने घडते. राम कर्ता हा भाव वाढवला तर दु:खाचे कारण राहील पण त्याचे दु:ख होणार नाही कारण दु:ख करणारा मी गायब होईल. मी विसरणे हे साधनाचे फळ आहे. श्रीमहाराज म्हणाले की मी वेदशास्त्र न शिकलेला अडाणी माणूस. रघुनाथाखेरीज मला कोणी नाही. तथापि ब्रह्मानंदबोवांसारख्या सर्व बाबतीत मजहून श्रेष्ठ असणाऱ्या पुरुषाचे गुरुपद माझ्याकडे आले कारण ते स्वत:ला जितके विसरले त्यापेक्षा मी जास्त विसरलो. सर्व काही भगवंतावर सोपवून देणाऱ्या भक्ताची भावना टिकवणे फार कठीण आहे. कबीरांनीच म्हटले आहे :

अग्निआँच सहना सुगम सुगम खड्गकी धार।
नेहनिभावन एकरस महाकठिन व्यवहार।।

भगवंतावरील प्रेमाचा म्हणजेच भक्तीचा भाव एकसारखा टिकवायला ताकत पाहिजे.

नाथांनी भक्तीचे फार छान वर्णन केले आहे. "मजमाजी रंगली चित्तवृत्ति। यालागीं विसरला गृहासक्ति। त्यासी गृहस्थाश्रमीच माझी प्राप्ति। सुखसंपत्ति निजबोधु।। एकनाथी भागवत १७-४३१.

**साधक ग :** गृहासक्ती विसरणे ही अट (condition) आहे की तो भक्तीचा परिणाम आहे?

**पू बाबा :** तो परिणाम आहे, अट नाही. रंगली चित्तवृत्ति. रंगली मधे मजा आहे! हेच भक्तीचे मर्म आहे. पण त्यासाठी valuation होणे आवश्यक आहे. तळमळ लागली पाहिजे.

## |२३८| (२१ डिसेंबर १९९१)

गोंदवले.

**पू. बाबा** : साधन करतांना आपल्या गुरूबद्दल कृतज्ञता पाहिजे. खरोखर, विचार केला तर त्यांनी आपल्या लायकीपेक्षा आपल्याला कितीतरी चांगले ठेवले आहे. त्यांनी कृपा केली आहेच; पण आपल्याला ते समजत नाही. आपल्याला दृश्य खरे वाटते. आपण दृश्याला वासनांनी चिकटलेले आहोत. म्हणजेच आपले ध्येय ठरलेले नाही. विणलेल्या स्वेटरचा विशिष्ट धागा धरून ओढायला सुरुवात केली तर सगळा स्वेटर उसवत जातो, तसे एक नामस्मरणाचा धागा धरला तर जीवनातल्या समस्या सुटत जातात. खरे म्हणजे त्या नाहीशा होतात. म्हणून त्या कशा सुटतात किंवा सुटतील यावर विचार करू नये. एकदा गुरूवर सोपवले की अमुक प्रश्न अमुक पद्धतीने सुटावा अशी इच्छा करणे हा वेडेपणा आहे. ते करतील ते माझ्या हिताचेच करतील अशी निष्ठा पाहिजे.

## |२३९| (२३ डिसेंबर १९९१)

मार्गशीर्ष वद्य द्वितीया शके १९१३. श्रीमहाराजांच्या ७८व्या पुण्यतिथी उत्सवाचा आज दुसरा दिवस. संध्याकाळी सात वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो तेव्हां श्रीमती नलूताई इनामदार गात होत्या. त्यांनी कृष्ण व गोपी यांचे प्रेम वर्णन करणारी मिश्र रागातली एक चीज आणि नंतर कृष्ण व राधा यांच्या प्रेमाचे वर्णन करणारी गावती रागातील एक चीज गाऊन दाखवली. त्यानंतर पू. बाबांनी विचारले की या गीतात वर्णन केलेल्या प्रेमासारखे प्रेम आपल्याला श्रीमहाराजांबद्दल कसे वाटू लागेल? पहिली गोष्ट म्हणजे प्रेम निर्माण करता येते का? आणि येत असेल तर कसे?

**साधक क** : सहवासाने प्रेम निर्माण होते. सत्संगातून प्रेम निर्माण होईल.

**साधक** : सहवासाने प्रेम निर्माण होईलच असे नाही. आपण वर्षानुवर्षे काही लोकांबरोबर काम करतो, त्यांचा सहवास असतो, पण तरीदेखील प्रेम निर्माण होत नाही. याच्या उलट गोंदवल्यास काही लोकांची वर्षात एकदाच भेट होते, तरीदेखील त्यांच्याबद्दल जिव्हाळा वाटतो. प्रेम निर्माण होण्यासाठी wave length जमावी लागते.

**साधक क** : तरीदेखील प्रेम निर्माण होण्यासाठी सहवासाचे महत्त्व आहेच. तुरुंगातले कैदी गुन्हेगार असूनही त्यांच्यात परस्परांबद्दल प्रेम निर्माण होते. प्रेमाखेरीज माणूस जगूच शकत नाही.

**साधक ग** : तुरुंगात सगळेच गुन्हेगार असतात त्यामुळे त्यांची wave length जमते असे म्हणता येईल.

**पू. बाबा** : प्रेम निर्माण होणे म्हणजे ज्याच्याबद्दल प्रेम वाटते त्याच्याबद्दल आपलेपणा वाटतो असे म्हणता येईल का?

**साधक ग** : प्रेम म्हणतांना आपण सजीवाबद्दलचे प्रेम आणि निर्जीवाबद्दलचे प्रेम असा भेद केला पाहिजे. दुसऱ्या माणसाबद्दल किंवा प्राण्याबद्दल प्रेम म्हणतो तेव्हां त्यात दुसरीकडून response - प्रतिसाद असतो. आपण गावाहून घरी आलो की घरातले कुत्रे देखील आनंदाने उड्या मारते. याउलट आपले पैशावरचे प्रेम एकतर्फी असते. पैसा काही आपल्यावर प्रेम करीत नाही. म्हणून त्याला प्रेम न म्हणता लोभ म्हणणे योग्य होईल.

**पू. बाबा** : होय, हा भेद खरा आहे. प्रेमामधे response आहे.

**साधक प** : प्रेमामधे तादात्म्य असते. उदाहरणार्थ, माझे माझ्या देहावर प्रेम आहे. तथापि खरे म्हणजे देहापेक्षाही आत जो कोणी आहे त्याच्यावर प्रेम आहे. गुरु किंवा भगवंतच आत आहे. त्याच्याशी तादात्म्य न होता अज्ञानामुळे देहाशी तादात्म्य झाले आहे.

**साधक क** : श्रीरामकृष्ण म्हणत की भक्त हे भगवंताचे लीलास्थान असते!

**पू. बाबा** : ज्याच्यावर प्रेम आहे त्याचा एकसारखा सहवास असावा असे वाटते.

**साधक ग** : नारदांनी तत्सुखे सुखित्वम् असे प्रेमाचे एक लक्षण सांगितलेले आहे. ज्याच्यावर प्रेम आहे त्याच्या सुखात माझे सुख सामावलेले आहे. माझे असे वेगळे सुख राहातच नाही.

**पू. बाबा** : आईचे जसे मुलावर प्रेम असते. (साधक प ना) परवा तुम्ही उदाहरण दिलेत की गाईच्या आचळांना आधी थोडे दूध लावावे लागते आणि मग ती दूध देते. तसे तुम्ही गुरूवर थोडे तरी प्रेम करा आणि पहा; त्यांच्या प्रेमाचा ओघ वाहू लागेल.

**साधक ग** : वास्तविक गुरु आतच आहेत. माझे त्यांच्यावर प्रेम आहे पण मला त्या प्रेमाची जाणीव नाही. आजच आमचा विषय निघाला होता. श्रीमहाराजांच्या चरित्रात त्यांचा आणि वल्हवणकरबुवांचा पंढरपुरात नाम श्रेष्ठ की रूप याबद्दल संवाद झाला होता तो दिलेला आहे. त्यावरून मनात आले की रूप आपण बाहेरून आत घेतो त्यामुळे त्याला मर्यादा राहते. नाम आतच आहे. अगदी वैखरीने घेतलेले नामदेखील आतूनच येते. त्या नामाचे प्रेम वाटू

लागले की नाम आणि श्रीमहाराज एकच असल्यामुळे त्यांच्याबद्दलही प्रेम वाटू लागेल.

**साधक क :** तथापि नाम जास्त सूक्ष्म असल्याने सगुणाचे प्रेम सुरुवातीला तरी सोपे आहे.

**साधक प :** प्रेम असले की प्रेमविषयाचे दोषही दोष म्हणून दिसेनासे होतात. Reader's Digest मधे एक लेख वाचला होता. I love you, anyway. त्या जोडप्यातील स्त्री म्हणते की तुझ्यात दोष नाहीत असे नाही; पण आता तू माझा आहेस. आपलेपणात दोष माफ असतात.

**साधक ग :** उद्धवशतकात गोपी म्हणतात की आम्ही चांगल्या असू, वाईट असू, कशाही असलो तरी कृष्णाच्या दासी आहोत.

"भली है बुरी है औ सलज्ज निर्लज्ज हूँ हैं।
जो कहे सो हैं पै परिचारिका तिहारी हैं॥"

**पू. बाबा :** कृष्णाच्या आहोत यात मर्म आहे स्वत: श्रीकृष्णांनी उद्धवाला सांगितले की आपला देह आपला नसून कृष्णाचा आहे या भावनेने गोपी स्वदेहाचे रक्षण करतात त्यामुळे मला त्यांच्यावर प्रेम करणे भागच आहे. भगवंत भक्ताचा ताबेदार होतो तो असा! खरोखर, आपल्या गुरूंबद्दल असे प्रेम निर्माण झाले पाहिजे. बाकीचा वेदान्त व्यर्थ आहे.

**साधक :** पादुका पाहिल्या, त्यासाठी हार करू लागले की भावना उचंबळून येतात.

**साधक प :** भावना आणि प्रेम यांची आपण गल्लत करतो. एखादे वेळी भावना उचंबळून येईल पण मग ती ओसरेल. प्रेम त्याच्यापेक्षा खोल आहे.

**साधक क :** प्रेम जास्त खोल, व्यापक आणि शांत आहे. प्रेमात भावनेचा भडकपणा नसतो.

## |२४०| (२४ डिसेंबर १९९१)

आज उत्सवाचा तिसरा दिवस. तथापि तृतीयेचा क्षय असल्यामुळे आज अंगारकी संकष्टी आहे. संध्याकाळी पू. बाबांकडे गेलो.

**पू. बाबा :** आज एकांनी प्रश्न केला की ज्ञानी पुरुष भक्त असतो का आणि भक्ताला ज्ञान असते का? मी सांगितले की मार्ग भिन्न वाटले तरी पुढे दोन्ही एकच होतात. कारण द्रष्टा आणि दृश्य यांमधील वेगळेपणा नाहीसा झाल्याशिवाय म्हणजेच त्यांचे तादात्म्य झाल्याशिवाय ज्ञान होत नाही.

त्याचप्रमाणे भक्त आणि भगवंत यांचे तादात्म्य झाल्याशिवाय खरी भक्ती होत नाही. 'विभक्त नव्हे तो भक्त' असे समर्थ रामदासांनी म्हटलेच आहे. त्यामुळे भक्ती आणि ज्ञान यात तसा भेद नाही.

आज सगुण निराकारासंबंधीही प्रश्न निघाला. मी म्हणालो, तुमची आई हयात असताना सगुण साकार आहे पण तिच्या मृत्यूनंतर म्हणजे ती अव्यक्तात गेल्यानंतरही तिचे आईपण राहीलच. ते सगुण निराकार. विशेषातून सामान्यात जातांना आपण सगुण साकारातून सगुण निराकारात जातो. शंकराचार्यांनी त्याच्याही पुढे महासामान्य सांगितले आहे ते वेगळे.

**साधक प :** श्रीमहाराजांनी आनंदाबाबत सांगितले आहेच ना? तुम्ही आनंदी मूल किंवा आनंदाने बागडणारे वासरू दाखवाल पण आनंद दाखवता येणार नाही. किंवा पाण्याचेच उदाहरण घ्या ना! पाण्याला कोणता आकार असतो? तथापि त्याला गुण आहेतच.

**पू. बाबा :** वा! हे फार छान उदाहरण आहे. काल आपला प्रेमाचा विषय चालला होता. प्रेमातदेखील तादात्म्य असते. तथापि काल आपला एक मुद्दा राहिला. प्रेमाचे स्वरूप शब्दांनी सांगता येणार नाही असे नारदांनी म्हटले आहे. ते म्हणतात 'अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम्।' आणि असे म्हणूनही पुन्हा 'तत्सुखे सुखित्वम्'सारखी लक्षणे सांगितली आहेत. ज्ञानेश्वर महाराज देखील गुरूबद्दल प्रथम अनाख्येय म्हणतात आणि लगेच पुढे 'गुरुरित्याख्ययां लोके' म्हणतात! आज आपले गुरूवर प्रेम नाही. प्रश्न ते कसे निर्माण करता येईल हा आहे.

**साधक प :** प्रेमात response - प्रतिसाद पाहिजे म्हणा तुम्ही, पण खरे प्रेम - एकतर्फी आणि निरपेक्षच असते. तू माझ्यावर प्रेम करतोस की नाही याच्याशी माझे कर्तव्य नाही; माझे तुझ्यावर प्रेम आहे असा भाव असल्याखेरीज त्याला प्रेम म्हणता येणार नाही.

**साधक :** पण राधा व कृष्ण यांचे परस्परांवर प्रेम होतेच ना?

**साधक प :** दुसऱ्या बाजूने प्रेम असणारच नाही असे नाही. कृष्णाने अनेक बायका केल्या तरी राधेचे प्रेम कमी झाले नाही. प्रेमात स्वार्थ नसतो. कृष्णाच्या सुखात राधेचे सुख सामावलेले होते. स्वामी रामदासांनी एक हकिगत दिली आहे. एका पारशी बाईचे तिच्या नवऱ्यावर असे (निस्वार्थी) प्रेम होते. त्याने दुसरी बाई घरी आणून ठेवली तरी शक्य असूनही त्याला सोडून न जाता अगदी मोलकरणीसारखी ती तेथेच राहिली.

**साधक :** आई आणि तान्हे मूल यांमधील संबंधाला तुम्ही काय म्हणाल?

**साधक प** : प्रेमाचे हे चांगले उदाहरण आहे. सुरुवातीला तरी आईचे मुलावर एकतर्फी प्रेमच असते.

**साधक ग** : नारदांनी प्रेमाचे आणखी एक लक्षण सांगितले आहे. 'तद्विस्मरणे परमव्याकुलता।' प्रेमास्पदाचा विरह, नव्हे विस्मरण झाले तर जीव कासावीस होतो.

**पू. बाबा** : गुरूबद्दल हे प्रेम कसे निर्माण होईल? मला वाटते, त्यासाठी प्रथम आपल्याला त्यांची गरज वाटली पाहिजे. फिरून आपण व्हॅल्युएशन प्रॉब्लेमपाशीच येतो. आता तेच पाहिजेत. दुसरे काही नको असे अद्यापि आपल्याला वाटत नाही हेच खरे.

## |२४१| (२६ डिसेंबर १९९१)

आज सकाळच्या निरूपणात पू. बाबा म्हणाले की भगवंतांनी यज्ञानां जपयज्ञोऽस्मि म्हटले आहे. यज्ञामधें पापक्षय आणि पुण्यसंचय अभिप्रेत असतो. नामजपाने पापक्षय आणि पुण्यसंचय होतो. तथापि साडेतीन कोटी किंवा तेरा कोटी जप केलेल्या माणसांना देखील काही वेळा भगवंताचे दर्शन होत नाही कारण जप करतांना आवश्यक असलेली वृत्ती टिकत नाही. त्यामुळे जपाने प्राप्त होणाऱ्या शक्तीची गळती होते.

निरूपणानंतर पू. बाबांकडे गेलो तेव्हां त्यांनी नुकतेच प्रकाशित झालेले त्यांचे 'मनाची शक्ति (स्वरूप, सांठवण व नागवण)' हे पुस्तक भेट दिले. जपयज्ञासंबंधी ते म्हणाले की यज्ञाने पुण्यसंचय होतो असे मीमांसक म्हणतात. तथापि यज्ञ करणाऱ्यास व्रतस्थ राहावे लागते.

**साधक ब** : जपाने होणाऱ्या शक्तिसंचयाची गळती कशी थांबवता येईल?

**पू. बाबा** : त्यासाठी एकांत पाहिजे. लोकांबरोबर अगदी साध्या गोष्टी बोलतांना देखील आपण किती रस घेतो. असे वागतांना आपण आधी केलेला जप गळतो हे आपल्या लक्षातच येत नाही. कारण नसतांना आपण दुसऱ्यांचे दोष पाहतो.

**साधक प** : खरे म्हणजे त्या दोषांचे मूळ आपल्यातच असते. एकांतात काय किंवा लोकांमधे राहतांना काय, अंत:शुद्धी आवश्यक आहे.

**पू. बाबा** : अंत:शुद्धी म्हणजेच जपयज्ञाने होणारा पापनाश. आपण जप करतो आणि लहान सहान गोष्टींनी खाली येतो. श्रीमहाराजांनी म्हटले आहे की शक्ती टिकविण्यास सावधानता लागते. अकराव्या शतकात वसुगुप्ताने स्पंद

सिद्धान्त मांडला आहे. त्यानुसार सर्व जग स्पंदनमय असल्यामुळे जपाने शरीराची सूक्ष्मता वाढते. इतकी की जप करणारा हवेत तरंगू शकतो.

संध्याकाळी साडेसात वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो तेव्हां ते विशेष प्रसन्न दिसत होते.

**साधक ग :** काल सगुण निराकारासंबंधी बोलणे झाले. गाणगापूरच्या श्रीदत्तांच्या पादुकांचे निर्गुणी पादुका असे काही वेळा वर्णन करतात. त्याचा अर्थ काय?

**पू. बाबा :** ती चुकीची संज्ञा आहे. त्याला तसा काही अर्थ नाही. श्रीमहाराज नाम हा माझा प्राण आहे असे म्हणत. याचा अर्थ काय? सामान्यत: प्राण म्हणजे श्वासोच्छ्वास असा अर्थ करतात; पण ते प्राणाचे लक्षण झाले. श्रीमहाराज म्हणाले की नाम प्राणापलीकडे जपावे.

**साधक प :** प्राण हे जिवंतपणाचे लक्षण आहे. माणूस कोमात गेला तरी प्राण असतोच. म्हणून प्रथम प्राणापर्यंत नाम गेले पाहिजे. प्राणापलीकडे जपण्याचा प्रश्न त्यानंतर येतो.

**पू. बाबा :** जिवंतपणा म्हणजे अस्तित्व. त्या अस्तित्वाइतके नाम खरे वाटते का? व्यक्तीला दिलेले नांव किती खरे वाटते. झोपलेल्या माणसाला त्याचे नांव घेऊन हाका मारल्या की लगेच जाग येते. ते जसे खरे वाटते तसे नाम खरे का वाटत नाही?

**साधक ग :** मला वाटते की इतर वस्तूंना दिलेली नांवे आणि नाम यात मूलभूत फरक आहे. इतर वस्तूंना - दृश्याला माणूस नांवे देतो. नाम भगवंतापासून आलेले आहे. ती Reality (सत्ता) आहे.

**साधक ब :** नाम हा शब्दसमूह आहे. तो वरून - भगवंताकडून आला आहे असे कृष्णप्रेमनी म्हटले आहे. नाम हा सिद्धमंत्र आहे. नाम प्राणापलीकडे सांभाळावे असे श्रीमहाराज म्हणाले. प्राण गेला तरी नाम राहतेच असा याचा अर्थ असावा.

**पू. बाबा :** नाम म्हणजेच ॐकार. हा ब्रह्माचा पहिला विग्रह आहे. श्रीमहाराज एकदा म्हणाले की समुद्राकाठी गेलात की एक जागा अशी येते की तेथे वाळू संपते आणि पुढचे पाऊल पाण्यात पडते. तसे नाम हे परब्रह्माच्या सीमेवर आहे. त्याच्या पलीकडे एक परब्रह्मच आहे.

**साधक क :** नाम ही स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारी साखळी आहे.

**साधक ग :** म्हणूनच ते अखंड पाहिजे.

**साधक ब :** नामाचा अर्थ तू मला हवा आहेस. ती वासनाच आहे.

**पू. बाबा :** पण ती सद्वासना आहे. बाकीच्या वासना जाऊन तू हवास ही एकच वासना राहिली पाहिजे.

**साधक :** योगवासिष्ठात सद्वासना आणि वासना हे दोन तीर आहेत असेच वर्णन आहे.

**पू. बाबा :** निष्ठा शब्दाचा अर्थ सांगतांना श्रीमहाराज म्हणाले की भगवंताशिवाय बाकी काही इष्ट नाही ती निष्ठा.

**साधक :** शंकराचार्यांनी असाच अर्थ केला आहे. गीतेच्या तिसऱ्या अध्यायातील लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा या तिसऱ्या श्लोकावर भाष्य करतांना 'अनुष्ठेयं भगवता इष्टम्' असाच ते निष्ठेचा अर्थ करतात.

**पू. बाबा :** सत्, चित्, आनंद हे नामाचेच वर्णन आहे. नाम हे सत् आहे, चित् आहे आणि आनंद आहे. नामाचे अस्तित्व ते घेतांना होणाऱ्या आनंदावरून समजते. नाम घेणारा आनंदी असलाच पाहिजे. निर्गुण निराकाराला जुळे झाले. नाम आणि प्रेम. नाम घेतांना आनंद वाटू लागला की नामाचे खरेपण आले म्हणून समजावे. नाम म्हणजे प्राण आहे तो या अर्थीने. नामात एका आनंदाखेरीज दुसरे काही नाही असे श्रीमहाराज म्हणत.

## |२४२| (२७ डिसेंबर १९९१)

मार्गशीर्ष वद्य ७ उत्सवाचा सहावा दिवस. संध्याकाळी ७ वाजता.

**पू. बाबा :** आज एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांचे एक नातेवाईक सुमारे ८० वर्षांचे आहेत. सौम्य कंपवात झालेला आहे. गेली १८-२० वर्षे ते खूप नामस्मरण करतात. काही दिवसांपूर्वी नामस्मरणाला बसले की 'रामनाम सत्य है' असा नाद त्यांना ऐकू येऊ लागला. त्याची भीती वाटू लागली आणि त्यांनी नामस्मरण कमी केल्यावर ते शब्द मंद झाले. वास्तविक हा अनाहत नादाचाच प्रकार होता. मी त्यांना यात भिण्यासारखे काही नाही; त्यांना पूर्वीसारखे नामस्मरण करायला सांगा असे सांगितले. वास्तविक हा सूक्ष्मातला म्हणजे मनाच्या क्षेत्रातला अनुभव आहे. त्यांना भीती का वाटली असावी?

**साधक प :** आपले दृश्याच्या क्षेत्रातले जे अनुभव आहेत त्याच्याशी हे अनुभव सुसंगत नसतात, त्यामुळे भीती वाटते. म्हणूनच सूक्ष्मातील अनुभव समजण्यास गुरु पाहिजे.

**साधक क :** या अनुभवातून काय निर्माण होईल याबद्दल काही अंदाज करता येत नाही आणि दृश्याचा आधार सुटू लागलेला असतो, त्यामुळे भीती वाटत असावी.

**साधक ग** : आपल्याकडे अंत्ययात्रेत रामनाम सत्य है असा घोष करतात त्यामुळे त्यांना ही त्यांचा मृत्यू जवळ आल्याची सूचना वाटली असावी.

**पू. बाबा** : श्रीरामकृष्णांना गुरु नव्हते म्हणून ते आईलाच (कालीमातेला) त्यांच्या अनुभवांच्या सत्यतेबद्दल विचारायचे. ते म्हणायचे, माझे हे अतींद्रिय अनुभव खरे असतील तर एका बाजूचे दगड दुसऱ्या बाजूला जाऊन पडतील. आणि तसे घडले की त्यांना स्वस्थता वाटत असे. तोपर्यंत आपल्याला भ्रम होतो की काय असे त्यांना वाटत असे.

**साधक प** : हे अनुभव म्हणजे देवाचे दर्शन असा गैरसमज होण्याची शक्यता असते. महाराजांच्या माणसांना तसे अनुभव येत नाहीत.

**पू. बाबा** : अनुभव मागणे ही देखील वासनाच आहे. नामाचा अर्थ 'तू हवा आहेस' असा आहे. तुम्ही म्हणाल ही देखील वासनाच नाही का? होय, ही वासना असली तरी सद्वासना आहे.

**साधक ब** : इतर गोष्टींचा आग्रह कमी होणे हा देखील साधनाचाच अनुभव आहे. आपण देखील चूक असण्याची शक्यता आहे असे वाटणे हे साधनाचेच फळ आहे.

**पू. बाबा** : अनुभवांचा विचार करू नये. मी जे जे काही करतो ते महाराज पहात आहेत असा अभ्यास करावा म्हणजे साधन चांगले होईल.

**साधक क** : मग त्यांना जे आवडत नाही ते आपण करणारच नाही.

**साधक ब** : साधन करतांना आम्ही दोन पावले पुढे जातो आणि चार पावले मागे येतो ते थांबवले पाहिजे.

**पू. बाबा** : आपण जप करतो पण लहान सहान गोष्टींनी खाली येतो. ते सावध राहून सांभाळले पाहिजे. श्रीमहाराज पाहताहेत कारण ते अंतर्मनातच आहेत. या अभ्यासाबरोबरच त्यांची प्रार्थना करावी. श्रद्धा वाढली पाहिजे. श्रीमहाराजांबद्दल प्रेम वाटले पाहिजे.

## **|२४३|** (२८ डिसेंबर १९९१)

मार्गशीर्ष वद्य ८. उत्सवाचा सातवा दिवस.

संध्याकाळी सातच्या सुमाराला श्री. दाबकेबुवा हे अंध गवई पू. बाबांच्याकडे आले. पहाटे ते समाधीसमोर गातात. पू. बाबांनी त्यांना काही गावयाची विनंती केली. त्यांनी प्रथम 'देवा बोला हो माझ्याशी' हे पद म्हटले. नंतर पू. बाबांच्या सांगण्यावरून मीराबाईचे 'मेरे तो गिरिधर गोपाल' हे पद

म्हटले आणि त्यानंतर त्यांच्या आवडीचा 'हरिभजनावीण काळ घालवू नको रे' हा सोहिरोबांचा अभंग म्हटला.

**पू. बाबा** : मीराबाईने श्रीकृष्णावर पति म्हणून प्रेम केले. त्याच्याशिवाय दुसरे कोणीही तिला जगात उरले नाही. तसे आपल्याला श्रीमहाराजांवर अनन्य प्रेम कसे करता येईल? दास्य, सख्य, वात्सल्य यांपैकी कोणता भाव ठेवून आपल्याला प्रेम करता येईल?

**साधक ड** : दास्य भाव हा जास्त चांगला असे वाटते. आपल्याला नोकरी म्हणजे गुलामी करायची सवय आहे. तेव्हां श्रीमहाराज माझे मालक आहेत आणि मी त्यांचा दास आहे असा भाव ठेवता येईल.

**पू. बाबा** : दास स्वामीची सेवा करतो. गुरु देहात असले तर त्यांची सेवा करता येते. आपण श्रीमहाराजांची सेवा कशी करायची?

**साधक क** : एखादा मोठा माणूस आला असला आणि आपल्याला त्याच्याशी परिचय करून घ्यायचा असला आणि तो वाढवायचा असला तर आपण त्याला काय आवडते, त्याच्या ओळखीच्या कोणामार्फत त्याच्याकडे जाता येईल ते पहातो. आज श्रीमहाराज खरे परिचित नसले तरी त्यांच्याजवळ जे आहेत त्यांचा परिचय म्हणजेच सत्संग वाढवावा. श्रीमहाराजांना काय आवडते ते जाणून घेऊन त्याप्रमाणे वागण्याचा प्रयत्न करावा.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांना काय आवडते? पहिली गोष्ट म्हणजे नीतीचे वर्तन आवडते. परमार्थाला ते आवश्यकच आहे. दुसरी गोष्ट म्हणजे स्मरण. भगवंताची एकसारखी आठवण. तिसरी गोष्ट म्हणजे कोणाचेही अंत:करण न दुखवणे. व्यवहारात याबाबतीत तारतम्य ठेवावे लागेल. काही वेळा कठोर व्हावे लागेल. पण त्यामधे द्वेषभावना नसावी. त्यानंतर राम इच्छा. सर्व काही त्याच्या इच्छेने घडते. मी कर्ता नसून तो कर्ता आहे अशी मनाला शिकवण देणे. आणि शेवटची गोष्ट म्हणजे अन्नदान.

आज आपल्याला श्रीमहाराजांबद्दल तसे प्रेम नाही. पण या गोष्टी करून प्रेम निर्माण करता येईल. मुख्य म्हणजे त्यांना आवडते ते करतांना माझी आवड बाजूला ठेवावी लागून मी क्षीण होत जाईल. पण ही गोष्ट विचाराने शक्य आहे का?

**साधक ग** : विचारापेक्षा श्रद्धा असेल तर प्रेम निर्माण होईल. विचार आणि विवेक यांची साधनाला मदत होईल.

**पू. बाबा :** म्हणजे आपण श्रद्धेच्या बाबतीत दरिद्री आहोत. श्रद्धा नाही असे नाही. नाहीतर आपण येथे आलोच नसतो. पण राम इच्छा, राम कर्ता असे निश्चयाने वाटत नाही.

**साधक ड :** काही बाबतीत मी कर्ता आणि आणखी काही बाबतीत राम कर्ता असे काहीतरी विचित्र आहे.

**पू. बाबा :** आदरातून प्रेम निर्माण होईल का?

**साधक :** आदरामध्ये भीतीचाही भाग असू शकतो. त्यामुळे भीती असली तर निखळ प्रेम निर्माण होणार नाही.

**साधक क :** प्रेम असले तर माणूस त्यासाठी काहीही करील. इतर मार्गांपेक्षा हा मार्ग सोपा आहे.

**साधक ग :** कबीरांचे म्हणणे वेगळे आहे. ते म्हणतात 'प्रेम का मारग बांका रे.'

**साधक ब :** तू मला हवा आहेस असे खरे खरे वाटू लागले की प्रेम निर्माण होईल.

**श्री. दाबकेबुवा :** हे खरे आहे. दोन दिवसांपूर्वीचाच माझा अनुभव सांगतो. पहाटे समाधीसमोर श्रीमहाराजांची मनोमन प्रार्थना करून गावयाला बसलो आणि गाता गाता छान कोमल ऋषभ लागला आणि समोर सोन्याच्या सिंहासनावर एक तेजस्वी पुरुष कौतुकाने गाणे ऐकत बसलेला मला 'दिसला.' वास्तविक मी श्रीमहाराजांची तसबीर देखील 'पाहिलेली' नाही. (बुवा अंध आहेत) पण ते श्रीमहाराज होते याबद्दल मला तिळमात्र शंका नाही.

**पू. बाबा :** प्रेमामध्ये आपलेपणा असतो. त्याच्यासाठी काहीही करायची तयारी असते. गोपींनी आणि मीराबाईने श्रीकृष्णावर प्रेम केले. त्यामधे त्यांची काही अपेक्षा नव्हती. श्रीमहाराज कर्ते आहेत. त्यांचे प्रेम लागावे म्हणून त्यांना आवडते ते करणे हाच मार्ग आहे. असे वागू लागलो की आपल्या एकंदर जीवनाचा घाटच बदलून जाईल.

## |२४४| (२९ डिसेंबर १९९१)

मार्गशीर्ष वद्य नवमी. उत्सवाचा आठवा दिवस.

**पू. बाबा :** साधन हा सूक्ष्म देहातला खेळ आहे. आपल्याला दृश्यातला खेळ, हालचाल माहीत आहे, पण सूक्ष्मातला खेळ अवघड आहे. सूक्ष्म एकसारखे हलते आहे आणि आपल्यावर दृश्याची जबरदस्त खेच आहे.

सूक्ष्मातील खेळासाठी अभ्यास पाहिजे. हा अभ्यास करतांना दृश्याचा निरास झाला पाहिजे. त्यासाठी वैराग्य पाहिजे. येथे गोंदवल्यात दहा दिवस चांगले साधन होते आणि परत घरी गेलो की पहिल्या जागी घसरतो. असे उपयोगी नाही. आपल्या जीवनाचा पॅटर्न - घाट आतून बदलला पाहिजे. तुमच्या साधनाची घरातल्या इतरांना काय किंमत आहे? पण त्यातच साधन करता आले पाहिजे. तुमचा अभ्यास तुम्हालाच करावा लागणार. यासाठी किमान श्रद्धा आवश्यक आहे. आता कोणावरही अवलंबून राहू नका. सत्पुरुषांची संगत उपयोगी पडते हे खरे. पण ती मिळाली नाही तर सद्ग्रंथ वाचावे. साधनापासून फळाची अपेक्षा ठेवू नये; पण साधनाचा हेतू स्पष्ट असावा. या साऱ्यासाठी ध्येय निश्चित ठरले पाहिजे. हे ध्येय सूक्ष्मातले आहे. हे करण्यामधे अडचण काय आहे?

**साधक ब :** साधन करतांना दोन पावले पुढे आणि चार पावले मागे जातो ते कसे थांबवायचे?

**पू. बाबा :** याचा अर्थ **valuation** झालेले नाही. नाथांनी उसाच्या चोयट्यांचे उदाहरण दिले आहे. चोयट्यांत थोडी गोडी असते पण रस नसतो. गोडी आहे म्हणून काही कोणी त्या चोखत नाही. नामाखेरीज अन्य विषय आता तरी चोयट्यांप्रमाणे व्हावे. प्रत्येक गोष्ट मनापासून करायची ज्याला सवय आहे त्याचे साधनही मनापासून होईल.

नंतर साक्षित्वासंबंधी बोलणे निघाले.

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणाले की मला संस्कृत येत नाही. पण साक्षित्व म्हणजे आपण आपल्या घरात पाहुण्यासारखे राहावे आणि पुढे मेल्यासारखे राहावे. श्री. जगन्नाथ भटजींनी गोंदवल्यास राहण्याचा विचार केला तेव्हा डॉ. कूर्तकोटी त्यांना म्हणाले की तेथे मेल्यासारखे राहावे. अपमान झाला तरी गिळता आला पाहिजे. तितिक्षा या गुणाबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणाले की गिळायला शिकले पाहिजे. श्री. दिनकरराव दुकानातल्या कटकटींसंबंधी पू. तात्यासाहेबांना काही सांगत पण त्यावर त्यांची काही प्रतिक्रिया नसे. याबद्दल त्यांना विचारल्यावर ते म्हणाले की श्रीमहाराजांनी त्याला ते दिले आहे. तो आणि श्रीमहाराज काय ते पाहून घेतील.

श्रीरामाच्या दरबारात तुलसीदासांनी अर्ज केला की रामाने मला आपला म्हणावे; तसे उद्या श्रीमहाराजांच्या दरबारात ते प्रसन्न असणारच, अशा वेळी त्यांच्याजवळ मागा की आता मला द्या. माझी लायकी नाही पण मी तुमच्या

पायाशी आलो आहे. एवढी भीक द्या; मला आपला म्हणा. मला नामाचे प्रेम द्या.

**साधक ड** : नाहीतरी आम्ही भिकारीच आहोत. भीक मागायची आम्हाला सवय आहे.

कोणीतरी कृपेचा **(Grace)** मुद्दा काढला. त्याबद्दल पू. बाबा म्हणाले की कृपा ही पावसासारखी आहे. पाऊस पडला तरी आपले शेत नांगरून तयार पाहिजे. विवेकानंदांना परदेशात जो मान मिळाला तो दुसऱ्या एखाद्याला मिळाला असता तर तो वेडा झाला असता. पण श्रीरामकृष्णांनी त्यांना सांभाळले. लक्षात ठेवा की सद्गुरूंची कृपा सदैव असतेच.

आज पू. बाबा इतक्या तळमळीने सांगत होते की सांगतांना त्यांच्या डोळ्यात अश्रू आले. ते म्हणाले की अगदी मनापासून उद्या श्रीमहाराजांकडे मागा. म्हणा की मी तुमच्या दारात आलो आहे. मला आपला म्हणा. उद्या पहाटे दहा-पंधरा हजार लोक जमतील. सगळ्यांच्या मनात श्रीमहाराजांचा विचार असेल. अशा वेळी तुम्ही मनापासून मागा. समाधीतून बाहेर येऊन ते तुम्हाला देतील. तुमची आर्तता शिगेला पोचली तर समाधी कां हलणार नाही? तेव्हां एवढे माझे तुम्ही ऐका, विसरू नका.

## **।२४५।** (३० डिसेंबर १९९१)

मार्गशीर्ष वद्य दशमी. उत्सवाचा नववा व अखेरचा दिवस. तृतीयेचा क्षय झाल्यामुळे यंदा उत्सव नऊ दिवस झाला.

संध्याकाळी ६॥ वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो.

**पू. बाबा** : आज एका गृहस्थांनी प्रश्न विचारला की चंचल असणारा सूक्ष्म देह नामाने स्थिर कसा होतो? नामामुळे सूक्ष्म देहाचे **structure** - संरचना बदलते का?

**साधक प** : जे स्वाभाविक चंचल आहे ते चंचलच राहणार. फक्त त्यामधे असलेला विसंवाद (disharmony) नाहीसा होऊन सुसंवाद (harmony) निर्माण झाला की ते स्थिर झालेसे वाटते.

**साधक ग** : सूक्ष्म देह वासनांचा बनलेला असल्यामुळे आणि वासना त्याला सतत खेचत असल्यामुळे त्यात चंचलता असते. त्याच्या उलट नाम हे भगवंतापासून आलेले आहे आणि ते स्थिर आणि चंचल यांना जोडणारे आहे त्यामुळे नाम चंचलाकडून स्थिराकडे नेते.

**पू. बाबा** : नामस्मरणाने चंचलता कमी होणे म्हणजे सत्त्वगुणाची वाढ होणे म्हणता येईल. नामस्मरणासाठी अशी वाढ होणे आवश्यकच आहे.

**साधक ब** : त्यासाठी मला वाटते की सुरुवातीला तरी नामस्मरणाचा हट्ट पाहिजे. मग हा हट्ट तमोगुणी असला तरी चालेल.

**पू. बाबा** : वास्तविक तीन्ही गुण पाहिजेत. रजोगुणात चंचलता असली तरी एकसारखे काहीतरी करत राहण्याचा त्याचा स्वभाव असतो. तो नामस्मरणच करत राहील.

**साधक क** : श्रीरामकृष्णांनी तीन्ही गुणांतून होणाऱ्या भक्तीचे छान वर्णन केले आहे. तमोगुणी भक्त भगवंताशी भांडेल, हट्ट धरील. दर्शन दे नाहीतर मान कापून घेतो म्हणेल. रजोगुणी भक्ताच्या साधनात दिखाऊपणा असेल. तो तऱ्हेतऱ्हेच्या माळा, मुद्रा धारण करील, झगमगीत वस्त्रे पांघरेल, देवाला नटवेल, समारंभ करील इत्यादी. सत्त्वगुणी भक्त हा मच्छरदाणीत बसून साधन करणाऱ्यासारखा असतो. शक्यतो तो बाहेर कोणाला आपले साधन समजू देणार नाही आणि कशाची चिंता करणार नाही. या तीन्ही भक्तींपलीकडे एक भक्ती आहे; ती गुणातीत भक्ती, म्हणजेच नामस्मरण. तेथे भक्त केवळ नाम घेतो. बाकी काही उपचार करीत नाही.

**साधक ब** : ते कोरे नाम असते. कृष्णप्रेम यांनी म्हटल्याप्रमाणे It is a group of words which has descended from above. त्याचे स्पंद स्थिर असतात. नाम हे इतर शब्दांसारखे नाही. त्यात गुरूने आपली शक्ती घातलेली असते. त्या नामाच्या स्पंदांमधे एकदा का स्थिर झाला की सगळी चंचलता नाहीशी होते. अशा स्थिर झालेल्या साधकाला काही काळ तरी दुसरे काही बोलता येणार नाही. खरा सुसंवाद (harmony) निर्माण होईल.

**साधक आ** : शांताश्रम स्वामींचे असे झाले होते. त्यांना रामनामाखेरीज दुसरे काही बोलता येईनासे झाले होते.

**पू. बाबा** : आपण म्हणतो आहोत ती स्थिरता प्रेमामुळे येईल का? कारण प्रेमातही harmony आहे.

**साधक ग** : प्रेमामधे व्यापकता असते. नारदांनी तदेवावलोकयति, तदेव श्रृणोति इत्यादी वर्णन केले आहे.

**पू. बाबा** : होय, तो प्रेमविषयाचेच चिंतन करील, त्याच्याविषयीच बोलेल. त्याच्या पलीकडे त्याला काही सुचणार नाही.

**साधक ग :** प्रेमामध्ये तादात्म्य आहे. व्यवहारात ज्याला आपण प्रेम म्हणतो ते आणि भगवंताचे प्रेम यात फरक आहे.

**साधक क :** प्रेमाचे आंतरिक प्रेम आणि बाह्य प्रेम असे प्रकार सांगता येतील. माझे मी शी तादात्म्य पावणारे प्रेम ते आंतरिक प्रेम आणि जे माझ्याशी संबंधित प्रेम आहे ते बाह्य प्रेम असे म्हणता येईल.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांवर आपले कुठल्या प्रकारचे प्रेम आहे? अर्थातच दुसऱ्या प्रकारचे. इतर अनेक वस्तूंवर जसे प्रेम आहे तसे महाराजांवरही आहे.

**साधक क :** नाथांनी गुरुप्रेमाचे वर्णन करतांना म्हटले आहे की मी त्यांना विसरू म्हटले तर त्या विसरातही तेच असतात. नामाची दोन अंगे आहेत. एक स्थिर आहे आणि दुसरे चंचल आहे आणि असे असून पुन्हा नाम या दोन्ही अंगांना व्यापून आहे. नाम ही स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारी साखळी आहे. आज आपल्याला नामाच्या स्थिरपणाची जाणीव नाही, पण आज आपण जे नाम घेतो ते नामच त्या स्थिर अंगाची जाणीव करून देते.

**साधक प :** शिव आणि शक्तीसारखेच ते आहे.

**पू. बाबा :** नाम आणि त्याचा अर्थ, चंचल आणि स्थिर दोन्ही एकच आहेत.

**साधक ग :** कालिदासाने वाणी आणि अर्थ यांनाच पार्वती आणि परमेश्वर म्हटले आहे.

**साधक अ :** आज आपल्याजवळ नामाचे प्रेम नाही हे अगदी खरे आहे. तथापि नाम घेतले की श्रीमहाराजांना आनंद होतो आणि त्यांना आनंद होतो यामधे मला आनंद वाटतो, म्हणून नामस्मरण करावे. (बाकी स्थिर आणि चंचल इत्यादी गुंतागुंतीत सापडू नये हा भावार्थ)

**पू. बाबा :** हे अगदी बरोबर आहे. आज तरी असेच नामस्मरण केले पाहिजे.

**|२४६|** (३१ डिसेंबर १९९१)

सकाळी साडेआठ वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो. गेल्याबरोबर त्यांनी आजचे होमवर्क (जप) झाले ना म्हणून विचारले. साधन करताना व्यवहारातली कर्मे कशी करावी, कर्मफल सोडून देखील त्याच उत्साहाने - धृत्युत्साह समन्वितः कर्म कसे करावे याविषयी चर्चा झाली.

**पू. बाबा :** कर्मण्यकर्म यः पश्येत् अकर्मणि च कर्म यः। स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तो कृत्स्नकर्मकृत्॥४-१८॥ असे गीतेत म्हटले आहे. सर्व कर्मे

करून त्या कर्मात नसणे आणि कर्म न करता कर्म करणे हे ज्याला जमले तोच बुद्धिमान, सर्व कर्मे करणारा योगी असे म्हटले आहे. श्रीमती सुलभा पाणंदीकर (पूर्वीच्या डायरेक्टर ऑफ एज्युकेशन) Concept of God हा विषय घेऊन M. A. by Thesis करत होत्या. त्यासाठी त्यांनी जे लेखन केलेले असे त्यात अनेकदा (काही वेळा ५-६ दा) बदल करून त्यांचे गाईड पुन्हा लिहावयाला सांगत. त्या म्हणाल्या की प्रथम या गोष्टीचा फार कंटाळा येई, पण पुढे सवय झाली. पुढे लेखन गाईडना दाखविण्यापूर्वी त्या स्वत:च ते दोन-दोनदा लिहू लागल्या! Thesis च्या या कामाप्रमाणेच साधनात सुरुवातीला कष्ट आहेत. स्वत:शी कठोर होऊन हे कष्ट करावे लागतील, पण नंतर सवय होईल. साधन करून जमत नाही हे जेव्हां समजून येईल तेव्हां शरणागतीची सुरुवात येईल. खुंटीवरचा पंचा काढण्यासाठी लहान मुलाने उड्या मारण्यासारखे हे आहे. मुलगा हताश होतो तेव्हां पंचा काढण्यासाठी बाप त्याला उचलून आपल्या खांद्यावर घेतो आणि पंचा काढल्यावर चॉकलेट देतो. त्या बापासारखा भगवंत आपल्या उड्यांकडे पहात असतो.

**साधक ब :** आज मी नाम घेतो आहे ती देखील त्यांचीच प्रेरणा आहे. अशा प्रेरणेखेरीज नाम घ्यायची इच्छाच होणार नाही. साधन करतांना शरणागतीची पार्श्वभूमी पाहिजे आणि त्याचबरोबर साधन करण्याचा आग्रहही पाहिजे. साधनाचे फळ त्याच्यावरच सोपवले की त्या त्या साधकाला योग्य असाच परिणाम होईल; कारण गुरूच साधन करून घेतात. ते आपल्या हिताचे आहे तेच करतात.

**पू. बाबा :** अर्जुनाने शरण जाऊन भगवंतावर सोपवले तसे गुरूंना शरण जाऊन साधन करत राहावे म्हणजे निराशा येणार नाही. श्रीमहाराज म्हणत की सर्व जगाच्या दृष्टीतून विचार केला की स्वत:चा क्षुद्रपणा लक्षात येतो आणि कर्तेपणाचा अहंकार नाहीसा होतो. 'अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते' याचा दोन प्रकारे अर्थ करतात. अहंकारामुळे मूढ झालेला किंवा मूढ असल्यामुळे अहंकाराने मी कर्ता असे मानणारा. कोणताही अर्थ घ्या, 'मी' साधन करून फळ मिळेल ही कल्पनाच चुकीची आहे.

**साधक प :** खरोखर, आणखी पाच मिनिटांनी मी काय करणार आहे हे देखील मला माहीत नसते. साधन देखील तेच करून घेत आहेत असा भाव सदैव जागृत ठेवून साधन केले पाहिजे.

संध्याकाळी साडेसात नंतर म्हणजे थोडे उशीराच पू. बाबांच्या खोलीत गेलो. सकाळच्या प्रमाणेच पू. बाबा अगदी प्रसन्न दिसत होते. डॉ. आप्पासाहेब आठवले आधीच येऊन बसलेले होते.

**पू. बाबा :** आज आपण जे नाम घेतो ते एक कर्म होते वास्तविक नाम हे सूक्ष्म आहे. पण जोपर्यंत आपण ते कर्म म्हणून करतो आहोत तोपर्यंत ते सूक्ष्म होणार नाही. आपले नाम कर्मापलीकडे कसे जाईल? आपले हे open forum आहे. यावर कोणीही सांगावे.

**साधक क :** ते समजून घेण्यासाठीच आम्ही तुमच्याकडे येतो.

**पू. बाबा :** मी काय सांगणार? मी महाराजांचा पोपट आहे. रामनाम घेणाऱ्या पोपटाला मांजराने पकडल्यावर तो जसा ट्यां ट्यां ओरडला, राम राम म्हणाला नाही तसे माझे आहे. मी महाराजांचा बोंबल्या आहे.

**डॉ. आठवले :** मग या बाबत (नाम कर्म न राहता सूक्ष्मात कसे जाईल) श्रीमहाराज काय म्हणत ते सांगा.

डॉ. आठवल्यांच्या या युक्तिपूर्ण बोलण्याने सर्वजण हसले. पू. बाबाही थोडे थबकले व नंतर म्हणाले :

श्रीमहाराज म्हणाले की महाराज मला भेटले, आता मला मिळवायचे असे काही राहिले नाहीच असे ज्याला वाटते तो नंबर पहिला. दुसरा मार्ग म्हणजे माझ्या कुवतीनुसार शक्य तितके जास्त जास्त नाम मी घेतो. त्यातून काय निर्माण होईल हे मला माहीत नाही पण मी तुम्हाला शरण आहे. तिसरा मार्ग म्हणजे विचाराने, श्रीमहाराजांना काय म्हणायचे आहे - What does he stand for हे लक्षात घेऊन साधन करावे म्हणजे विवेक आणि वैराग्याला आवश्यक ती पार्श्वभूमी तयार होईल. साधन करतांना या तीन्ही मार्गांचे थोडेथोडे मिश्रणही होईल; अगदी भिन्न असे ते राहणार नाहीत. तथापि पहिला आणि तिसरा हे दोन्ही मार्ग फार अवघड आहेत.

**साधक ब :** सुरुवातीला तरी नाम मी घ्यायला पाहिजे. तेथे माझे कर्तेपण आहे. मी नामस्मरणासाठी बसलो आहे पण ते करून घेणे, महाराज, आपल्या हाती आहे असा भाव असावा.

**साधक :** असे म्हणूनही साधन झाले नाही तर?

**साधक ब :** तसे झाले तर मला वाईट वाटेल; कारण खरे कर्तेपण त्यांचे आहे हे मला आत कोठेतरी पटलेले आहे.

**साधक प** : हे सर्व घडतांना आपण स्वत:शी प्रामाणिक राहिले पाहिजे. त्यात फसगत होता कामा नये.

**पू. बाबा** : आपण स्वत:शी प्रामाणिक झालो आणि मी हे का करतो आहे हे तपासून पाहिले तर नाम खोल जाईल.

**साधक ग** : नाम घेतांना नामाचा अर्थ आपल्याला माहीत नाही त्यामुळे ते कर्म होते.

**साधक ब** : नामाचा अर्थ 'तू मला हवा आहेस' असा श्रीमहाराजांनी सांगितला आहे. आज आम्हाला राम माहीत नाही पण महाराज माहीत आहेत. मला महाराज हवे असे वाटू लागले की नाम कर्माच्या पलीकडे जाईल.

**पू. बाबा** : काल साधक क म्हणाले की नाम हे गुणातीत आहे ते अगदी खरे आहे. ते प्रकृतीच्या पलीकडे परमात्म स्वरूपाच्या निकट आहे. साधक अ काल म्हणाले ते मला फार आवडले. मला आज नामाचे प्रेम नाही, पण नाम घेतल्याने श्रीमहाराजांना आनंद होतो याचा मला आनंद होतो म्हणून मी नाम घेतो. हा भाव फार चांगला आहे. हा भाव स्थिर झाला की त्यातूनच नामस्मरण कर्मापलीकडे जाईल. नामस्मरण घडू लागेल.

**साधक ब** : नाम उपाधिरहित असले तरी आज आम्ही उपाधींच्या पलीकडे जाऊ शकत नाही. तेव्हां 'तू मला हवा आहेस' ही उपाधी आज नाम घ्यायला फार उपयोगी आहे. हे जमले तर आपल्यापुरती नामाला चव येईल.

**पू. बाबा** : हे अगदी खरे आहे. श्रीमहाराजांनी म्हटले आहे की मी तुमचा व्हायला हवा असेन तर तुम्ही थोडे तरी माझे व्हा. धार काढण्यापूर्वी गाईच्या आचळांना थोडे दूध ओशट लावावे लागते तसे हे आहे. वास्तविक ते द्यायलाच बसलेले आहेत. पण आपण आपल्या बाजूने घ्यायची अधीरता दाखवली पाहिजे.

# परिशिष्ट

अध्यात्म संवाद भाग दोन मधील महत्वाचे विषय



प्रा. के. वि. बेलसरे

अध्यात्मविषयक लेखनाप्रमाणेच पू. बाबांना अध्यात्मविषयक चर्चेचीही आवड होती. चर्चेत भाग घेणाऱ्या साधकांकडूनच त्यांनी विचारलेल्या प्रश्नांची वा शंकांची उत्तरे मिळावी अशा कुशलतेने ते चर्चेचे सूत्रसंचालन करीत असत. निव्वळ बौद्धिक कसरतीचा त्यांना तिटकारा होता. चर्चेतून साधकांच्या अध्यात्मविषयक संकल्पना स्पष्ट व्हाव्या आणि साधनात त्यांची प्रगती व्हावी अशी त्यांना तळमळ होती.